मनोहर ग्रंथ-माला प्रकाशन २४ वें

# सायंतारा

समुद्रजीवनाच्या पार्श्वभूमीवर आधारलेली एक सामाजिक प्रणयकथा



लेखक

श्रीधर गोपाळ देशपांडे




२८ डिसेंबर १९४१

किंमत २॥ रु.

प्रकाशक
मनोहर महादेव केळकर,
मनोहर ग्रंथ-माला,
टिळक रोड, पुणें २.

मुखपृष्ठावरील चित्र मुंबईच्या आर्ट कॉर्नरचे
श्री. वसंत केळकर याचें आहे.

मुद्रक
श्री. र. राजगुरु,
राजगुरु प्रेस, ४०५ नारायण.
कॉमनवेल्थ कॉलनी, पुणें २

## मनोगत—

१९१८ सालचा सुमार होता तो. पुण्याच्या बाजारपेठा रोषणाईनें फुलून निघाल्या होत्या. माणसाची रहदारी नि गजबज चालूच होती. पण बाजार उघडा होता इतक्या उशीरापर्यंत तो व्यापारासाठी म्हणून नव्हे, तर त्या दिवशीं लक्ष्मीपूजन होतें म्हणून. सारी सन्ध्याकाळभर तात्या ठिकठिकाणीं लक्ष्मीपूजनाच्या पानसुपारीस जात होते, आणि त्याच बोट धरून एक सहा-सात वर्षांचा मुलगाहि हिंडत होता. पुष्कळांच्या आपुलकीच्या आमंत्रणांना मान द्यायला हवा म्हणून वेळात वेळ काढून कर्तव्यबुद्धीनं तात्या हिंडत होते, नि तो लहान मुलगा मात्र केवळ गंमत म्हणून रमला होता हिंडण्यात. ते झाल 'लक्ष्मीपूजन'!

केसरीचे अग्रलेख लिहिण्यात, किंवा मध्यवर्ती असेंब्लीसंबंधीं कांही कामात किंवा राजकारणातल्या महत्त्वाच्या गोष्टींचा विचार करण्यात तात्या गढलेले असताना तो लहान मुलगा नि:शंक मनानं जाऊन त्यांच्या कामात व्यत्यय आणी.

"काय रे श्रीधर!" तात्या अगदीं न रागावता विचारीत.

"माझ्या प्रगतिपुस्तकावर सही करा तात्या." मी म्हणे. नि त्यांच्या कामाच्या कागदावर माझं मराठी पहिलीचं प्रगतिपुस्तक ठेवी. हिंदुस्थानच्या राज्यघटनेपेक्षाहि मला ते प्रगतिपुस्तक जास्त मोलाचं वाटे त्या वेळीं. आणि तात्या मग हसत, वाचीत, "अभ्यास—चांगला, वर्तणूक—चांगली". पालकाचा शेरा या खाली सही करीत, 'न. चिं. केळकर' नि आपल्या कामाला लागत. ते माझं शिक्षण सुरू झालेलं होत. सरस्वतीपूजनाची ती सुरुवात होती!

त्यानंतर सुमारे वीस वर्षांचा काळ लोटला मी समुद्रावर काढलेल्या दहा वर्षांच्या अनुभवानं ही कादंबरी लिहीत होतों. आणि त्याच वेळीं तात्याहि समुद्रविषयक कथानकावर एक कादंबरी लिहीत होते. माझ्या कादंबरीचीं पहिलीं प्रकरणं वाङ्मयशोभेंत वाचल्यावर तात्यांनी मला पत्र लिहिलं त्यात ते म्हणतात, "प्रकरणं फारच सुंदर आहेत. अनुभवाशिवाय असल्या विषया-

तली गोष्ट कोण कशी रंगवू शकेल? उसन ते उसन.—आजा व नातू एकाच वेळी एकाच समुद्रजीवन विषयावर लिहितात हा योगायोग कोणा मार्मिक वाचकाच्या लक्षात भरला असेल काय? पण माझ्यापेक्षा तुमचच समुद्रजीवन अधिक रंगणार यात शंका नाही. पण माझी गोष्ट अस्सल स्वदेशी कोकणी पद्धतीची आहे. तुमच्या कादंबरीला परदेशीय जीवनाचा वास येईल. तथापि कांहीं हरकत नाहीं. तुम्ही तिशीच्या आत दोन कादंबऱ्या चांगल्यापैकीं लिहिणार! शाबास!" आणि आजहि मला हें वाचून तात्यानी प्रगति-पुस्तकावर सही केल्याचा आनंद वाटला.

शारदामंदिरात सरस्वतीपूजनासाठी जाताना माझं स्वागत माझ्याच आजोबानीं केलं. त्यानं समाधान वाटलं नि प्रोत्साहनहि मिळालं.

सरस्वतीची उपासना आमच्या घरात तात्यानी सुरू केली, नि आता तो आमचा कुलधर्मच झालेला दिसतो नाही तर ही उपासना करण्याची उत्कट इच्छा अशी अंतःस्फूर्त कां?

—आणि म्हणून पहिला प्रणाम सरस्वतीला करून, दुसरा मानाचा प्रणाम करण्यासाठी मी तात्याच्यापुढं विनीत होत आहे.

— श्रीधर देशपांडे

——ज्याच्या कडक शिस्तीत नि शिकवणीत दहा वर्ष गेल्यानं माझं आयुष्य अळणी न राहता, सुरुचिर नि सुरम्य झालं त्या अफाट, अथाग, अनिर्बंध दर्याला—— आणि त्यावर हालअपेष्टांत पण हसतमुखानं जन्म काढणाऱ्या धर्मातीत, वर्णातीत, आंतर्देशीय अशा उदार वृत्तीच्या ज्या दर्यावर्दी बांधवाच्या संगतीत मीहि दर्यावर्दी झालों त्याना——

समुद्रजीवनातून उचललेली ही स्वानुभवांची ओंजळ
परत अर्घ्य म्हणून मी अर्पीत आहे.

——श्रीधर देशपांडे

## मनोहर ग्रंथमालेचीं पांच वर्षांतील पंचवीस प्रकाशनें



| | |
|---|---|
| न. चिं. केळकर— | तिरंगी नवमतवाद १० आ. |
| | फ्रेंच राज्यक्रांति २ रु. |
| | हास्य-विनोद-मीमांसा ४ रु. |
| | चंद्रगुप्त १ रु. ( आवृत्ति संपली ) |
| | बलिदान २ रु. |
| | समग्र केळकर-वाङ्मय (बारा खंड) ५० रु. |
| श्रीधर देशपांडे— | सहारा १ रु. |
| | सायतारा २॥ रु. |
| प्रो. द. के. केळकर— | वादळी वारे २ रु. |
| | संस्कृति संगम ४ रु. |
| श्री. वि. वि. बोकील— | बोकिलाच्या गोष्टी १ रु. |
| | दुसरी सावली २। रु. |
| प्रो. ना. सी. फडके— | उन्माद २॥ रु. |
| | गुप्तप्रायश्चित्त २॥ रु. |
| प्रो. वा. म. जोशी— | विस्तवाशी खेळ १ रु. |
| सौ. गिरजाबाई केळकर— | संसारसोपान १ रु. |
| श्री. गं. भा. निरंतर— | इब्सेन १० आ. |
| श्री. वि. म. कुलकर्णी— | न्याहारी १ रु. ( आवृत्ति संपली ) |
| श्री. शांताराम आठवले— | बीजांकुर ( काव्य ) १। रु. |
| प्रो. वि. पां. दांडेकर— | प्रतारणा १॥। रु. |
| श्री. र. गो. सरदेसाई— | कागदी विमानें १। रु. |
| सौ. संजीवनी मराठे— | राका ( काव्य ) १ रु. |

प्रदक्षिणा— ( गेल्या शतकांतील वाङ्मयाचें समालोचन ) २ रु.

चंपी आणि मोत्या— ( एक समाज-कथा ) १॥ रु.

Bar. **V. D. Savarkar**— Hindu Pad-Padashahi ५ रु.

मनोहर ग्रंथ-माला,
पुणें २.

# १

हो ! आठवत मला. किती स्पष्ट आठवण आहे त्या दिवशींची ! मी किनी किती लहान असेन, पण माझा झगासुद्धां आठवतो मला त्या वेळीं घातलेला. मी बाबाच्या हाताच बोट धरून उभी होतें त्या धक्क्यावर. खाडी तर कशी तुडुंब भरलेली होती. थोड्या दूरवर एक गलबत उभं होत, नि त्याकड एक छोटी बोट जात होती, नि मी रडत होते मुसमुसून. माझ्याबरोबर खेळणाऱ्या हिंमतला नि दौलतला कुणी एक दाढीवाला माणूस घेऊन जात होता त्या होडीतून.

ती होडी थोड्या वेळान गलबताजवळ पोंचली. त्यातून तीं सारीं माणस गलबतावर चढलीं. मग त्यानीं ती होडी पण गलबतावर उचलून घेतली. मग साखळदडाचा आवाज नि खलाशाच्या ठेका घायच्या गाण्याचा ध्वनि अस्पष्ट ऐकू येत होता. त्यानतर त्या गलबताची पाढरीं शिडं सैल होऊन सुटूं लागलीं. त्या वेळच्या उन्हान सगळं कस अद्भुत दिसत होत— नि शिवाय इतक्या कालांतरानहि त्या आठवणीला कसा जादूगिरीचा मुलामा दिल्यासारखं झाल आहे. लवकरच तें गलबत चालू झाल. कुणीसं त्यावरन

ओरडून काहींस म्हणत होत आम्हांला. आणि दूर जाता जाता शेवटी तें पाढऱ्या ठिपक्यासारख दिसायला लागल.

मग बाबा म्हणाले मला, "चल मुकुल. तुझी जेवायची वेळ झाली. जिजी वाट पाहत असेल." नि आम्ही आत आलो. मुकुलन आठवण सांगितली आणि विचारमग्न होऊन ती समुद्रात दूरवर बघूं लागली.

"बरच आठवतय् की तुला! अग, त्या वेळी तू तर सारी चार वर्षांची होतीस." जिजी म्हणाली.

"कोण जाणे केवढी होतें! पण सागितल एवढ कस अगदीं आत्ता पाहतें आहे अस स्पष्ट आठवत—पण मला आईचा कांहीं चेहरा कसा तो मुळीसुद्धा आठवत नाही. कित्तीदा मी अगदीं लहानपणच्या जुन्या आठवणी आठवून त्यापूर्वीच काही आठवतं का—मग त्याहीपूर्वीच काही आठवत का— अस करून पाहिल, पण आत्तां सागितलेल्या आठवणीपूर्वींच काहीसुद्धा नाहीं आठवत. कळू लागल्यावरची हीच मला वाटत पहिली आठवण असेल."

"म्हणूनच तुला तुझी आई आठवत नाही पोरी, नि आठवत नाहीं तेंच ठीक आहे!"

"अस का ग म्हणतेस नेहमीं नेहमी जिजी? मला काहींसुद्धा कधी सागत नाहीस माझ्या आईबद्दल. मला तर कित्ती उत्सुकता वाटते तिच्याबद्दल सगळ ऐकायची. ती कशी होती, काय होती, कां कधी नाही सागत तू?"

"मुकुल! आरशात पाहा म्हणजे तुझी आई कशी दिसे ते तुला कळेल."

"ते एक झाल, आणखी साग कीं?"

"आणखी काय करायच सागून? अडल आहे कधी तुझ त्या आईवाचून! मीच तुझी आई." अस म्हणून जिजीन प्रेमभरानं मुकुलच्या पाठीवरन हात फिरवला. त्यान मुकुलला बर वाटलं, पण

तिच्या प्रश्नाच समाधान झाल नाहीं. गोंजारलेलं मांजर जास्तच बिलगत पायाशीं, तशी मुकुल जिजीला जास्त बिलगून बसत तिच्या गळ्याभोंवतीं हात टाकून म्हणते, " जिजी ! तूच माझी आई म्हणतेस, मग त्याच कल्पनेंत मला जन्मापासून का नाहीं वाढवलस ? मला जन्म देणारी आई दुसरी होती असं सांगितलसच मुळीं कशाला ? तुझ नेहमीच आहे बाई ! अस अगोदर अर्धवट कांहीं तरी सांगून ठेवायच नि मग विचारल तर पुरा उलगडा करायचा नाहीं."

अर्धवट मुकुलच्या प्रश्नाला उत्तर देत, नि अर्धवट स्वतःचे गूढ विचार बोलून दाखवीत जिजी म्हणते, " पुरा उलगडा होतो तरी कशाचा ? इतकी म्हातारी झालें—आता वाटत, सगळच अपुर राह्यलय् म्हणून जग चाललय्. पुर झाल तर जगरहाट बंद पडेल."

गप्प बसून फिरून ती मुकुलला म्हणते, " अग, तूच एकटी का आईविना वाढलीस ? हिंमत, दौलत यांना तरी कुठं ठाऊक आहे त्यांची आई ? तुझ नडल नाहीं तुझ्या आईवाचून नि ते दोघे तर पुरुष. त्यांच आता काय अडणार आहे त्यांच्या आईवाचून ? विचारलाच प्रश्न आईबद्दल कधीं तर हिंमत विचारील, पण दौलतच्या तोंडून नाव नाहीं निघायच आईच. त्याच आहे बोक्यासारख. घरातल्या माणसांपेक्षा घराचीच त्याला ओढ. त्याच्या गलबतावर तो असला की झाल. त्याला मग भाऊ नाहीं नि बाप नाहीं, आणि आईची तर जाणीवच नाहीं. विचारल तर तो सांगेल कीं, 'मी या गलबतावरच जन्मलों. आईन दिला जन्म, का समुद्रातून वर आलों, का आकाशातन पडलों, कुणास ठाऊक ! "

जिजी आणि मुकुल दोघीहि घराच्या पुढच्या पडवीत बसल्या होत्या. तिथून दूरवर पसरलेला बंगालचा उपसागर पश्चिमेला दिसत होता. चितगांव जिल्ह्यांतील 'कर्णफुली' नदीच्या मुखाच्या दक्षिणेस एक छोटी कोळ्यांची वाडी होती. चंद्रदत्त चट्टोपाध्यायांनीं आपलं घर त्या रम्य ठिकाणीं बांधून झाल्यावर त्या वाडीलाच 'कर्णफूल'

अस सुसस्कृत नाव हौसेन दिल होत. येवढच नव्हे तर तिथल्या साऱ्या कोळयांना देखील 'कर्णफूल' या अवघड नावानच नेहमी वाडीचा उल्लेख करण्याबद्दल ते आग्रह करीत. इतक्या दिवसांच्या प्रयत्नान आता त्याच तें नावच रूढ झाल होत.

त्याच्या सुस्थित घराच नाव त्यानीं 'प्राचीन' ठेविल होत. बगालच्या उपसागराच्या पूर्वेकडील-- प्राची दिशेकडच तें प्राचीन असा ते खुलासा करीत.

'प्राचीन' होत साधच, पण अतिशय रम्य. चितगाव जिल्ह्यांत पावसाची रेलचेल असल्यान व मुलूख डोंगराळ असल्यान झाडां-झुडपांनीं सर्व कसं भरलेल असत. या ठिकाणीं तर समुद्रकिनाराच डोंगराळ होता. आणि खुद्द 'प्राचीन'च्याच पिछाडीचा डोंगर चागला १५०–२०० फूट उच होता. घराच मागच दार उघडल की डोंगर-चढणीला सुरुवात, नि घरापुढच्या पडवीच्या पायऱ्या उतरल्या कीं समुद्रतीराच्या रेतीवरच पाय पडे. आणखी शभर कदम पुढ गेलं कीं, समुद्राच्या लाटा पायावर लोळण घेऊ लागत. घरामागची हिरवी-चार वनराई, घरापुढच्या पाढऱ्या शुभ्र रेताडाची अरुंद पट्टी, त्यापुढचा प्रथम गढूळ, मग फिकट हिरवा, मग हिरवा नि मग निळा होणारा समुद्राचा व्याप. इतक्या रगरुचिर प्रदेशावर सध्याकाळच्या बुडत्या सूर्यान आपली जादूगिरी केली की, या सर्व देखाव्याला किती अनुपम अवर्णनीय शोभा येत असेल!

चंद्रदत्त चट्टोपाध्याय घरातून बाहेर येत म्हणाले, "दिसल का नाहीं अजून गलबत?"

आपल्या संभाषणातून जरा नाखुषीनच थाबत मुकुल म्हणाली, "छे! मला तर नाही दिसत अजून कुठ."

"तुझं नाहीं लक्ष, म्हणून नाही दिसत. ते बघ दूर त्या बाजूस. अग, माझ्या जाड चाळशीवाल्या डोळयांना दिसत नि तुला कसं दिसणार नाहीं?"

" होय कीं!"

दूरवरून एक गलबत डौलान येत होत. समुद्र प्रशान्त होता. वाऱ्याच्या झोतान अवजार खचून भरली होतीं. पाढऱ्या हसान पिस फुगवावीं तसं तें दिसत होत. त्याच्या उच्च डोलकाठ्याची मिळून एकच रेघ हसाच्या मानेसारखी दिसत होती. आणि जलपृष्ठावरील हसाच्याच सहजसुलभ नि यत्किंचितहि आवाज न होणाऱ्या गतीन ते गलबत पुढें सरकत येत होत.

मुकुलन आतून जाऊन दुर्बिणीच लाब नळकाड आणल आणि त्यातून ती गलबत न्याहाळून पाहू लागली.

" जिजी! मी हिमत नि दौलतला कित्ती लहानपणी पाहिलेल आहे. आता ते कसे दिसत असतील कोण जाणे. दुर्बिणींतून मला सारी हालचाल दिसत आहे, पण ते दोघ काहीं ओळखू यायचे नाहींत."

" चागले मोठे झाले असतील ते. आता दोघानाहि पचविसाव वर्ष लागल आहे. त्यांना कान्होजीराव घेऊन गेले गलबतावर तेव्हा दहा दहा वर्षांची शेंबडीं पोर होती तीं." जिजी म्हणाली.

" बाबा! पण हेच का कान्होजीरावाच गलबत? नाही तर असेल दुसर कुठल."

" वाः! अग, कालच ना त्या कळसू कोळ्यान निरोप आणलेला तू स्वतः ऐकलास, की 'सायतारा' अक्याबाहून परवा निघाली म्हणून, नि आज इथ पोचेल म्हणून?"

" हो, पण दुसरीहि गलबतं आज यायचीं नसतील का?"

" असतील, पण जीं येतील तीं 'कर्णफुली'च्या खाडींत जाण्यासाठी अजून खूप दूर अतर ठेवतील, किनाऱ्यापासून आपल्या घराजवळच्या तीरावर इतकीं तीं अलीकडे यायचीं नाहींत."

'सायतारा' गलबत आतां पुष्कळ जवळ आलं होत. त्याच्या डेकवर चाललेली खलाश्याची हालचाल स्पष्ट दिसत होती.

गलबताच्या पुढच्या बाजूस नागर टाकण्याच्या तयारींत पांच-सहाजण होते. नागर त्या गलबताच्या नाळेच्या डाव्या कडेवरून बाहेर लोंबकळत ठेविला होता. नागराचा दांडा नुकताच आडवा करून, नागराला साखळदंड बांधून तो सोडण्याची सारी सिद्धता होती. समुद्राकडून येणाऱ्या वाऱ्यामुळें जहाजावरचे आवाज दूरवरून ऐकू येत होते. फक्त येवढच होई की दृष्टीला एखादी हालचाल प्रथम दिसे नि मग आठ-दहा सेकदानी तिचा आवाज ऐकूं येई.

मुकुल तर त्या देखाव्याच अवलोकन करण्यात गुग्न गेली होती. तारुण्यसुलभ ताजीतवानी ग्रहणशक्ति आणि सारे जगव्यवहार पाह ण्याच औत्सुक्य यामुळे नागरटीस येणाऱ्या गलबताच्या सध्याकाळच्या तिरप्या झालेल्या उन्हातील त्या नयनमनोहर देखाव्यान तिच मन रमून गेल होत.

गलबताची बहुतेक अवजार उतरवून बाधलेलीं होतीं. डोलकाठी-वरच्या आडव्या दाडीवर गोळा झालेल अवजार रश्शानीं बाधल होत. इतर अवजार त्याच्या नाड्यानीं आकरसून ओढल्यामुळ डोलकाठीसलग बाधलीं गेलीं होती. फक्त एकच छोट अवजार शिल्लक होत, त्याच्यामुळं गलबत अगदी हळूहळू पुढ सरकत होत.

एक खलाशी गलबताच्या एका बाजूवरून पुढं रेलून उभा होता. त्याच्या कमरेभोंवतीं गोणपाटाचा पट्टा आधारासाठीं बाधला होता. डाव्या हातांत खुणा केलेल्या दोरीची वेटोळीं होती. उजव्या हातानं तो त्या दोरीच शिशाच जड वजन बांधलेल टोक लबकासारख पुढ माग झोकून नतर एकदम सोडून देई, त्याबरोबर तें वजन पाण्यात बुडे, आणि तळाला लागेपर्यंत त्याबरोबर दोरीहि बुडे. जहाज पुढ जातां जाता त्या वजनावर आलं की खलाशी दोरी ताठ करून पाण्या-लगत कोणती खूण आहे ते पाहून पाण्याची खोली अजमावी आणि मग तें वजन मागें राहून तिरपी झालेली दोरी उजव्या हातानं पुन्हा वर खेचीत डाव्या हाताच्या पजात फिरून तिचीं वेटोळी घालीत

संथपणें पण खड्या सुरात गाण गायिल्याप्रमाण "साडी ऽऽऽ चार बाम" किंवा "ती ऽऽऽ बाम दो ऽऽ हात," किंवा "दो ऽऽ बाम एक बिलीस" अशी मापलेली पाण्याची खोली कप्तानाला ओरडून सागे. दूरवरून मोटेवरच्या शेतकऱ्याच गाण ऐकू येत तद्वत् त्या खलाशाच्या पाणी-मापणीचा मधुर स्वर कर्णी पडत होता.

होकायत्राजवळ उभ्या असलेल्या हिंमतन किनाऱ्यावरची एक टेकडी बरोबर पूर्वेस आणि दुसरा एक खुणेचा स्तभ ईशान्येस आल्याची खात्री करून घेतली. पाणी मापणाऱ्या खलाशाच्या शब्दा-कडे एकदा कान दिला आणि नागरटीसाठीं अगोदर ठरविलेल योग्य स्थळ आल्याचं दिसताच खणखणीत आवाजान नागर टाकण्या-बद्दलची हाकाटी दिली.

धप्पदिशीं जलपृष्ठावर आदळून पाणी उडवीत नागर खालीं गेला आणि त्याच्या मागोमाग खळखळत वेगान साखळदड जात होता. एक खलाशी तो साखळदड थाबवीत थाबवीत सोडीत होता, त्यामुळ नागरावरच साखळदंडाचीं वेटोळी पडून गुतागुत होण्याची भीति नव्हती. नागरामाग साखळदड तिरपा होऊन गलबताच्या नाळे-पर्यंत आलेला होता. प्रत्येक पंधरा बाम साखळदड पाण्यात गेला कीं त्याच्या कडीवरची खूण पाहून तितके ठोके एक खलाशी शेजारच्या घंटेवर बडवी, आणि त्याकडे हिंमत लक्ष देऊन ऐके. पाण्याच्या खोलीच्या पाच-सहापट लाब इतका साखळदड पाण्यांत सोडल्याच घटेच्या टोल्यावरून कळताच हिमतन 'पुरे' अशी हात उभवून खूण केली.

नाळेवरून पुढ वाकून दौलतन नागर समुद्रतळात नीट रुतून साखळदडावर गलबताचा जोर नीट आला अशी कांहीं वेळ थांबून खात्री करून घेतली, आणि नागरट झाल्याच हिंमतला ओरडून सांगितल.

डेकवरची व अवजारांची आवरासावर करण्यास निरनिराळ्या

खलाशांना पिटाळून दौलत ढागा टाकीत आला आणि हिंमत व कान्होजीरावाना म्हणाला,

" चट्टोपाध्यायाच्या घरी पुढच्या गच्चीवर ते सर्व आपली वाट पाहत थाचलेले दिसताहेत, नाही ? "

कान्होजीराव म्हणाले, " होय, त्याच्याकडेच पाहत आहे मी दुर्बिणींतून– ती मुकुल, ती जिजी–नि ते चद्रदत्त."

हिंमत म्हणाला, " दौलत, मी एकवार फेरी मारून सार ठीकठाक आहे पाहतो, सारंगाला रात्रीसाठी सारे हुकूम वगैरे सागतो, तोंवर छोट होडग उतरवून शिडी जवळ आणीव. मग लागलीच किनाऱ्या-वर जाऊ."

'सायतारा' गलबताची नांगरट पुरी झालेली पाहिल्यावर इकडे चंद्रदत्त चट्टोपाध्याय, जिजी आणि मुकुल खाडीच्या तोंडच्या छोट्या लाकडी धक्क्यावर त्या साऱ्याचं स्वागत करायला निघालीं. मुकुल तर हरिणीसारखी उड्या मारीत धावत जात होती. पधरा वर्षांपूर्वी आपल्याशी खेळणारे आपले बाळपणांतील दोन सवगडी आता फारा दिवसानीं भेटणार याच आनदात ती होती. आपल्या वडिलांच्या नि तिला लहानाची मोठी करणाऱ्या जिजीच्या सहवासांत तिन शिशुपणाची सरहद्द ओलाडून यौवनात केव्हा प्रवेश केला हे तिला कळलहि नव्हतं. 'कर्णफुलां'त दुसरी माणस त्यांच्याशी मिसळणारी नव्हतींच कोणी फुलपाखरासारखं स्वच्छद बागडाव, समुद्रतीराच्या रेतींत बागडाव, समुद्राच्या लोळत्या लाटात डुबाव, कोळ्याच्या मच्छीमारीत भाग घ्यावा, कोळ्याच्या बायकाप्रमाणंच खुल्या दिलानं सर्वांशीं बोलाव, घरामागच्या डोंगरात हरिणामाग धावाव, पाखरांच्या किलबिलाटाच्या व निरनिराळ्या तऱ्हेच्या पक्ष्याच्या आवाजांच्या हुबेहूब नकला कराव्या, कधीं जिजीला घरकामात मदत करावी, तर कधीं चद्रदत्ताच्या कामात त्यांना मदत करावी, व नेमान त्यांच्याजवळ शिकाव, हा तिला कळं

लागल्यापासून तों आत्तापर्यंत म्हणजे ती १९ वर्षांची होईपर्यंतचा तिचा कार्यक्रम होता.

निसर्ग हिशोबात नेहमीं चोख असतो. त्याच्या शिस्तींत वागणाऱ्याच्या सुदृढतेत व शरीरसंपत्तींत तो तितक्याच सढळ हातानं सव्याज भर घालतो.

मुकुल म्हणजे तर निसर्गाची फुलराणी होती. शहरच्या खोट्यानाट्या कृत्रिम बंधनाच्या व चालीरीतींच्या बाहेरच्या मोकळेपणात, व अत्यंत आदर्श नैसर्गिक वातावरणात ती लहानाची मोठी झाली होती. आणि त्याचा प्रभाव तिच्या तल्लख बुद्धिमत्तेत आणि असाधारण शरीरसौंदर्यामधे दिसून येत होता.

मुकुलचे ओठ पोंवळ्यासारखे नव्हते, पोंवळीं तितकीं सुंदर कशी असतील ? तिचे डोळे कमलाप्रमाणं नव्हते. बोलून चालून, पंकजाला तिच्या नेत्रांएवढं तेज कुठच लाभणार ? तिचा वर्ण केतकीचाहि नव्हता कीं गुलाबाचा नव्हता, कुठलाच वर्ण तिला उसना नको होता. सृष्टींतल्या साध्या वस्तूंत कुठंहि न आढळणारा असा परिपूर्ण सुंदर, खुद्द मानवी त्वचेचा अनुपमेय रंग तिच्या तोंडावर झळकत होता.

सृष्टिनिर्मात्यानं सारी यच्चावत् सृष्टि निर्माण केल्यावर मगच त्या अनुभवानं कसलेल्या हातांनी स्त्रीदेहाची घडण केली. या सौंदर्याच्या चढत्या भाजणींत शिखरावरच्या कळसाला पायातल्या दगड, माती, चुन्याच्या मापानं कां उपमा द्यायच्या ? कळसाला उपमा द्यायचीच तर त्याहि वरच्या सोनेरी ढगाच्या तेजाची ना ? मग मुकुलचं सौंदर्य असं होतं नि तसं होतं म्हणून कुठवर सांगायचं ? सौंदर्याची परिसीमा म्हणजे मुकुल होती. त्याहून सुंदर असणं आणि स्वर्गीची देवता असणं यांत फरक नव्हता.

पंधरा वर्षांपूर्वीचे हिंमत नि दौलत तिच्या डोळ्यांना अजून दिसत होते; आणि पंधरा वर्षांपूर्वींचीच मुकुल हिंमत-दौलतला आठवत होती; त्यामुळं त्या सर्वांचीच दृष्टिभेट झाल्यावर जुन्या स्मृतींत आणि प्रत्यक्ष

समोर दिसणाऱ्या व्यक्तींत केवढ महान् अतर पडल आहे हे पाहून तीं सारींच स्तिमित झालीं.

होडग हलकेंच अल्लद आणून पायऱ्याच्या कडेला लावून हिंमत वल्ह उभवून सथ बसला. पायऱ्यावर उभ्या राहिलेल्या मुकुलकड त्यान पाहिल नि त्याची वाचाच बसली क्षणभर. साऱ्या शारीरिक शक्ति डोळ्यानी क्षणभर उसन्या मागून घेतल्या, नेहमींची ग्रहणशक्ति मुकुलला पाहायला अपुरीच पडली जशी काही.

पण दौलत जास्त व्यवहारी होता. हिंमतच्या स्वभावाच्या सूक्ष्म छटा त्यांत नव्हत्या. हिंमतचा स्वभाव आकाशाच्या गूढ नि कोमल रंगाच्या हळुवार व बदलत्या छटासारखा होता, तर दौलतचा स्वभाव निवडुंगाच्या लालभडक बोंडाप्रमाण अगदी कठोर आणि रगेल होता.

दौलतन कान्होजीरावामागोमाग ताडदिशीं पायऱ्यावर उडी मारली आणि तो धावत वर गेला. “ अरे बाप रे ! अग मुकुल, मला कल्पनाहि नव्हती, कीं लहानपणच्या शेंबड्या पोरीची येवढी सुदर मुलगी होऊ शकते ! ” अस म्हणत मुकुलला मिठी मारीत त्यान लहानपणचीच सलगी दाखविली; आणि हसत हसत मुकुलनहि त्याच्या पाठीवर धपाटा मारला. मग दौलतन जाऊन जिजीला मिठी मारली आणि तिचा मुकाच घेतला, आणि वात्सल्यान आनदून पण कृतक कोपान जिजी म्हणते, “ दौलत, अरे तुला मोठेपणा केव्हा यायचा ? काय रे हें वेड्यासारख ! ”

चद्रदत्त चट्टोपाध्याय, कान्होजीराव, जिजी व दौलत विचारपूस करीत घराकडे चालू लागलीं तेव्हा हिंमत होडग्यातून उठला. त्यानं शातपणें होडग नीट बांधून ठेवल.

वरच्या पायरीवर त्याच्याकडे पाहत मुकुल चित्रासारखी उभी होती, आणि तळच्या पायरीवर खळाळणाऱ्या पाण्यांत पाय ठेवून हिंमत उभा होता. त्यान हात पुढ केले आणि तो वर चढू लागला. आणि त्याच्या हाती देण्यासाठीं आपले हात पुढं करून मुकुल एक-

एक पायरी उतरून खाली येऊ लागली. त्यांची दृष्टि एकमेकांवर खिळली होती, ओठ अर्धवट उघडले होते.

मुकुलची पायरी चुकली नि ती तोल जाऊन पाण्यात पडली. तिच्या मागोमाग उडी मारून हिमत पाण्यात पडला. तीं दोघ ओलींचिंब होऊन ठिबकत पुन्हा पायऱ्यावर चढून बसली शेजारी-शेजारीं. मुकुलचे सारे केस भिजून डोक्याला घट्ट चापून बसले होते, आणि मधल्या भागापासून कानाच्या पाळींपर्यंत दोन्ही बाजूला आल्यान चेहऱ्याला त्याच मखर केल्यासारख दिसत होत. तिच्या वक्षःस्थलाला साडी घट्ट बिलगली होती. तशा स्थितींत मुकुलला जवळ ओढून हिमतन तिला हाक मारली प्रथमच, " मुकुल ! "

त्याला उत्तर आल, " हिंमत—"

जी आजवर झाली नव्हती ती जाणीव मुकुलला हिमतच्या हाकेन आणि स्पर्शान क्षणात झाली. यौवनाच्या प्रातांत आल्याची ग्वाही अगावरच्या रोमाचानीं दिली. अननुभूत प्रेमाच्या पहिल्याच उठलेल्या प्रचड लाटेसरशीं तिचा तोल सुटला. ती लाजली आणि उठून धावत घराकडे निघाली आणि तिच्यामागोमाग हिमतहि धावू लागला. हिमत कांहीं कमी धावणारा नव्हता, पण त्याच्या हातीं मुकुल लागली नाहीं. सर्वांपुढ घरी पोचून तिनं ओले कपडे बदलून, कांहीं विशेष घडलच नाही, असा आविर्भाव केला.

# २

कान्होजीरावाची हिमत नि दौलत हीं जुळीं मुलं. त्याचा जन्म समुद्रावरच झाला. एका पावसाळ्यातील भयकर वादळात 'सायंतारा' सापडलं असताना तें गलबत समुद्राच्या तडाख्यातून वाचविण्याची पराकाष्ठा करण्यात कान्होजीराव गुतला असताना त्याच्या बायकोला दिवस पूर्ण भरण्याच्या जरा पूर्वींच या जुळ्याला जन्म द्यावा लागला. त्या दोघांना जन्म देऊन ती आई मेली, आणि तिच्या सोबतीसाठीं आलेल्या जिजीन त्या जुळ्याचा कसाबसा जीव बचावला.

समुद्राच्या अत्यंत भीषण वादळात जन्मलेलीं ही दोन पोर म्हणून कान्होजीन त्यांची दर्यादौलत व दर्याहिंमत अशीं नांव ठेवलीं होतीं. आणि ते दोघेहि मोठे दर्यावर्दी होणार अशी त्यान मनाशीं खूणगाठ बांधली होती.

त्या वादळातून बचावल्यावर कान्होजीन 'सायतारा' जवळच्या चितगांव बदरी नेलं; आणि आपल्या चागल्या ओळखीच्या चद्रदत्त चट्टोपाध्यायाच्या घरीं जिजीजवळ त्यांना ठेवल. जिजी ही खरी दाई; पण तिनं त्यांना आईइतक्या वात्सल्यानं लहानाचे मोठे केले.

येवढच नव्हे तर, खुद्द चद्रदत्त चट्टोपाध्यायाची बायकोहि पुढ वारल्यावर त्याची मुलगी मुकुलसुद्धा तिच्याच गळयात पडली.

जिजीच्याजवळ दौलत आणि हिंमत हे दहा वर्षांचे झाल्यावर कान्होजीरावानीं त्याना आपल्याबरोबर बोटीवर नेल, आणि तेव्हापासून आजपर्यंत जवळ जवळ पधरा वर्ष ते दोघे कान्होजीरावाच्या तालमींत उत्तम दर्यावर्दी तयार झाले होते.

या पधरा वर्षांत 'सायतारा' जरी अनेकदा चितगावला आली होती तरी दौलत-हिंमत आलेले नव्हते. सर्व तऱ्हेच्या गलबताचा, साऱ्या देशोदेशीच्या बदराचा, पाची समुद्रातील साऱ्या व्यापारी गलबताच्या मार्गाचा परिचय आणि आत्मविश्वास वाढावा म्हणून त्या दोघानाहि कान्होजीरावानीं 'सायताऱ्या'वरच सारख न ठेवता निरनिराळ्या इतर गलबतावर एकटे एकटे ठेवून सफरी करण्यास धाडल होत. त्यात त्याच्या जगभर सफरी झाल्या. अस सार दर्यावर्द्याच सर्वांगीण शिक्षण त्याना देऊन झाल्यावर त्या दोघांना त्यांनीं फिरून आपल्याजवळ सायताऱ्यावर आणल होत. आणि त्याच्यावर हळूहळू साऱ्या गलबताच कामधाम सोपवून ते स्वतः त्यातून अग काढून घेत होते. फक्त व्यापार कोणता करावा, कोणत्या बदरीं केव्हा जाव, कोणत्या मालाची ने-आण करण जास्त किफायतशीर होईल, असल्या स्थूल धोरणाच्या गोष्टी ते ठरवीत. आणि हिंमत व दौलत मिळून आळीपाळीन नौकानयन, गलबताचीं दैनदिन काम, मालाची चढउतार व राखणी यावर देखरेख, हिशेब, अन्नपाण्याची तरतूद व साऱ्या गलबतांवरच्या लोकावर शिस्तींत हुकमत ठेवण इत्यादि काम बिनबोभाट करीत.

पूर्वीच्या काळीं अनेक दर्यावर्दी आपल्या मालकीचीं गलबत ठेवीत. इतर कोणाच्या मालकीच्या गलबतावर कप्तानाच काम करण्याऐवजीं स्वतःच गलबत ठेवण सोयीच पडे. आपल्या मालकीच गलबत हव त्या ठिकाणीं हवं तेव्हां नेता येई, आणि फायदा झाला कीं त्यांत दुसरा वाटेकरी कुणी नसे. शिवाय दुसऱ्याच ताबेदार

असण्यापेक्षा 'हम् करे सो. कायदा' अशी स्वतंत्र वृत्तीच कुणालाहि आवडणार. अगोदरच दर्यावर्दीचं आयुष्य म्हणजे किती निर्बंध, आणि त्यांत मालकीचं गलबत असलं म्हणजे तर त्या कप्तानाला जाब विचारणारा कोण? मोकळ्या समुद्रावरच सारं त्याचंच राज्य. त्याच्याहून मोठा म्हणजे जणू काहीं फक्त देवच; अशा आत्मनिष्ठ वृत्तीनं ते वागत.

घरीं संध्याकाळीं जिजीनं जेवायला मोठा सुंदर बेत केला होता. सायंतार्‍यावरचा स्वयंपाक्या तरबेज असला आपल्या कामात, तरी जिजीच्या सुग्रणपणाची सर त्याला कुठली येणार? आपलीं दोन पोरं-तीं दुसर्‍या आईच्या पोटीं आलीं होतीं ही भावनाच उरली नव्हती जिजीला— इतक्या वर्षांनीं आलीं आपल्याजवळ याच आनंदात ती होती. दौलतला काय आवडतं, हिंमतला काय आवडत, कान्होजीरावाला मासा तळलेला आवडतो की परतलेला, तें सारं लक्षात घेऊन तिनं सार्‍यांच्या आवडी केल्या होत्या.

जेवण झाल्यानंतर गच्चीवर खुर्च्या टाकून चंद्रदत्त नि कान्होजीराव बसून गोष्टी करीत होते.

"आतां इथून कलकत्त्याला गेलात, कीं मी सांगितलेलं काम करा. तुमचं हे धान्याधुन्याचं ने-आणीचं काम काहीं मोत्यांच्या व्यापाराइतकं किफायतशीर होणार नाहीं."

"अहो, मोत्यांचा व्यापार केला तरी काही मोत्यांनीं सारं गलबत भरत नाही! नाही तरी इतकी थोरली जागा उरणार, त्यांत भरताड भरायचं त्यापेक्षां थोड्या कमी किंमतीचा का होईना, माल न्यायला काय हरकत? शिवाय मी मोतीं आणले तरी बाजारात चांगल्या व्यापार्‍याच्या हातून ते विकले पाहिजेत."

"त्याचसाठी तर मी तुम्हांला सांगत आलों आहे, कीं तुम्ही नैनीबाबूच्या पेढीशीं व्यवहार सुरू करा. नैनीबाबूचा हिर्‍यामोत्यांचा व्यापार प्रख्यात आहे. आणि तो जरी नुकताच फार वय होऊन मेला तरी त्याची पेढी चालूंच आहे."

"नैनीबाबू मेला तर!— चांगला होता माणूस." कान्होजीराव म्हणाले, "मग आता त्याचा व्यापार त्याचे मुलगे पाहतात वाटत?"

"छे हो! नैनीबाबूला संपत्ति मिळाली, पण संतति नाही. त्यासाठी त्यान पुष्कळ उपाय करून पाहिले येवढच नव्हे, तर त्याची बायको नुकतीच मेली, तरी इतक्या वृद्धपणी एका तरण्याबाड पोरीशी त्यान लग्न केलन्, की तिला तरी काहीं पोरबाळ होईल."

"मग नैनीबाबूची पेढी कोण चालवत?"

"अहो, ती तरणी विधवाच पाहते सारी व्यवस्था स्वतः! प्रथम प्रथम लोकानी खूप नावं ठेवलीं, काहूर उठवल तिच्याविरुद्ध. दत्तक घे म्हणून तिच्यामाग टुमण लावल. पण तिन सर्वांना धाब्यावर बसवल. नैनीबाबूना दुसरा जवळचा नात्यागोत्याचा कुणी नव्हता. तेव्हा वारसाची किंवा भाऊबंदकीची भानगडहि तिच्या सुदैवान नव्हती. येवढी सारी मालमत्ता फक्त नैनीबाबून एकट्याच्या कष्टान मिळवली. आणि आता त्या साऱ्याची मालकीण ती एकटी आहे. फारच धूर्त नि चाणाक्ष आहे ती. तिन सारा व्यापार स्वतः लक्ष घालून उत्तम चालवला आहे. ती कुणाची भीडभाड बाळगीत नाही नि कुणाची पत्रास ठेवीत नाही. तिची तडफ कळल्यान कुणी तिच्याशीं जास्त बोलायला धजत नाहीं. संपत्तीची कृपादृष्टि असल्यावर कुणालाहि जगाशी फटकून वागतां येत."

यावर काहीं वेळ विचार करीत कान्होजी गप्प होता. नेहमीच्या चंद्रदत्ताच्या हुक्क्याला आज रजा मिळाली होती. कान्होजीरावानी परदेशाहून आणलेल्या उंची तमाखूचा आस्वाद ते घेत होते.

"मी नैनीबाबूकडे एकदोन वेळा कामानिमित्त गेलों होतो, पण आता या, तुम्ही म्हणतां त्या स्थितीत, त्याच्या बायकोकडून असल्या व्यापार वाढविण्याच्या धडाडीच्या पण धोक्याच्या कल्पनांना थारा दिला जाईल अशी अपेक्षा चुकीची ठरेल." कान्होजीरावांनी सांगितल.

"नाही. चुकता आहा तुम्ही इथ. मीं या बाईला पाहिली आहे. तिच नाव आहे 'राणी'; आणि नावाला साजेशी तिची महत्त्वाकाक्षा दाडगी आहे. एका अठराविश्वे दरिद्री कुळात ती जन्मलेली नि वाढलेली असल्यान व्यवहारांत ती अगदी पक्की आहे. नैनीबाबूला इतक्या वृद्धापकाळीं लग्नाला कुणी मुलगी मिळेना म्हणून हिच्या आईबापानीं पैशासाठी तिला नैनीबाबूला विकली. आणि त्यामुळ तीहि तितकीच कठोर झालेली आहे. ती म्हणते, 'मला विकलीत पैशाला मुलून तेव्हा काही तुमची माया वाया गेली नाही ना? मग आता मुलगी मेली असच समजा. माझा नवरा गेला, नि आता साऱ्या सपत्तीची मी मालकीण झाले एकटी. काय करायच, कस वागायच ते माझ मी पाहून घेईन.' तमाखूचा झुरका मारून चद्रदत्त पुढ म्हणाले, "तुम्ही एर्वीतेर्वी कलकत्त्यास जाता आहा, मग एकदा तिची भेट घेऊन, समक्ष तिला या व्यापाराची कल्पना सुचवून का पाहत नाहीं? पटली तर छान झाल, न पटली तर ही आपली गाजराची पुगी!"

"हें पाहा चद्रदत्त! तुमची कल्पना काही वाईट नाहीं, पण तीच जरा जास्त वाढवून मी म्हणतों कीं, मग तुम्हीच स्वतः चला आमच्याबरोबर कलकत्त्याला. त्या-राणीबाईची गाठ घेऊन बोलणचालण करायला तुमची फार मदत होईल अनायासे, नि तुमची फेरी होईल कलकत्त्याला मजेत."

ही गोष्ट चद्रदत्त चट्टोपाध्यायाना पसत पडली. पण त्यानीं एकट्यानींच जाण्याऐवजीं, जिजीं व मुकुल यानींसुद्धा बरोबर जाव अस शेवटी ठरल.

* * *

जिजी बाधाबाध करण्याच्या गर्दीत होती नि मुकुल मधेंच एका चटईवर ठिय्या मारून बसली होती. तिला जिजी म्हणते, "अग मुकुल! ऊठ. कांहीं तयारी करायला लाग. कलकत्त्याला जायच,

तिथ इथल्यासारख वागून नाहीं चालणार तुला. तिथ जरा तुला नीटनेटकं राहायला पाहिजे."

मुकुलच लक्षच नव्हत. ती खिडकींतून दूरवर समुद्रतीराकडे पाहत होती.

तिच्या पाठीवर प्रेमान चापट मारून जिजी म्हणते, " अग, मी तुझ्याशीं बोलते आहे— ऐकलस का ? "

" अऽ — काय जिजी ? "

" पुन. तेच ! अग, बांधाबांध नाहीं करायची का तुला ? "

" तूच कर कीं जिजी."

' का ? तुला नाही का यायच कलकत्त्याला ? "

" यायचय् तर ! वाऽ ग. पण आपण किती दिवस राहू ग तिकड ? "

" पधरा-वीस दिवस — कदाचित् जास्त."

" मग राहू दे तयारी. मी आपली समुद्रतीरावरन हिडून येतें एकदा. नाही तरी आजच्या जेवणाला मासे आणायचेच आहेत ना, ते मी आणते, अ ? माझी तयारी तूच कर बर का." अस म्हणत मुकुल तेथून पळालीच. आणि सारी तयारी करीत तोंडानं काहीं तरी बोलायच म्हणून जिजी म्हणते, " कस बाई या पोरीच व्हायचंय् पुढ कांही समजत नाही मला ! "

* * *

समुद्रकिनाऱ्यावरून चालणाऱ्या हिमतला चाहूल लागली, आणि त्यान माग वळून पाहिल. मुकुल मागून धावत येत होती. तो थाबला नि वळून तिच्याकडे पाहत उभा राहिला.

" का ग धावत आलीस ? काहीं निरोप-बिरोप आणला आहेस की काय ? "

" होय. जिजी म्हणते आहे की हिमत लहानपणापासूनच असा चमत्कारिक आहे."

"म्हणजे कसा काय बुवा?"

"तुला एकटीला रडत टाकून आपण खेळायला निघून जाई."

"अय्याई! मग आता काय त्याच?"

"मी तुम्हाला सांगायला आलें की अजून तुम्ही तसेच आहात."

"पण मुकुल, तू मात्र लहानपणसारखी नाहीस आता."

"मग मी कशी आहे तर?"

"ते सांगायला वेळ लागेल खूप तेव्हा सांगेन सवडीन. आता मी गर्दीत आहे. मला 'सायताऱ्या'वर गेल पाहिजे."

"मलाहि काम आहे बर का. मला जेवणासाठीं जिजीन मासे आणायला सांगितल आहे. तुम्हालाच एकट्याला काम नाही कांहीं!"

"अग, पण मला तू 'अहो-जाहो' का म्हणू लागलीस मुकुल?"

"तेंहि सांगायला फार वेळ लागेल. मला काम आहे आत्ता—तुम्ही बरोबर आलात माझ्या कोळयाच्या वाडीपर्यंत, तर सांगेन कदाचित् आत्ताच"

"अस्स होय, चल तर." असं म्हणून हिमत धक्क्याकडे जाण्या ऐवजी मुकुलच्याबरोबर कोळयाच्या वाडीकडे निघाला. मुकुलच तोंड प्रफुल्ल दिसत होत, नि समुद्रावरच्या वाऱ्यान तिचे केसहि उडत होते. तिच्याकडे हिमत पाहत चालला होता. आणि तो आपल्याकडे पाहतो आहे हे ओळखून, पण सरळच पुढे पाहत ती चालली होती.

हा सारा किनारा त्याच्या पूर्ण परिचयाचा होता. लहानपणीं दौलत, हिमत नि मुकुल या तिघांनीं त्यावर बागडण्यात दिवसचे दिवस घालविले होते.

या पधरा वर्षांनी सुद्धा त्या तिथल्या देखाव्यात काही फरक नव्हता. अगदीं जस्सच्या तस्स होत सार. मुकुल मोठी झाली होती पण तिला 'कर्णफुला'च्या बाहेरच्या जगाचा पत्ता नव्हता.

उलट दौलत नि हिंमत पधरा वर्षं चार बंदराचं पाणी पिऊन आले होते. दौलतचा स्वभाव त्या अनुभवानं जास्तच बेफिकीर, धाडसी आणि रंगेल झाला होता, तर हिंमतचा स्वभाव खोल, एकलकोंडा आणि भावनाप्रधान झाला होता.

कोळ्याच्या वाडीजवळ ते येतात तो दौलत तिथूनच बाहेर आला. त्याला पाहून हिंमत आश्चर्यचकित झाला.

"अरे, तू गलबतावर ना गेला होतास?"

"तिकडेच जाणार आहे आता— पण जाण्यापूर्वी म्हटल माझ्या लहानपणची माणस कशी दिसताहेत तीं तरी पाहावी. अरे, ती सारीं लहानपणचीं कोळ्याचीं पोरं केवढी झालीं आहेत मोठी मोठीं!"

त्याच्या मागोमाग वरुणा नावाची कोळीण आली. ती म्हणत होती, "अवो! ही पिशवी विसरलासा जनू"

ती घेऊन दौलत जास्त न थाबता तसाच निसटला तिथून.

हिमतन भेदक नजरेन दौलतकडे पाहिल, वरुणेकडे दुर्लक्ष केल, नि मुकुलचा हात धरून तिला पुढ ओढल. आणि ती काहीं वरुणेला विचारणार त्यापूर्वीच आपण एकदम बोलायला सुरुवात केली.

"मुकुल! तुम्ही सर्वजण कलकत्त्याला येणार तर? तुला उत्सुकता वाटत असेल नाहीं कलकत्ता पाहायची?"

"वाटते थोडी, पण 'सायतारा' पाहायची उत्सुकता मला जास्त वाटते, काल तुम्ही ती नागरली त्या वेळचा देखावा मी पाहत होतें. कित्ती आवडला मला तो. आपणहि त्याच बोटीवर सारखे राहूं शकलो तर कित्ती छान होईल अस वाटं लागल मला."

"आहे खरच 'सायतारा' छान. माझा तर त्या गलबतावर फार जीव आहे."

इतक बोलतात तों तीं कळसू कोळ्याच्या झोपडीशीं आलीं. कळसू त्याच्या लहानपणापासूनच्या ओळखीचा विश्वासू माणूस होता.

"का वो मुकलाबाई! का आलासा? नि ह्ये कोन? अर वाऽर

वा ! ह्ये तर छोट धनीसाब. या धनी." अस म्हणून त्यान हिंमतकडे पाहून त्याला हसत नमस्कार केला.

खालीं पसरून टाकलेल्या मासे पकडायच्या जाळयाला अधून-मधून तुटलेल्या जागीं तो दुरुस्त्या करीत होता.

त्याच्या शेजारीं आणखी दोन छोटीं पोर खेळत होतीं. हिमतनं सहज विचारल, "ही तुझीं का ?"

मुकुल म्हणते, "छे हो ! ती त्याची नातवड, त्याच्या मुलाची नि मुलीचीहि आहेत तिघ मुल."

कळसू म्हणतो, "व्हय धनीसाब. माझ्या मुलाला बी मुल झाल्याती आता. मी बी म्हातारा झालो. आतां आमच्या या मुकुलताईच बी लगीन कराया होव. कुनी शोधून आना नव्ह का ?"

कळसूची घरधनीण इतक्यात बोलण ऐकून बाहेर आली होती, ती म्हणते, "तस कशा होव धनीसाब ! तुमीच करा आमच्या मुकुताईशीं लगन. कशा हैती चद्रावानी जनू. इतक हिडलासा तुम्ही पन पाह्यल्याती का आमच्या मुकुताईवानी पोरगी ?"

मुकुलच्याकडे टक लावून पाहत हिंमत म्हणतो, "खर आहे. तुझ्यासारखी सुदर मुलगी माझ्या तर पाहण्यात नाही आली खरी—पण ते असो. काय रे, तुझ्या मुकुलताईना मासे हवेत, आहेत का ?"

"हैती का ? अस कधीं झालयू. मच्छी आनली, की पहिलं त्यातल मोट मोट निवडूनशानी मुकुताईसाटी ठेवतीया घरधनीन रोज. व्हा तुम्ही पुढ दोघ. मी देतो मच्छी पाठवूनशानी. जा र, बटव्या ! मच्छी चदुरसाह्यबाच्या घराला पोंचीव."

तिथून हिंमत आणि मुकुल परत फिरलीं. पण मुकुलचा चेहरा आरक्त झाला होता.

हिंमतच्या पहिल्या दर्शनान तिच्या मनात प्रणयाची पहिली लकेर उठली, आणि कालच्या आजच्या सहवासान त्या भावनेला जास्त

स्पष्ट मूर्त स्वरूप येऊ लागल. कळसू कोळयाच्या बायकोच्या सूचनेन तिला मनात खूपच आनंद झाला होता, नि ‘खरच बाई, अस झाल तर कित्ती छान होईल अगदीं!’ असेच शब्द तिच्या ओठावर आले होते. पण आजवर कधीहि न वाटलेल्या सकोचान ते शब्द तिच्या ओठावरच राहिले होते. आणि आपल्या सौंदर्याची स्तुति करताना वास्तविक आपल्याकडे टक लावून पाहणारा हिंमतच किती आकर्षक दिसत होता याचा विचार तिच्या मनात घोळत होता. हिमतच्याबरोबर चालण्यातच तिला केवढ सुख वाटत होत. बोलता बोलता तीं धक्क्याशी आली. हिंमत म्हणाला, “मुकुल! जातों अ मी. आता तुला सायताऱ्यावर भेटेन.” त्यान होडग्यात बसून वल्ही हातात घेतली, आणि जणू काही मुकुलची ओळख आहे कीं नाहीं अशा रीतनि दुसऱ्याच गोष्टींच्या विचारात गढून तो वल्हवीत जाऊ लागला धक्कयाच्या एका खाबाला मानेमाग हात ठेवून एक पाय उमवून खाबाला माग टेकून ती रेलून उभी होती. दूर दूर जाणाऱ्या हिंमतच्याकडे तिची दृष्टि लागली होती.

विसाव्या वर्षापर्यंत तिच्या प्रेमाला वाचा फुटली नव्हती, आणि या दीड दिवसात तें प्रकट झालं एवढच नव्हे, तर अशा प्रचड लोढ्यासारख नि अनावर, कीं घाटमाथ्यावरची नदी समुद्रसपाटीपर्यंत जाण्यासाठीं जशी कड्यावरून अग टाकते तस— तिच्या प्रेमोद्भवान तिला झाल होत.

# ३

चंद्रदत्त चट्टोपाध्याय, जिजी, मुकुल सारी कान्होजीरावाच्या बरोबर सायताऱ्यावर आली. खलाशानी शिडी वर ओढून घेतली. होडगं लाकडाच्या कप्प्यातून ओवलेल्या रश्शानी डेकवर उचलून, आडव करून बाधून टाकल.

सारंगाच्या व ताडेलाच्या हाताखालच्या खलाशानीं नागर उचलण्याची सारी तयारी केली.

पुढच्या नाळेवरच्या एका लोखडी कड्यातून नागराचा साखळदड वर आला होता खलाशानीं तोडाशी तो प्रथम रश्शानीं घट्ट बाधला आणि त्याचे वेढे जवळच्या रहाटावर घातले. पीप उभ करून ठेवाव तसा, आकारान डमरूसारखा, हा लोखडाचा रहाट होता. त्याच्या खालीं खोबणी आणि खिट्या होत्या. त्यामुळ तो फक्त एकाच बाजूला फिरे. वरच्या कडेत चौकोनी भोक होती त्यांमधें पांच पाच फूट लाबींचे लाकडी दांडे काढता घालता येत. बैलगाडीच्या चाकाच्या वरची धाव बसवण्यापूर्वी नुसत्या आऱ्या मधल्या ठोकळ्यातून बाहेर आलेल्या दिसतात तसाच तो रहाट मग दिसे. प्रत्येक दांड्यामाग एक-दोन खलाशी रेटायला उभे राहत, आणि रहाट

चक्राकार फिरवीत. एका बाजून रहाटावर सावळदड ओढला जाई आणि दुसऱ्या बाजूला रहाटावरून सुटे झालेले वेढे काढून तो सावळदड त्याच्या डेकच्या खालच्या कोठीत एक खलाशी घाली. घाण्यासारखे रहाटाभोंवती गरगर फिरत खलाशी आपली कुळवाऊ गाणीं गाऊ लागत.

खलाशाच्या टोळक्यांत नेहमी कुणी तरी एक गमत्या प्राणी असतो काम करीत असताना कुणाची तरी टिगल करीत, हसत-खिदळत ते काम करतात. सारगाच्या तुकडीतल्या सहा खलाशात झिलमीट असाच गमत्या नि हुशार होता.

आताहि त्यान रहाटाभोवतीं फिरता फिरता गाण्याचा ठेका धरला, आणि त्याच्याबरोबर सारेजण गाऊ लागले. हीं गाणी कुळवाऊ खारव्याच्या किवा कोकणी भाषेत होतीं. त्यात एक ठरलेल पालुपद असे आणि ते सर्व मिळून आरडून गात. मग ज्याला सुचेल त्यान त्यात मनची भर घालावी आणि नव कडव जोडाव. नव सुचवल नाही तरी जुनीं अनेक कडवीं असतच. तींच आळीपाळीन एक एक खलाशी म्हणे. कडव सपल की, फिरून पालुपदात सगळे सामील होत. रहाट फिरताना सावळदडाच्या कड्या जागोजाग आपटत त्याचा आवाज होई, आणि तळच्या खिट्या खोचणींतून आपटत आपटत खिटखिट आवाज करीत.

हिमतन सारगाला नागर उचलायला मागून खूण केली. त्याबरोबर सारगान खलाशाना “चलो भाई, शाबास! उठाव लगर” म्हटलं. खलाशानी दाडकी उचलून रहाटात बसविलीं आणि ते गरगर फिरू लागले. झिलमिटन गाण सुरू केल. सावळदडाच्या ताठ बाजूवरून ते टणदिशीं उडी मारून ओलाडीत सारग बाजूला उभा राहून लक्ष ठेवीत होता.

झिलमिट गाऊ लागला, “चलो खलाशी....”

त्याबरोबर त्याच्या सोबत्याच्या ध्यानात गाणं कोणतं तें आलं, आणि सारेच मिळून पुढचा चरण म्हणू लागले :

" चलो खलाशी हबेस लगर,
झेप टाकितो पहा समिंदर.
आतुर झाला भेटीलागी
नौकेलाही झाली घाई."

मग सावळ्यानं पुढचे चरण म्हणण्यास सुरुवात केली .

" फिर क्यौं देरी ? सारंगा रे !
कुणी खलाशी चुकला का रे ?"

त्या कडव्याला उत्तर म्हणून झिलमिटनं पुढचे चरण म्हटले. पण तेवढ्यात त्यानं गाण्यातल्या एका सोम्यागोम्या खलाशाच्या नावाऐवजी खुद्द सावळ्याचंच नाव त्यात गोवून दिलं नि सारे खलाशी, सावळ्या आणि सारंग खदखदून हसू लागले.

" तो तर आपला चंगीभंगी
सावळ्याच की रमला रंगी
हा, त्याच्यावर कशी फिदा रे
बंदरामधली सारीं बारे !
दारामागुनि चेहेरे लपती
सावळ्याकडे युवती बघती."

फिरून साऱ्या खलाशानी पालुपद मिळून म्हटलें :

" चलो खलाशी हबेस लगर
झेप टाकितो पहा समिंदर
आतुर झाला भेटीलागी
नौकेलाही झाली घाई."

सारवळदंड रहाटावर गुंडाळला जात होता, तसतशी बोट नांगराच्या जवळजवळ सरकत होती. पुढं सारवळदंडाचगेचर तळावरच्या

चिकणमातीचे लपकेच्या लपके चिकटून येऊ लागले, ते एक खलाशी हातान साफ करून परत पाण्यात टाकू लागला.

झिलमिटन गाण्यातील पुढचा संवाद सुरू केला :

" सावळ्याच कीं हा! का धावे ?
गळ्यात त्याच्या लोंचे दावे "

पुढच्या चरणात, गलबत निघायच्या वेळी बंदरावर विसरून माग राहिलेला खलाशी धावत धक्क्यावर येतो, आणि आपल्याला वर घेण्या-बद्दल आपल्या सोबत्याना विनवितो, असें वर्णन होतें. त्याला उद्देशून पुढचे दोन चरण झिलमिटन म्हटले :

" लागलास पोरीच्या नादी
कालच केलिस ना तू शादी ? "

त्याला उत्तर म्हणून सावळ्यान पुढचे चरण म्हटले :

" होय ! दारुच्या नशेत होतो
सुंदर म्हणुनी भुललो होतो
करीन म्हटलें तिजला दारा
पण तिज पहिलीं पोरें बारा."

त्याबरोबर सारे खलाशी खदखदून हसूं लागले कुणी तर हसता हसता किंचाळले.

मग पुन्हा झिलमिटन कडव म्हटल,

" धाव सावळ्या, मार उडी वर
वाचलास तू नशिब शिकंदर ! "

असा तो चुकला खलाशी परत गलबतावर आल्यानंतर साऱ्या खलाशाच म्हणण दर्शविणारे पुढचे चरण साऱ्यानीं म्हटले :

" कशास मग तुजलागी शादी
घरदाराची गळ्यास वादी
नकोच शेती, नकोच दारा,
नकोत मागें पोरें बारा,

तुझी नाव ही, तुझा समिंदर.
तुझाच वारा, तुझाच चंदर
फिर क्यौं देरी ? सारंगा रे !
कुणिहि खलाशी नच चुकला रे
चलो खलाशी हबेस लंगर
झेप टाकितो पहा समिंदर !"

नांगर उचलून वर काढल्यावर तो डेकवर ठेवला होता. एका खलाशानं तो पाण्यानं धुतला स्वच्छ नि नंतर नांगरासाठीं केलेल्या लांकडाच्या खोबणींत नीट बसवून बांधून टाकला.

हें होईतों तांडेलाच्या हाताखालच्या तुकडीनं शिडं खोलली होतीं.

सायतारा गलबताला दोन उंच डोलकाठ्या होत्या. पुढच्यावर दोन चौकोनी अवजार असत. त्यापैकीं खालचं खूप मोठं असून तें डोलकाठीवरच्या आडव्या वांशाला बांधलेलं होतं. तिथून त्याच्या गुंडाळ्या सोडल्या, कीं ते आपल्या वजनानं उलगडे. त्याच्यांत वारा भरून ते फुगून येई. मग हवेच्या अंगच वांशाचं टोक पुढं बांधलं जाई, आणि तिरप्या केलेल्या त्या वांशाचं मागचं टोक जहाजाच्या उलट बाजूला बांधीत.

त्याच्या वर एक छोटं चौकोनी शीड होतं. त्याचा वासा पुढच्या डोलकाठीवर खालींवर सरणाऱ्या एका कडींत अडकविला होता. त्या वांशाला वरच्या चौकोनी शिडाची वरची कड बांधली होती. त्यामुळं तो वासा लाकडी चाकांमधून ओंवलेल्या दोरांनीं वर उचलला, कीं त्याबरोबर तें शीड उघडलं जाई. या दोन्ही चौकोनी शिडाच्या खालच्या कोपऱ्यापासून आलेल्या दोराच्या तुकड्यांत लाकडी कप्प्या बसविलेल्या होत्या. त्यातून दोराचे ताण ओंवून हवे तितके ते कमजास्त खेंचून खालीं डेकवर बांधीत.

पुढच्या डोलकाठीच्या पुढच्या अंगाला दुपत्याच्या आकाराचीं दोन त्रिकोणी शिडं होतीं. गलबताच्या नाळेवरच्या पुढं आलेल्या

चोंचीपासून ते पुढच्या डोलकाठीच्या टोकापर्यंत व मध्या-पर्यंत ती बांधीत आणि त्याचे मधले कोने खालीं तिरपे खेचून बांधीत. हीं त्रिकोणी शिडं लहान असल्यानं चटचट खालीवर ओढतां येत.

मागच्या डोलकाठीवरचं शीड जहाजाच्या लांबीच्या दिशेनं, पण आगमाग बांधलं जाई. त्याची पुढची कड मागच्या डोलकाठीला उभी सलग बांधलेली असे. या डोलकाठीला दोन वासे होते, पण दोहोंचीं पुढचीं टोकं डोलकाठीवर लोखंडाच्या फिरत्या सांध्यानं बसविलीं होतीं, आणि मागचीं टोकं मोकळीं असून, ताणांनीं तीं वाऱ्याच्या अनुरोधानं हवीं तशीं बांधतां येत. या दोन्ही वाशांपैकीं खालचा क्षितिजसमांतर होता, तर वरचा तिरपा बांधलेला होता. त्या वाशावर ओवलेल्या लोखंडी सरकत्या बांगड्यांना या शिडाची वरची व खालची कड बांधलेली असे. हें शीड उघडतांना त्याचीं मागचीं दोन टोकं मागं खेचलीं, कीं तें या दोन वाशांवर पसरून उघडे. या मागच्या डोलकाठीवर आणखी एक छोटं त्रिकोणी शीड होतं.

तांडेलाच्या हाताखालच्या खलाशांच्या मदतीला मग सारंगाच्याहि हाताखालचे लोक आले; आणि साऱ्यांनीं मिळून भराभर सारीं शिडं उभारून ठाकठीक करून बांधलीं.

मघाशीं नांगरटीला अवजार उतरून उभं राहिलेलं ‘सायतारा’ गलबत, पानं वठून जाऊन उघड्या पडलेल्या झाडाच्या बुध्या-खाद्याप्रमाणें दिसत होतं, तर आतां सारीं अवजारं वाऱ्यानं भरून फुगून पसरल्यामुळं ‘सायताऱ्या’ला आतां एक प्रकारचं मोहक सौष्ठव प्राप्त झालं होतं. आत्तापर्यंत नुसत्या लाकडाच्या एखाद्या तरंगत्या पिंपाप्रमाणं तें अवजड दिसत होतं, तर आतां त्याच्यात चैतन्य भरलं होतं. वाऱ्याच्या झुळकांच्या लहानसहान हालचालींना तें आपल्या अंगविक्षेपांनीं साथ करी. त्याखेरीज समुद्राच्या लाटां-

मधून पाणी कापीत, क्षणात लाटेला पायाखालीं दाबीत तर क्षणात लाटेबाहेर वर हेलकावत ते डौलान गतिमान् झालं होत.

समुद्र आणि वारा दोन्हीहि 'सायताऱ्या'ला सारखेच जिवलग होते. त्याच्यामधूनच त्याच्या चेतनेचा उगम होता शिडाच्या व दोरखडाच्या जाळ्यामधून वाहणाऱ्या वाऱ्याचं घोंघावणं, आणि लाटांबरोबर खालींवर हेलकावत कलंडताना होणारी गलबताच्य लाकडाची करकर, या आवाजानीं जणू काही त्या तिघाच्या गुजगोष्टी आपसात कुजबुजत चालल्या आहेत अस वाटे.

दोनप्रहरी 'सायतारा' मार्गस्थ झाली. आता तर उन्ह पार खालीं गेलीं होती. त्या कोवळया व पिवळया उन्हाच्या सुवर्णरसात बुच कळून सायंताऱ्याला मुलामा दिल्यासारखी ती दिसत होती.

खलाशानीं जोडीजोडीन चारचार तासाच्या पाळया सुरू केल्या होत्या. त्यापैकी एकजण काही लागल सवरल काम करायला डेकवर हजर राही, नि दुसरा सुकाणूच चाक धरून 'सायतारा' ठरलेल्या दिशेन चालू ठेवी. दोन तासानीं ते कामाची अदलाबदल करीत. मग पुढचे दोघे कामावर येत.

हिंमत व दौलत चार-चार तासाच्या आळीपाळीन काम करीत व काही विशेष महत्त्वाच काम असलं म्हणजेच कान्होजीरावाना वर बोलावीत. सुकाणूच चाक होत त्याच मागच्या डेकवर कामावर असताना दौलत किंवा हिंमत नेहमीं हजर असत ते डेक सगळयात उच असल्यान तिथून टेहेळणी छान ठेवता येई. त्याच्याच खालच्या मजल्यावर कान्होजीरावाची मोठी खोली व त्याच्या पुढ दौलतची खोली डाव्या बाजूला होती, तर उजव्या बाजूला जेवायची जागा, सुदर दिवाणखाना आणि त्यामाग हिंमतची खोली असे. त्या दोन्ही-मधे दोन मोठ्या खोल्या मोकळया असत. त्याच चद्रदत्त चट्टो-पाध्यायाना एक व जिजी नि मुकुलला एक अशा दिल्या होत्या. त्या-नंतर जहाजाची मागची बाजू सपे. अगदीं टोकाला एक मोकळा

गोलसा सज्जा जहाजाच्या टोकाभोंवतीं केलेला होता. त्यात बाधणारानी मोठी कलाकुसर केली होती; आणि रग रोगणसुद्धा सफाईन लावल होत. या गच्चीवरून देखावा मोठा सुदर दिसे व ही जागाहि फार निवान्त होती.

जहाजाच्या पुढच्या टोकाला खलाशाची व्यवस्था होती. त्यामधें सारग, त्याच्या हाताखालचा ताडेल, आणि सहा खलाशी याचा समावेश होई त्याशिवाय सुतार, शीड शिवणारा 'शिलईवाला', सैपाकी, आणि कान्होजीराव वगैरेच्या दिमतीला दिलेला, त्याच जेवण आणणारा व इतर वेळी सैपाक्याला मदत करणारा असा एक छोकरा, अशी सारीं मिळून बाराजण पुढ राहत. जहाज बदरात यायची, जायची किंवा अशी विशेष काहीं कामाची वेळ असली म्हणजेच हे सारेजण एकदम कामाला लागत. नाहीं तर इतर वेळीं सारग, ताडेल व त्याचे सहा खलाशी एवढेच सर्वसाधारण काम आटपीत. बाकीच्या चाराना आपलीं वेगळीं काम सदा असत.

दौलत जेवण सपवून गेला तो बोलून चालून मोकळा असल्यान नेहमींच खूप बडबड करी. मुकुलला पाहून त्याच्याहि मनात काहूर उठल खर, पण मुकुलला त्याच्याबद्दल कांहीं विशेष वाटत नव्हत, आणि त्यामुळ त्याच्याशीं तीहि इतर कुणाशीं वागाव तसच वागे. त्याच्या बाबतीत तिच्या मनात बधुभावच होता. आणि अर्थातच त्याच्या वृत्तीला तो मुळींच पोषक नव्हता. दौलत वर गेला आणि त्यान हिंमतला कामावरून मोकळ केल. हिंमत खोलींत जाऊन हात धुऊन येईपर्यंत बहुतेकाचीं जेवण सपत आलीं होतीं. कान्होजीरावहि जेवण्याच्या खोलीतून गेले. या वेळीं ते डेकवर हिंडत असत. चंद्रदत्तांना सवय नसल्यान व त्याची प्रकृतीहि बेताबाताची असल्यान त्या थोड्या हलण्यानहि त्यांना भोवळ येत होती. उलटी होण्याच्या भीतीन व अन्नावरची वासना उडाल्यानं ते आपल्या खोलीत

जाऊन निजले होते. टेबलाशीं फक्त जिजी नि मुकुलच तेवढ्या होत्या.

हिमत आला. त्याच्यापुढ छोकऱ्यान थाळी आणून ठेवली. तो जेवू लागला आणि त्या त्याच्याशी बोलू लागल्या. "मला तर बाई बोटीवर राहायला फार आवडत. कस मजेत फिरता येत नाहीं बोटीवरन सर्व देशोदेशी?" मुकुल म्हणाली.

"हो! आणि एकदा तीं वादळ सुरू झालीं म्हणजे मग कोण हाल—नको होतो जीव! समुद्र नेहमीच असा शान्त नसतो मुकुल. आणि हे बोटीवरच राहणाहि नसत नेहमीं आकर्षक." जिजी म्हणाली, "मला पुरा आहे अनुभव या समुद्राचा, आणि आता मुळीच इच्छा नाही बोटीवर राह्यची."

हिमत जेवता जेवता त्याच्या सवादाकडे लक्ष लावून ऐकत होता. नेहमीं त्याच सध्याकाळच जेवण तो एकटाच करी, पण आज जिजी नि मुकुल दोघींच्यामुळ ती छोटी जेवणाची खोली भरून गेल्यासारख त्याला वाटत होत. जेवताना समोर दिसणाऱ्या मुकुलच्या सुदर मुखाकड पाहण्यात नि तिच्या आकर्षक हावभावातली माधुरी चाखण्यात त्याला मोठ सुख होत होत.

"अग जिजी, तुला झाली आहे जमिनीवर राह्यची सवय, नि तुला नाही होत आता दगदग, म्हणून आवडत नसेल बोटीवर राहण." आणि जिजीला चिडविण्यासाठीं तो मुद्दाम पुढें म्हणतो, "आणि शिवाय, तुला ग कुठ असा आहे अनुभव फार समुद्राचा?" त्यावर जिजी उसळून म्हणते, "अरे, तुम्ही जन्मलात समुद्रावर दोघ त्या वेळी मी होते बर हजर. उकडून सोललेल्या बटाट्यासारखी लुसलुशीत, वितीवितीएवढीं होती तुमची अंग, नि माजरीच्या पिलासारखे मिटलेले होते तुमचे डोळे! जगात आल्यावर तुम्हाला पाहिला हात लागला या जिजीचा बर, आणि तेव्हा जिजी होती

म्हणून तुम्ही राहिलात जाग्यावर. नाही तर त्या वादळात काहीं धडगत नव्हती!"

मुकुलला जिजीच्या तोंडून जुन्या हकीकती ऐकायला फार आवडे नेहमीच. पण विशेषतः हिमत जन्मल्या वेळची हकीकत जिजी सांगूं लागल्याबरोबर तिनं कान टवकारले. ती जिजीच्या समोर टेबलाच्या टोकाशीं सरून बसली, व तेवढ्यात हिमतच्या शेजारीं त्याला खेटून बसण्याचीहि संधि तिनं साधून घेतली.

"खरच जिजी, सांग ग मला सगळी ती हकीकत. आम्हाला फार आवडतं ऐकायला, नाहीं का?" असं म्हणून तिनं हिमतकडे त्याचं अनुमोदन मिळावं अशा अपेक्षेनं पाहिलं. मग हिमतहि हसून म्हणतो,

"हां! खरच जिजी, मीं तर कधींच नाहीं ती हकीकत ऐकली!"

# ४

जिजीन सांगितलेल्या हकीकतीचा आशय असा होता—

"एका मोठ्या कुलांत मेघना जन्मली होती. तिच्यासाठीं जी दाई ठेवली होती, तिची मी मुलगी. मेघनेपेक्षां दोन वर्षांनं मी वडील होतें. एकाच आईचं दूध पिऊन आम्ही वाढलों, त्यामुळं प्रत्यक्ष रक्ताचा संबंध नसतानाहि आमच्या मनांत सख्ख्या बहिणीचं प्रेम उत्पन्न झालं होतं.

"मीं ते कुल मोठं होतं म्हटलं, पण राजघराणं होतं असं म्हटल्यानं जास्त यथार्थ कल्पना येईल. फक्त कुठलं राजघराणं, आणि त्याचं नांव काय तें मात्र मी सांगत नाहीं. कारण हे सारे प्रसंग गोष्टीसारखे ऐकलेलेच जास्त बरे. नांव सांगितल्यानं विनाकारण माणसांचीं मनं दूषित होतात, आणि भरणाऱ्या जखमेवरची खपली काढल्यासारखं होऊन फिरून जुना राग, मत्सर, सूड इत्यादि भावनांचीं तोंडं उघडतात.

"फार मोठ्या कुलांत जन्म चांगला म्हणतात, पण एका रीतीनं तो वाईटहि असतो. मोठ्या कुलांत जन्मल्यानं जशी त्या कुलाची परंपरा, नांवलौकिक, सत्ता किंवा ऐश्वर्य यांचा लाभ होतो, तशीच

त्याच्याबरोबर त्यांतील दुष्टावे, मत्सर, अनाचार आणि सूड वगैरे वाईट गोष्टींचाहि वारसा अनेकदा मिळतो.

“ मेघनेच्या वडलाच्या कुलाचा हाच प्रकार होता. राजघराण्याशी त्याचा सबध होता याच गोष्टीची कुऱ्हाड त्याच्यावर लटकलेली होती. या राजघराण्यातील एका व्यक्तीन, राज्याच्या मोहान, आपल्या हक्काआड येणाऱ्या प्रत्येक लहानसहान व्यक्तीला मार्गांतून काढून टाकण्याच वेड घेतल होत. आणि त्यासाठी त्यान एक महाभयकर युक्ति काढली होती. त्यान दोन निरनिराळया जातींच्या अतिशय धर्मवेड्या कुटुबाना त्याच्या देवाची मदिर बाधून दिलीं होतीं, त्यासाठीं मिळणाऱ्या वर्षासनातूनच त्याचा निर्वाह चाले. त्यापैकी एका कुटुबाच्या माणसाच्यावर या व्यक्तीच्या वाटेत येण्याचा सभव असणाऱ्या प्रत्येक स्त्रीपुरुषाला देहदंड देण्याची शपथ घातलेली होती. आणि त्या दुसऱ्या कुटुबातील माणसावर या पहिल्या मारेकऱ्याच्यातून जो तें नेमून दिलेल काम करण्यात कोणत्याहि कारणान कुचराई करील त्याला ‘ देहान्तशासन ’ द्यायची शपथ असे! याचा हेतु असा की, पहिल्या कुटुबातील माणसांपैकीं कुणी कुल-देवतेच्या शपथेविरुद्ध वागण्याइतका हिय्या करणारा निघालाच तरी निदान या घोर कर्तव्यात चुकल्यान देवतेचा होणारा रोष राहिला दूर, पण कुणी तिसरा माथेफिरू आपल्याला जिवे मारील, या स्वतःच्या जिवाच्या भयान तरी त्याच्या हातून शपथपूर्वक बलिदान होईल! म्हणजे या राज्यपदाच्या अभिलाषी वारसान आपल्या प्रतिस्पर्धी होऊ शकणाऱ्या साऱ्यांचीं पाळमुळ खणून काढण्यासाटी ही जोडगोळी योजून ठेविली होती. एक हुकली तरी दुसरी लागावी आणि कार्यभाग व्हावा!

“ मेघनेचे वडील मोठे उदार गृहस्थ होते. आपल्याला आपल्या कर्तृत्वान मिळेल तें आपलं. वडिलार्जितावर हक्क सागून भाऊबदकी करण्यात अर्थ नाहीं, अशी त्यांची वृत्ति. खरोखर त्या राज्यपदाचा,

कीं त्या खोट्या ऐश्वर्याचा अभिलाष त्यांच्या मनाला शिवतहि नसे आणि आपल्या कष्टान त्यांनीं चांगल नांव काढलं सुद्धां. पण त्यांनीं त्या ऐश्वर्याचा हव्यास धरला नाहीं. तरी ज्यान तो धरला होता त्याच्या दूषित दृष्टीला थोडाच असा निःस्वार्थीपणा खरा वाटणार! म्हणून त्यान मेघनेच्या बापामागहि आपले मारेकरी लावून दिले. त्याचा पहिला प्रत्यय म्हणजे मेघनेचा वडील भाऊ एक दिवस अचानक मृत्युमुखीं पडला. त्यान मात्र मेघनेच्या वडिलाच्या हृदयाच पाणी पाणी झालं. 'आपण कितीहि सात्त्विक, निःस्वार्थी असलों तरी, जोवर आपण त्या घराण्यात जन्मलों एवढ्याच अपराधासाठीं (?) आपल्यामाग काहीं माथेफिरू दगा करण्यासाठीं हात धुऊन लागतात, तोवर आपण गाफील राहण्यांत काहीच शहाणपणा नाहीं, विनाकारण आत्मनाश ओढवून घेऊ', अशी त्याची खात्री पटली.

"याला उपाय म्हणून त्यानीं एके दिवशी रात्रीं अभावितपणान आपली बायको आणि पोटची आता उरलेली एकटी एक मेघना, याच्यासह गुप्तपणान घरदार सोडून जाऊन देशातर केल. या दूरदेशीं आल्यावर आता आपण मारेकऱ्याच्या तावडींतून सुटलों असं वाटून त्यानीं सुखाचा निःश्वास टाकला.

"याच देशीं माझ्या आईन त्याच्याजवळ नौकरी धरली; आणि लवकरच माझ्या व मेघनेच्या आईमधील धनी आणि चाकरपणाचा भाव लुप्त होऊन एकमेकींबद्दलच्या गाढ प्रेमानं त्याची जागा घेतली. या दूरदेशीं त्याना दुसर नात्यागोत्याच कुणी नव्हतहि. आमच्या आयामधला हा प्रेमभाव मेघनेच्या नि माझ्यामधेंहि तसाच आला.

"पण त्या मारेकऱ्यांचा हात फिरून आमच्यापर्यंत पोचला आणि एक दिवस मेघनेची आई व वडील ही मृत्युमुखीं पडलीं. आता मात्र मेघनेच्या भयकर स्थितीची जाणीव माझ्या आईला आली. तिनं

तें घर तसच सोडलं आणि मेघनेला आणि मला घेऊन ती रातोरात पळाली.

" पाठलाग करणाऱ्या शिकाऱ्याला आपला माग सापडूं नये म्हणून काहीं वेळा वन्यपशु नद्या नाही तर सरोवर ओलांडून जातात. तीच युक्ति माझ्या आईन अंगीकारली. तिन आम्हा दोघींसह एका दूरदेशी जाणाऱ्या बोटीवर पाऊल ठेवल.

" त्या बोटीवरच्या कप्तानाच्या डोळ्यात मेघना इतकी भरली, की त्यानं माझ्या आईकडे मेघनेसाठीं मागणी घातली. आणि माझ्या आईनीहि त्याला रुकार दिला. मात्र 'मेघनेला आजन्म अतर देणार नाही व तिला बोटीवरच राहता येईल सदैव' अशी त्याच्याकडून आणभाक घेववली. नाहीं तरी मेघनेला सुखरूप राहण्यास सापडावं व तिच्या जन्माची तरतूद व्हावी हाच तर प्रश्न होता. तेव्हा बोटीवर जर मेघना कायमची राहिली तर मात्र त्या जुन्या कुलांत जन्मल्यामुळ माग लागलेलीं हीं दुर्धट सकट चुकतील असा तिनं विचार केला.

" शेवटी एकदाची आमची धावपळ सपली. मेघना झाली कप्तानाची बायको, नि मी तिची एकटी एक सोबतीण, अशा आम्हा दोघींना त्या गलबतावरच घर मिळाल, आसरा सापडला. आणि माझी आई देवाचे मोठ्या कृतज्ञतेन आभार मानीत मानीत आमच्या दोघींच्या काळजींतून सुटून आनदात, पण आपल्या प्रेमाच्या मैत्रिणीची आठवण करीत करीत आम्हाला सोडून गेली ! "

या सगळ्या भीषण पाठलागाची हकीकत ऐकून बिचारी मुकुल घाबरून नि गोंधळून गेली होती. प्रथम जरी ती हिंमतला प्रेमामुळ चिकटून बसली होती, तरी आता तिच्या हिमतला खेटून बसण्यांत, मनाला वाटणाऱ्या अवस्थेंत नि भीतींत काहीं तरी आसरा शोधणारी सहजप्रवृत्ति उघड दिसत होती.

मुकुलची ती स्थिति पाहून हिंमतलाहि तिची कीव आली.

माणसाच्या वासना व महत्त्वाकांक्षा जगात किती धुमाकूळ घालतात याची त्याला कल्पना होती. पण मुकुलसारख्या उपवनातल्या कळीला तोडून या जगातल्या तापल्या धुळीच्या फुपाट्यात टाकल्या-वर काय मनःक्लेश होतील हा विचार मनात येऊन त्याला तिच्या-बद्दल सहानुभूति वाटू लागली होती.

सुरुवातीच्या दृष्टिभेटींतच तिच्या सौंदर्यानं तो मोहून गेला होता. प्रथम लहानपणची मैत्रीण, बहिणीसारखी वाटणारी लहानपणची मुकुल, या भावनेनं त्यानं तिला भेटण्यासाठी त्या दिवशी पायऱ्यावर उभं राहून हात वर केले तिच्याकडं!

पण मुकुलच्या नजरेत निराळाच उन्माद होता. पाण्यात ती पडल्यानंतर बाहेर येऊन तीं दोघं वरच्या पायरीवर येऊन शेजारीं बसलीं ओलेत्यानं. त्या स्पर्शानं निराळीच भावना त्याच्या मनात आली. हलक्या कातरआवाजानं तिनं आपल्या हाकेला दिलेल्या उत्तरात त्याला आपल्या नव्या भावनेला मिळणारा पडसाद ऐकू आला होता.

मुकुलबद्दल आपल्याला वाटणाऱ्या आकर्षणापेक्षा फारच तीव्रतेनं तिला आपल्याबद्दल ओढ वाटू लागली आहे, आणि अगदी निष्कपट, अनन्यभावानं ती आपल्यावर प्रेम करू लागलेली आहे, याची हिंमतला जाणीव झालेली होती. पण त्यानंच, त्या वृत्तीचा फायदा न घेता उलट जरा तुटक वर्तणूक आतापर्यंत ठेविली होती.

आता मुकुल भीतीनं त्याला बिलगत होती. हिंमतनं तिला धीर यावा म्हणून तिच्या हातावर आपला हात ठेवला होता.

'सायंतारा' हलकेच डुलत होती. त्या हेलकाव्याबरोबर जेवण-घरात टेबलावर टांगलेला दिवा हलकेच आंदोलन घेत होता. भोंवतालच्या काळोखात त्याची छोटीशी ज्योत भीतीनंच कीं काय थरथरत होती, आणि अनुकंपेनं दिवा तिचं संरक्षण करीत होता.

जिजी पुढं सांगू लागली :

" त्या आम्हाला आसरा देणाऱ्या बोटीच नाव 'सायंतारा', नि तिच्या कप्तानाच नाव 'कान्होजीराव' बर !

" मेघना आता सुरक्षित होती खरी, पण लहानपणापासून तिच्या-वर पडलेल्या या घोर सकटांच्या सावलीन तिच्या स्वभावावर फार परिणाम झाल्याशिवाय राहिला नव्हता. तिच बोलण पार बद झाल होत. जणू काहीं आपण बोललेल्या एखाद्या शब्दानहि आपला अज्ञातवास उघडकीस येऊन फिरून आपल्या शिकाऱ्याना आपला माग लागायचा अस तिला वाटे. बोट बदरात असतांना तर ती खोलीबाहेरसुद्धा पडायची नाही. भ्यालेली गोगलगाय आपल्या शखात शिरून बसते, तशी मेघना आपल्या खोलीत असायची. तिच हसण खरोखर उबराच्या फुलासारख दुर्मिळ झाल. इतक्या सुरक्षितपणानसुद्धा तिच्या मनावरच दडपण नाहींस झाल नाही. उलट काहीं तरी भयानक भवितव्यता काळाच्या एखाद्या क्षणाआड आपल्यासाठी दबा धरून बसली असेल, अस तिला वाट् लागल. ती बोलेना-चालेना, नुसता विचार करी. आणि विचाराच्या चक्रव्यूहात अडकल्यान तिची सुटकाच त्यातून होईना. तुबलेल्या, उपसा नस-लेल्या, पडीक आडाच्या पाण्याप्रमाण तिचे विचार अपायकारक होऊ लागले.

" मी तिच्या सारखी माग माग लागे की, ' मेघने, बाई! तोंड उघड. मी तर तुझ्या विश्वासाची आहे ना? माझ्याजवळ बोलून टाक सार म्हणजे तुला हलक वाटेल. जरा जेवणाखाणाकड लक्ष दे. तू पाहिलीस का कशी वाळत चालली आहेस! नि तुझ्या या स्थितींत हयगय करून कस चालणार? तुझ्या पोटातल्या गर्भान पोसायच कशावर? मेघने, नको ग अस करू!' पण इतक जीव तोडून, कळवळून मी बोलले तरी, जणू काहीं दगडाशीच मी भाषण करीत आहे अस तिन करायच !

" तिची प्रकृति खालावत चालली. तिच्या प्रसूतीचे दिवस जवळ

येत चालले नि ती त्यांतून कशी पार पडणार असं मला वाटू लागलं. शेवटी कान्होजीरावांनी 'तिला कुठं तरी बंदरीं सुखरूपपणें प्रसूतीसाठी ठेवावं, नि मी तिच्याजवळ राहून तिची शुश्रूषा करावी' असं ठरवलं.

"पण आम्ही त्या बेताप्रमाणं तिला बोटीवरनं नेऊन बंदरात ठेवायला लागलों मात्र, तर तिनं असं थैमान घातलं, कीं काय सांगू! सारा जीव एकवटून ती किंचाळू लागली, 'मला नका हो या बोटीवरनं नेऊ! मला हवं तर समुद्रात टाका, मारा, पण या बोटीवरनं मला हलवू नका जिवंतपणी. किनाऱ्यावर मला ते मारतील. ते टपून बसले आहेत ना काळ! तिथं मला न्यालं तर मी मरेन, माझ्या पोटातलं बाळ मरेल आणि माझा निर्वंश होईल. नका हो निर्दय होऊ!' तिच्या त्या हृदयभेदक किंचाळ्या ऐकवेनात. ती बेताल झाली.

"वास्तविक वादळी दिवस सुरू झाले होते, आणि तिचीहि प्रसूति जवळ आली होती. तिच्याच सुरक्षिततेसाठीं तिला आम्ही किनाऱ्यावर ठेवणार म्हणत होतो. वादळात 'सायतारे'वर तिची प्रसूति आली तर तिची किती गैरसोय नि हालहाल झाले असते. पण ती ऐकेचना. शेवटीं तिला हालवलं तर भीतीनं ती याच घटकेला मृत्युमुखीं पडेल असं जेव्हा दिसू लागलं तेव्हा अगदी निरुपायानं तिला 'सायतारे'वर ठेवणं भाग पडलं.

"मी आपल्या मनानं तिच्या प्रसूतीसाठी बोटीवरच शक्य ती सारी तरतूद आठवून करून ठेवली. मीं चार शेळ्यासुद्धा बोटी-वर आणून ठेवल्या! न जाणो कधी त्याच्याहि दुधाचा उपयोग व्हायचा. पण सारी तयारी केली तरी गुपचुपपणानं. उगीच त्याची फार वाच्यता व्हायला नको असं वाटे मनाला.

मेघनेला प्रसूत होण्यापूर्वी थोडा अवधि राहिला, तेवढ्यात परत जायची सफर पुरी करून टाकावी, म्हणजे प्रसूतीला स्वतःच्या बंदरीं

'सायतारा' असली म्हणजे वर असा कान्होजीरावाचा बेत आणि त्याप्रमाणं आम्हीं सफरीस सुरुवात केली.

"हिंदी महासागरातून नैर्ऋत्येकडन वाऱ्याचे लोटच्या लोट घोंघावत निघाले होते. जणूं कांही दूरची सुभेदारी मिळालेल्या सरदारानी बलिष्ठ होऊन आपल्या धन्याची हुकमत झुगारावी, तस या अरबी समुद्रान नि बंगालच्या उपसागरान, 'आपण हिंदी महासागराचे हस्तक आहों', ही गोष्ट विसरून माजोरी दाखविली होती. आणि त्याना पाणी पाजून आपल्या वर्चस्वाखालीं आणण्या-साठी हिंदी महासागरान आपलीहि प्रचड सेना त्यावर धाडली होती. लाटाच्या श्यामवर्ण वारूवर वाऱ्याची स्वारी स्वार झाली होती. चौखूर उधळणाऱ्या त्या घोड्याच्या तोडीं फेस आला होता. वारा तर युद्धाच्या हिरीरीन गर्जत होता. त्याच्या माग उठणारे धुळीचे लोट म्हणजेच जणू त्या मेघाच्या राशी, आणि वाऱ्याच्या हातीं परजणाऱ्या नग्न तरवारी म्हणजेच त्या मेघमालेच्या-धुळीच्या- पार्श्वभूमिकेवरून चमकणाऱ्या विजा! नैर्ऋत्येचा मन्सून म्हणण्याऐवजीं त्याला हिंदी महासागराची, अरबी व बगालच्या उपसागरावर येणारी स्वारीच म्हणण रास्त.

"आणि या वादळापुढ 'सायतारा' धावत होती. झंझावातापुढ उधळणाऱ्या यःकश्चित् कागदाच्या कपट्याप्रमाण ती पुढं उधळत होती. आम्ही परत कलकत्त्याकड जाणार होतो.

"समुद्राच्या लाटा जणू टेकड्याच्या रागाच्या रागा पुढ सरकल्या-प्रमाण येत. लहान मुलाला खवाट्यात धरून उंच फेकाव तस त्या 'सायंतारा' बोटीला उंच वर भिरकावीत, नि लागलीच झेलून तिला खोल खालीं वाकून धरीत. आपण केवढी मौज करीत आहो, अशा भावनेन त्या खदखदून खिदळत.

"कान्होजीरावानीं लाटापासून व वाऱ्यापासून थोडा अडोसा मिळावा म्हणून अदमान व निकोबार बेटाच्या मधल्या दहाव्या

अक्षांशावरच्या सामुद्रधुनींतून सायतारा पुढे दामटली आणि मग उत्तरेला वळून अदमान बेटाच्या अडोशाला ते आले.

"पण याचाहि फारसा उपयोग झाला नाही, कारण या बाजूस आल्यावर इकडे तर वादळ जास्तच जोरावर आहे असं कान्होजी-रावांना आढळून आलं. 'सायतारा' बोलून चालून शिडानं चालणारी बोट. तिला वाऱ्याच्या लहरीवर नि मर्जीवर किती तरी अवलंबून राहाव लागे. हवं तिकडे चटदिशीं जाऊन वादळाच्या ऐन भरांतून निसटाव हे वाफेच्या बोटीला शक्य असलं तरी सायतारेला नव्हतं. सायतारा त्या बाबतींत पराधीन. त्यामुळं आगींतून निघून फुपाट्यात पडल्यासारख झालं. कान्होजीराव फार विवंचनेत होते. त्याचा जीव द्विधा झाला होता. एकीकडे या भयानक वादळातून बोट सभाळून सुरक्षित बाहेर काढायची म्हणून लक्ष द्याव लागत होत, तर खालीं खोलीमध्यें मेघना प्रसूतिवेदनांनीं तळमळत होती त्यानं चित्त विद्ध होत होत.

"वादळाचा जोर जसजसा वाढू लागला तसतशा इकडे मेघनेच्या यातना वाढू लागल्या. प्रसूतिवेदना या अगोदरच किती प्राणांतिक! आणि त्यात या वादळामुळं सायतारेची होणारी जोराची हालचाल आणि नासधूस! अशा साऱ्या अत्यत गैरसोयीच्या परिस्थितीत त्या वेदना शतशः वाढतच होत्या. मी मेघनेच्या शुश्रूषेला सारखी उभी होते, तर तिकडे कान्होजीराव सायतारेच्या शुश्रूषेला वर डेक्वर खडे होते. अधून मधून त्यांनीं शिडी अर्धवट उतरून खालीं डोकवाव. त्यांचे कपडे ओलेचिंब, केस, दाढी ओलीचिंब, आणि अगावरून पायावर असं पाणी निथळत होत.

'कशी आहे मेघनेची स्थिति आता?' त्यांनी विचाराव.

'होती तशीच आहे अजून, पण वादळाचा काय रंग आहे?' मीं विचारावं.

'तें वाढतच आहे. मी घेतो त्याची काळजी. तुम्ही मेघनेकडे पाहा.' असं म्हणत ते परत शिडी चढून वर जात.

"सायतारा अतोनात हालत होती. मी येवढी धडधाकट पण माझी त्रेधा तिरपीट उडत होती. रात्र पडत चालली तसतसा वादळाचाहि जोर वाढला, आणि त्याबरोबरच मेघना किंचाळू लागली. शेवटी तर या रात्रीतून मेघना, आणि वादळातून आमची बोट पार होत नाहीं असच मला वाटू लागल. विचार करताना आताहि मला तो प्रसग किती तरी भेसूर वाटतो, नि आम्ही कशी त्यातून पार पडलो त्याच आश्चर्य वाटत. मेघनेच्या अतीव दुःखापुढ मला काहीं दुसरीकडे पाहता येत नव्हत म्हणून जरा बर होत. नाहीं तर मलाहि भयान वेड लागायच त्या वादळात.

"शेवटीं मध्यान रात्र उलटल्यावर मेघना बाळत झाली आणि या जुळ्या भावडाचा जन्म झाला. मेघना मूर्च्छा येऊन पडली होती, मी सारी व्यवस्था करीत होतें होईल तितकी.

"याच सुमारास वादळाचाहि भर ओसरू लागला, आणि आमच्या जिवात जीव आला

"एक-दोन दिवसात वादळ पार सपलं. त्यातच सायतारेची एक डोलकाठी मोडली, पुष्कळ शिडाच्या चिंधड्या झाल्या, एक खलाशी लाटानीं वाहून जाऊन बुडाला, आणि इतर काहीना दुखापती झाल्या. पण सर्वात मुख्य गोष्ट म्हणजे मेघनेची सारी शक्ति त्या हालअपेष्टाशीं झगडण्यातच सपल्यान ती निभावू शकली नाही. आपल्या जुळ्या पोराना गोजारीत, ती सुखरूप आहेत या समाधानान 'त्याचा साभाळ तूच कर आता' अशा दृष्टीन माझ्याकडे पाहून तिन प्राण सोडला.

"येवढ्या वादळात न डगमगता 'सायतारा' सुखरूप नेणारे कान्होजीराव मात्र मेघनेच्या मृत्यून विकल होऊन पोरासारखे रडले. त्याच्या नौकानयनातील साऱ्या कौशल्याचा, त्याच्या [illegible] सामर्थ्या

चा उपयोग मेघनेचा मृत्यु टाळण्यासाठीं होण शक्य नव्हत; व या असहाय स्थितीनंच त्याना लाचार केल. दोन छोटे जुळे जीव, दोन दिवसांतच आईपारखे होऊन जर अंगावर पडले तर अगदी धीराचा दणगट पुरुष असला तरी काय करणार! मी होते म्हणून बर झाल. पण मला सुद्धां त्याची जपणूक करता करता ब्रह्मांड आठवल.

"अंदमानच्या पूर्वेहून आम्ही वर उत्तरेकडे आलो होतो. तिथ नरकुंड नावाच एक बेट आहे त्याच्या जवळून सायतारा जात होती त्या दिवशीं दुपारीं. तिथल्या समुद्रात मेघनेच शव टाकून तिचा अंत्यविधि समुद्रावरच्या तऱ्हेन इतमामात कान्होजीरावानीं उरकला. तो सारा प्रसंग माझ्या मनातून कधीं जायचा नाहीं. मेघनेच शव उंची रेशमी वस्त्रात गुंडाळून, मग त्यावर सायतारेच्या शिडाची शिवून खोळ घातली होती. ते माशाच्या भक्ष्यस्थानीं न पडता खोल समुद्रतळी जाऊन राहाव यासाठीं त्या खोळींत पुष्कळ जाड लोखंडी वजन घातली होतीं.

"दुपारचे वेध घेऊन झाल्यावर त्या नरकुंड बेटाच्या अगदीं जवळ सायतारा उभी होती. येवढ्या आजूबाजूच्या मोठ्या समुद्रात फक्त नरकुंड बेटाचाच सुळका एकटा एक वर आला होता. जणू काहीं त्याच्या साक्षीनच हें सार घडत होत.

"डेकवर सारी खलाशी मंडळी जमली होती. कान्होजीरावानीं आपला कप्तानाचा वेष घातला होता. मेघनेच्या शवापाशीं गुडघे टेकून कान्होजीराव बसले, आणि त्यानी आपल शिर त्यावर वाकविल होत. मी हातांत या जुळ्याला घेऊन उभी होतें.

"कान्होजीराव म्हणाले, 'समुद्रानच आम्हाला अन्न दिल आहे. त्याच्यावर आमचे जन्म जातात, आणि त्याच्याच उदरांत आम्हांला शेवटची विश्रांति मिळते. मेघने! समुद्रान तुझा बळी घेतला खरा; पण त्यानंच तुझ्या तान्ह्या मुलाची काळजी स्वतःवर घेतलेली दिसते.

माझ्या आठवणींतील एका अत्यंत भयंकर वादळांत हीं मुलं जन्मलीं आणि वांचलीं याचा अर्थच तीं मोठीं विख्यात दर्यावर्दी होणार. मेघने ! म्हणूनच त्यांना 'दर्यादौलत' नि 'दर्याहिंमत' म्हणणार आहे मी. तूं पुढं जात आहेस; पण माझी वेळ आली की, मीहि या खोल समुद्राच्या राज्यात तुला भेटायला येईन. हा सूर्य, हा समुद्र, हे नरकुंड बेट, नि ही सायतारा बोट माझ्या वचनाला साक्ष आहेत.'

"साऱ्याच्याच डोळ्यांतून टिपं येत होतीं. कान्होजीरावांनीं त्या शवावर क्षणभर ओठ टेकले, नि मग त्यानी उठून आणखी दोघांच्या मदतीनं ते शव पाण्यापर्यंत उतरवून, मग अल्लद पाण्यात सोडून दिलं. तें समुद्रतळीं पोचून त्याचे बुडबुडे आल्यावर निःश्वास टाकून कान्होजीराव कठड्यापासून हलले, आणि त्यानीं सायतारा चितगाग बंदराच्या रोखानं मार्गस्थ करवली."

# ५

भीषणतेच्या पराकोटीला पोचणारा समुद्रच असाधारण शांत स्वरूप धारण करू शकतो हें जरा नवलच नाहीं का? पण नवल कसलं! समुद्र हा अभिजात कलावंत आहे. त्याच्या सात्त्विक, निरुपद्रवी लहरींमधें साधूनहि त्याचा धडा घ्यावा अशी स्थिति, तर त्याच्या खवळलेल्या खुनशी अक्राळविक्राळ लहरींमधें खुद्द सैतानानंहि आपल्याला सव्वाशेर भेटला असं मानावं असा प्रकार. अत्युच्च कलाशिखर गाठणारा कलावंत, अतिनीचत्वाच्या खोल गर्तेंत उतरतो तो असाच. त्याच्या स्वभावाचीं आंदोलनं फार व्यापक असतात. श्रावणमासाच्या पावसानंतर जागोजाग जमलेल्या डबक्यांनीं शांततेचं सोंग आणावं किंवा खवळण्याचा प्रयत्न करावा तसंच सामान्य व्यक्तींचं असतं. त्यांच्या चांगुलपणांत नि वाईटपणांत इतकं थोडं अंतर असतं कीं, कोणत्याहि एका प्रकारांत त्यांचा पूर्ण समावेश न झाल्यानं त्यांना धड चांगलंहि म्हणतां येत नाहीं नि धड वाईटहि म्हणतां येत नाहीं. उथळपणा हें डबक्याप्रमाणं व्यक्तीच्याहि सामान्यत्वाचंच गमक असतं.

समुद्रावर ही आजची रात्र तरी किती शान्त होती. समुद्रानं जणू कांहीं समाधि लावली होती गाढ—इतकी गाढ, कीं 'सायतारा'

आपल्या गतीन त्या शांततेचा भंग करण्याचा प्रयत्न करीत असतांहि शिडाची नाजुक करकर, पाण्याची अल्लद होणारी खळखळ वगैरे सारे आवाज त्या शांततेंत अक्षरशः बुडून जात होते.

सारं जलपृष्ठ अगदीं स्तब्ध, नितळ होतं. लाटाची तर कांहींच हालचाल दिसत नव्हती. सायतारेनं कापलेलं पाणी झोपेंतून उठलेल्या आळशी माणसानं परत दुसऱ्या कुशीवर हलकेंच वळून निजावं तसं फिरून सांधून जाई. वारा इतका थोडा होता, कीं सायतारेचीं शिडं जरा कुठं भरल्यासारखीं दिसत होतीं. त्यामुळं सायतारा अतिशय मंदपणानं पुढं सरकत होती.

हिंमत वरच्या डेकवर उभा होता. नुकताच कामावर आल्यानं त्याच्या वाटचे पुढचे चार तास त्याला घालवायचे होते. सुकाणू धरणारा खलाशी सुकाणूच्या चक्राच्या खुट्यावर हात ठेवून उभा होता, पण सायतारा इतक्या हळू चालत होती, कीं तिला वळविण्याचा आणि ठरलेल्या दिशेवर रोखून ठेवण्याचा फारसा प्रश्नच नव्हता.

सुकाण्यानं तासाचे ठोके सुकाण्याजवळच्या पितळी घंटेवर मारले मागच्या बाजूला, कीं तो नाद सर्व बोटभर निनादून त्याच्या लहरी त्या शांत रात्रीभर पसरत पसरत पूर्ण नाहीशा होईपर्यंत किती वेळ तरी ऐकू येत. बोटीच्या पुढच्या टोकाशीं एक खलाशी जाग राखत होता त्यानं घंटेचा टोला ऐकला कीं, जागरूक दाखवण्यासाठीं "खू ऽऽऽ ब ऽऽ देखता ऽऽऽऽ है ऽ अ ऽ अ ऽ" अशी लांबलचक सुरात हाकाटी द्यावी. हाकाटीच्या सुरुवातीस जो एकदा श्वास घ्यायचा तो अगदीं हाकाटी संपेपर्यंत, आता आणखी दम छाटत नाहीं असं झालं म्हणजेच थांबायचं. त्यामुळं त्या अतिदीर्घ हाकाटीच्या मोजमापावरून त्या खलाशाची दमदार छाती, तो अंधारात दिसत नसूनहि कळत होती.

अशा शांततेचा गुणच असा असतो कीं, माणसाच्या मनांत खोल दडी मारून बसलेले विचार उमलून वर येऊं लागतात. हिंमतच्याहि

मनात असेच त्याच्या गेल्या पधरा वर्षातील दर्यावर्दी पेशातील घड-लेल्या अनेक प्रसंगांसबधीं विचार येत होते.

त्या दूरदूरच्या सफरी. एक बदर सोडाव आणि तिथल सारं काहीं काळ विसरूनच जाव. त्या बदरातील ओळखीचीं माणसंहि तिथच नि त्या बदराच्या त्या विशिष्ट तऱ्हेच्या गोष्टीहि तिथच. आणि मग दहा, वीस, तीस दिवस वाऱ्याच्या इच्छेनुरूप घडेल तितके दिवस समुद्रसचार.

तिथ भरसमुद्रात कुणाची लाज नाहीं नि भीड नाहीं. दाढ्या नि डोक्यावरची जगलं वाढलेलीं. चेहरेपट्टीची मशागत करायला वेळ असूनहि हात वर करायचे नाहीं कुणी. आरसा जो बदरावरन निघतांना पेटींत खोल घातलेला तो बदर यायच्या दिवशी वर निघायचा, त्याला या चेहऱ्याचीं दर्शन नाहींत तोंवर.

अगात एखादा फाटकासा कुडता असला असला, नाहीं नाहीं! ती अंगावरची तुकतुकीत चामडीच इतकी कमावलेली व्हायची उघडी राहिल्यान, कीं पाऊस, पाणी, ऊन, वारा या सगळ्यात आणखी काहीं वस्त्रप्रावरणाची शरीराला गरजच भासू नये.

कुडत्याखालीं एखादी उणीपुरी विजार अडकवलेली, अन् तिला निरनिराळया रगाचीं ठिगळ.

ती स्वच्छद मोकळी हवा. छाती फुगवून भरभरून श्वास घ्यावा नि साऱ्या रक्तात ती भिनून सारं शरीर उल्हसित व्हाव. इतकी ताजी दमदार हवा, कीं जणू काहीं तेवढ्या हवेवरच शरीर जगायच एखाद् वेळ. आणि तिच्या गुणानच माणूस बेपर्वा, आनदी, उल्हसित व्हायचा. बोटीवरच्या सवगड्या-सोबत्याशीं हसत-खिदळत, थट्टा-मस्करी करीत खूप काम करायच; नि निजल कीं दगडासारख निश्चल निजायच.

अगातली रग जिरवायची ती समुद्राशीं सारखं झगडत राहून. समुद्र नि वारा यांच्या लहरीपणातून काळजीन बोटीची बाजू संभाळून

न्यायची. तीं शिड, ते दोर, त्या डोलकाठ्या याच्याकडे सारखं लक्ष पुरवीत राहायच.

देव आणि कप्तान याखेरीज कुणापुढच न वाकवावी लागणारी, स्वाभिमानान ताठ आणि निर्भयतेन उच्च राहणारी मान. कुणाच्याहि दृष्टीला दृष्टि भिडवणारे उर्मट पण आत्मविश्वासपूर्ण डोळे.

तें साध नि फारसे सायास न करता शिजविलेल, पण कष्टान व चरचरलेल्या भुकेमुळ जिभेला गोड लागणार अन्न.

आणि बोट बदरात आली कीं, सारा नूर पालटायचा. फार मन-मिळाऊ असेल तो अति दारू पिऊन अति भाडखोर व्हायचा. वादळात जिवाला जीव देणारा सोबती, बदरात पैशासाठीं प्राणातिक हुज्जत घालायचा. अग उघड आहे का झाकलेल आहे याची समुद्रा-वर शुद्ध नसणारा माणूस ठेवणींतील जुन्या कपड्यातले कपडे निवडून काढून बदरात घाली आणि टोपड डोक्यावर घालताना त्याचा बाक नि कल साधला की नाहीं हे आरशात इतक्यादा पाही, कीं राज्या-भिषेकात डोक्यावर मुकुट घालणारा राजासुद्धा इतका चवचालपणा करणार नाही.

बदरातलीं तीं खलाशाच्या पैशावर टपलेलीं माणस—लोभी, तोडपुजीं, वरपागी बोलणारीं, भित्री, लाचार, अशीं तीं तिथलीं माणस, कीं जर एखाद्याची मुडी पिरगाळली चिडून त्वेषान, तर जिवाला त्याबद्दल खत सुद्धा लागण्याच कारण नाहीं.

आणि त्या बायका—दर्यावर्दी लोकाच्या पाहण्यात येणाऱ्या—हिडीस, मन मेलेल्या, खाऱ्या खलाशाचे करपाश, नि दारू याच्यामधें वर्षानु-वर्ष मुरलेल्या—का कुजलेल्या लोणच्यासारख्या. आणि तरीपण त्या खलाशांची त्याच्यासाठीं ओढ! भुकेला कोंडा नि निजायला धोंडा! नाहीं का?

पण या दर्यावर्दी पेशात चांगल्याहि गोष्टी अनेक होत्या.

बंदरांची समुद्रावरून येतांना दिसणारी शोभा. एखादी यक्षनगरीच

पाहत आहों असा दिसणारा भास. किनारपट्टीन जहाज हाकारताना दिसणार भूमीच सौंदर्य !

आणि समुद्रावरचीं तीं वादळ, त्या झटापटी. निर्भेळ निसर्गाच तें दर्शन. त्या काहीं गोष्टी अशा होत्या कीं, त्याच्या मोबदल्यात एक जन्म ओवाळून टाकावा.

—अशा जीव ओवाळून टाकण्याला योग्य असणाऱ्या गोष्टींमधेच बहुधा मुकुल बसेल नाही का?— ती कोण आकृति तिथं खालच्या डेकपाशीं उभी आहे?

" कोण आहे तें ? " हिंमतन चटदिशीं विचारल.

" मी." हें उत्तर समाधानकारक नव्हत, पण मुकुलचा आवाज हिंमतला ओळखला आणि तो चपळाईन शिडी उतरून तिच्याजवळ गेला.

" मुकुल ! काय करते आहेस या वेळीं तू डेकवर ? "

" मला झोप येत नाहीं अगदीं. जिजीन सांगितलेली हकीकत ऐकून माझ मन इतक उद्विग्न झाल, कीं झोपच उडाली माझी. शेवटी डेकवर आलें. म्हटल मोकळ्या गार हवेन बर वाटेल. तुमची कामाची पाळी आहे आत्ता ? "

" हं. पण काम मात्र काहीं नाहीं. ही सायंतारा तर वारा थोडा असल्यान किती हळू चालली आहे."

" मग अशा शांत नि मोकळ्या रात्रीच्या वेळी वेळ कसा घालवता तुम्ही ? "

" तूं कसा घालवशील ? "

" मी सुखस्वप्नात रंगून जाईन."

" मला सांग तुझीं तीं सुखस्वप्न पाहू ! "

" छे, सांगायला अवघड पडतं. तीं इतकी मायावी, गोड असतात, कीं त्यामधून या सायंतारेच्यासारख मन रमत-गमत जात असत. आताची वेळ हीच एखाद्या सुखस्वप्नासारखी आहे."

“ती कशी काय?”

“ही इतकी सुदर व शात वेळ. ताऱ्याच्या मद उजेडांत अधुकपणें अस्पष्ट दिसणारी ही बोट, समुद्रावरच्या वाऱ्याचा हा उत्तेजक वास, न आवडणाऱ्या साऱ्या गोष्टींचा आता कसा पूर्ण अभाव आहे. आणि तुम्ही नि मी बोलत आहो स्वस्थपणान.”

“तुझ्या या स्वप्नसृष्टींत मी कधीपासून आलों?”

“त्या दिवशीं चितगांवला सायतारा आल्यानतर धक्क्यावर तुम्ही भेटलात, आपण मग निथळत्या ओल्या अगान शेजारीं शेजारीं पायऱ्यावर बसलों, नि तुम्ही मला हाक मारलीन तेव्हापासन.”

“ती तर गोष्ट नुकती घडली. त्यापूर्वी तर मी कसा असेन याची कल्पनाहि नव्हती तुला.”

“तोपर्यंत किनई दौलत नि तुम्ही मला लहानपणीं एकत्र खेळ-तांना जसे दिसला होतात तसेच वाटत होतात. पधरा वर्षांनीं तुमच्यात काय फरक झाला असेल तें मला काय ठाऊक? तुम्ही तोंपर्यंत बालपणीचे दोघे खेळगडीच वाटत होतात.”

बोलत बोलत हिंमत नि मुकुल डोलकाठीजवळ मागच्या शिडाच्या पायाशीं येऊन पोचलीं. दुसर एक न उभारलेल शीड तिथेंच खालीं डेकवर अर्ध गुडाळून पडल होत. आजूबाजूला दोराच्या व ताणाच्या टोकाचीं वेटोळीं पडलेलीं होतीं. त्या शिडावर मुकुल बसली आणि शेजारी हिंमत पाय पसरून बसला. शिडाच्या कॅनव्हसचा नि दोरांचा व काथ्याचा वास थोडा उग्रच होता— पण चागला वाटत होता.

“परवांपर्यंत किनई माझ्या विचारसृष्टींत निसर्गामधल्या साऱ्या माझ्या आवडीच्या सुदर सुदर गोष्टी जमलेल्या होत्या, पण त्या अव्य-वस्थितपणान. नुसत्या सुदर होत्या म्हणून त्यांना स्थान मिळाल होत, पण त्यांच्यात सुसूत्रता नव्हती. परडींत फुल तोडून टाकावीं बागेंत हिंडताना, तशी साऱ्या सुदर, उत्तम वस्तूची माझ्या मनात एकच गल्लत झाली होती. आणि मग तुम्ही त्या गल्लतीमधें आलांत परवा.

पण मग मी पाहतें तो त्या साऱ्या सुंदर गोष्टी आपआपल्या योग्य स्थानीं जाऊन बसू लागल्या. एखादा गुच्छ तयार करतांना फुलांची जशी आपण नीट लावालाव करतों ना, तशी माझ्या मनात त्या साऱ्या गोष्टींची सुव्यवस्थित मांडणी झाली. आणि तुम्ही त्या पुष्पगुच्छाच्या मध्यवर्ती जाऊन बसलात. जणू कांहीं हा मनोहर पुष्पगुच्छ करण्यासाठींच मी सुंदर गोष्टी जमवीत होतें आजवर, आणि तुमचीच त्यांत उणीव होती. परवां तुम्ही आलांत नि माझ्या मनाची परडी भरून गेली."

"मुकुल, तू जितकी सुंदर दिसतेस, तितकीच अजाण नि अननुभवी आहेस. जन्मापासून सारा वेळ त्या कर्णफुलीच्या जवळच्या निवान्त घरीं वाढल्यान तुला बाहेरच्या कशाची कल्पनाच नाही. बाहेरच्या जगात कसे टक्के-टोणपे खावे लागतात त्याची तुला जाणीव नाहीं." मुकुल सरकून हिमतच्या उशाकडे बसली. हिमत डोक्या-खालीं उशाला हाताचे पंजे घेऊन उताणा निजला होता आता. त्याच्या चेहऱ्याकडे वाकून मुकुल पाहत होती.

"तुझ्या मनांतल्यासारखी स्वप्नसृष्टि तुझ्या वाट्याला आली प्रत्यक्षात तर छानच, पण स्वप्नसृष्टि व्यवहारांत उतरताना तिला इतके तडे जातात, तिला इतके फेरबदल पाहावे लागतात, की शेवटीं तिचं झालेलं विकृत स्वरूप पाहून मन हताश होतं. वाटतं, आपण कोणत्या आशेनं काय करायला निघालो नि शेवटीं त्याचं झालं काय! मंदिर बांधायला सज्ज व्हावं, नि बांधून झाल्यावर त्याला थडग्याचं स्वरूप यावं तसं वाटतं."

हे सगळं बोलणं मुकुल ऐकत नव्हती. हिमतच्या बोलण्याची सादच तिला कर्णमधुर वाटत होती, त्याचा अर्थबोध तिला होत नव्हता. तें लक्षात येऊन हिंमत म्हणतो, "मुकुल, अशी माझ्याकडं पाहत राहू नकोस टक लावून. तू इतकी मोहक दिसत आहेस आत्ता, कीं

मला भान न राहून मी तुला एकदम जवळ ओढून घेऊन तुझं चुंबन घेईन. पण मला इतकं वाहवून जायची इच्छा नाहीं खरी."

"का ?"

"मुकुल! आता तुझं चुंबन घेतलं तर मलाहि आवडेल नि तुलाहि, पण त्यानं एक नवीनच न आवरणारं घटनाचक्र फिरूं लागेल, आणि तें फिरू लागलं म्हणजे मग त्याखालीं काय सापडेल, तें केव्हा कसं थांबेल याचा काही नियम नाहीं. त्यापेक्षा तूं सध्यासारख्या अजाण पण मोहक स्वप्नसृष्टींत आहेस तें काय वाईट ? मला तू आवडतेस पण मी आहे दर्यावर्दी फिरस्ता, तू आता जरा खट्टू झालीस, तरी थोड्या दिवसांनी मला विसरशील नि कित्ती मनःक्लेश वांचतील तुझे."

"हिंमत, मला नाही समजत तुमचं हे बोलणं. मला तुम्ही बघितल्याबरोबर अति आवडूं लागलात. नि माझ्या मनाचा निश्चय झाला. मीहि या सायतारेवर राहीन. स्वप्नसृष्टि असो—नाहीं तर व्यवहाराची तुम्ही म्हणता तशी भग्नसृष्टि असो–त्या सगळ्यात तुमची सोबत मला हवी आहे."

"मुकुल! तू वेडी आहेस, नि तुझ्या सौंदर्यानं आणखी या मोहक वातावरणानं मीहि भारून गेलों आहे. तुला वाटलं तर अजून माग फीर. चल, मी तुला परत तुझ्या खोलीपर्यंत पोहोचवू का ?" हिंमत उठून बसला.

"हिंमत, मला नाहीं जायचं परत."

विधिघटना संतोषानं हसत असेल. दुःखाचा पर्वत जणू काहीं माणसाच्या डोक्यावर ती अधांतरीं टांगून ठेवते नि तो डोक्यावर पाडण्याची सारी जय्यत तयारी करून ठेवते. फक्त एखाद्या अनावरण-समारंभाला, उद्‌घाटन-समारंभाला एखादी रंगीत फीत कापण्याचा व निमित्त-मात्र होण्याचा मान एखाद्या निमंत्रिताला मिळतो तद्वत् आपल्याच डोक्यावर दुःखराशि कोसळून घेण्यासाठीं शेवटचं सूत्र ओढण्याचा

मान ती त्याच व्यक्तीला बहाल करते. आणि तोहि अशा मोहमय रूपांत, कीं सारी विचारशक्ति लटकी पडून माणूस उद्युक्त होतो; आणि मग ती हसत म्हणते, मी काय करणार ? तूच आपल्या हातानीं डोक्यावर दुःख ओढवून घेतलस !

मुकुलचा हात आपल्या हातात घेऊन हिमतन तिच्याकड पाहिल. ती त्याच्याजवळ सरकून बसली. रात्रीची हवा आता गार लागत होती. मुकुलच्या अगाचा स्पर्शहि किती सुखदायक होता ! तिच्या हाताचीं लाब-सडक पातळ बोट, नि तळहाताचा मासल मृदुस्पर्श हीं त्याला किती आवडली. दौलतप्रमाण हिमत विषयसुखात कधींच फारसा लोळला नव्हता. प्रणयाच नावीन्य व मनोहरपणा ही त्याच्यात अजून शिल्लक असल्यान, त्याच्या स्पर्शांत प्रामाणिकपणा, उत्सुकता, आदर नि सकोच या साऱ्याच मधुर मिश्रण होत.

हिंमत डोलकाठीला टेकून बसला. आपल्या डाव्या हातान तिच्या अंगाभोंवतीं विळखा घालून तिचा डावा हात त्यान धरला. त्याच्या डाव्या खाद्यावर मुकुलच डोक टेकल होत. तिचे वाऱ्यान विस्कळित झालेले केस भुरभुरत त्याच्या तोडावर लागत नि त्यानं नाजुक गुद-गुल्या होत. मुकुल हिमतच्या रुद छातीवर रेलून बसली होती. त्या विशाल मजबूत छातीच्या स्पर्शान मुकुलला भवितव्यतेबद्दल फार आशा वाटू लागली होती.

पूर्वेच्या बाजूला आकाश थोडं उजळल. पाण्याशी आकाश कुठ मिळत ते आतापर्यंत दिसत नव्हत. पण चद्रोदयाच्या वेळीं क्षितिजा-च्या थोड्याशा कडेपुरत चागल दिसू लागल. क्षितिजाच्या जरा वर चद्रकोर आली. ती लाल नि वाकडी तिकडी दिसत होती. सायतारे-पासून तों त्या चद्रकोरीपर्यंतच्या जलपृष्ठावर चकाकी आली. चद्रकोर क्षितिजाजवळन वर उच येऊ लागली तसतसा तिचा आकार रेखीव नि सुस्पष्ट दिसू लागला. तिचा लाल रग बदलत सोनेरी, नारिंगी अशा छटांतून जात जात स्वच्छ शीतल पाढरा झाला.

मुकुल अनिमिष नेत्रानीं तो समुद्रावरचा चद्रोदय पाहत होती. तिच्या कल्पनाशक्तीला त्या देखाव्यान उचबळून भरती आली होती. त्याखेरीज प्रेमोद्भवानतरचा प्रियकराच्या करपाशातून पाहिलेला हा तिचा पहिलाच चद्रोदय होता.

"मुकुल!" हिंमतन तिला हलक्या आवाजात हाक मारली, आणि तिन ओठ न हलवता म्हटल, "अ?"

"माझा स्वभावहि या बाबतीत तुझ्यासारखा आहे. निसर्गाचीं हीं मनोहर दृश्य पाहिलीं कीं माझहि मन अस उमलून येत, की काय सागू! आपण मनान अतिशय श्रीमत झाल्यासारख वाटू लागत. साऱ्या जगाबद्दल भावना मृदुतर होतात. अगातल्या चेतनेचा नि अस्तित्वाचा आनद वाटू लागतो. निसर्गाच्या रमणीयतेचा रसिकतेन पुरा आस्वाद चाखता येतो याबद्दल कृतकृत्यता वाटते."

मुकुलन आपले दोन्ही हात वर मागें उभवून हिमतच्या गालावर नि कानावर टेकले. ती त्याच्या शरीराला जास्तच बिलगून बसली. हिमत आता गप्प होता. त्याला ती म्हणाली, "असंच बोलत राहा माझ्याशीं. मला गुपचुप बसून, तुम्ही बोलता ते ऐकावयाला आवडत. मी बोलत नाहीं पण तुमच सार भाषण मी अधीर मनान ऐकत आहे"

"मुकुल! मला कोणत्याहि आनदाचा अनुभव घेताना दुःखाची आठवण पूर्ण नाहींशी करता येत नाही. आनद नि दुःख मला इतक मिसळलेल, परस्परावलबी वाटत, कीं सुखातिशयाच्या या क्षणींहि हा आनद किती वेळ टिकेल अशी हुरहुर वाटते.

"मला तू आवडली आहेस फार फार; पण माझं या दर्यावरहि तितकच उत्कट प्रेम आहे. त्याच्या गंभीर, व्यापक स्वरूपान माझ्या स्वभावाला स्फूर्ति मिळते. माणसान कस असाव याचा मला तो कित्ता वाटतो. त्याच्या निरनिराळ्या बदलत्या रूपरगांत मला त्याच्याशीं तादात्म्य पावता येत. त्याच्या खळबळी नि शातता,

सखोलपणा नि गूढपणा, विस्तार आणि निर्बंधितपणा हे सारे गुण मला अर्थपूर्ण वाटतात.

"समुद्रावरच्या जीवनाखेरीज मला दुसरं कोणतहि जीवन पसत पडत नाहीं. मी जन्मलोंहि समुद्रावर आणि राहणारहि समुद्रावरच."

"समुद्राबद्दल मला असूया नाहीं वाटत हिमत. तुम्हाला तो आवडतो नि मीहि आवडते, पण मग यात विरोध कुठ आला ?"

"अजून तर आला नाहीं. पुढच कुणी सागाव. पण मी आतां बोलत नाहीं. मनुष्याला देवान वाचा दिली तिचा भलत्या वेळीं बोलून दुरुपयोग करण ठीक नाहीं. अं ?"

अस म्हणून मुकुलला त्यान हलवून आपल्या सन्मुख आणली. उजव्या हातानं तिची हनुवटी धरून तिच तोंड आपल्या पुढ उचलून धरल. त्या अंधुक प्रकाशात तिच्या विलग ओठातून दाताच ओझरत दर्शन होत होत.

मुकुलचा करपाश त्याच्याभोंवती घट्ट होत होता.

तिच्या ओठांकडे तो क्षणमात्र पाहत थांबला. चद्रप्रकाश तिच्या चेहऱ्यावर पडून ती सगमरवरी दगडाच्या एखाद्या कोरीव पुतळीसारखी दिसत होती, पण जिवंतपणाची ऊब, प्रेमानं तिच्या छातीची होणारी धडधड, नि तिच थरारणार शरीर यामुळ ती शतशः जास्त आकर्षक दिसत होती.

वारा थोडासा जास्त झाला होता. सायंतारेची गति जरा द्रुत झाली होती. आतांपर्यंत फारशीं न भरलेलीं शिडं आता फुगून गोल भरदार झालीं होती. मागच्या डोलकाठीवरचा खालच्या शिडाचा आडवा वासा हलला, भरलेल्या शिडान त्याला जखडणाऱ्या दोराला थोडासा हिसका मारला अन् त्याबरोबर हिमत आणि मुकुल याच्यावर शिडाची सावली पडली.

समुद्रावरच राहणाऱ्या काळसर रंगाच्या बगळ्याची एक जात आहे. तसाच एक बगळा सायतारेची चाहूल लागल्यान जलपृष्ठा-

वरून पंख फडफडवीत उडाला. सायतारीभोंवतीं त्यानं किलबिलाट करीत घिरट्या मारल्या. अशा भलत्या वेळीं त्याला झोंपेतून उठावं लागलेलं त्याला आवडलं नसावं. सुकाण्यानं घंटेवर तासाचे टोले मारले. पुढच्या खलाशानं हाकाटी दिली—

" खू ऽऽऽ प देखता ऽऽऽ है ऽऽऽ."

हिंमत म्हणाला, " चल मुकुल, मी मागच्या डेक्वर परत जातों. तू जाशील ना आता परत तुझ्या खोलीकडे ? तुला झोंप येईल ना आता ?"

"हो."

" मग चल, मी तुला पोंचवितों."

# ६

दुपारी सूर्य डोक्यावर येण्याच्या जरा आधीं हिमत व दौलत हातांत सेक्स्टट ( Sextant ) घेऊन उभे होते. त्या यंत्रानं सूर्याच्या उंचीचा कोन मापता येई. मध्यान्हीला सूर्याची उंची किती अंश आहे हे पाहून त्यावरून बोट कोणत्या अक्षांशावर आहे हें दुपारीं ते ठरवीत. सकाळीं घेतलेल्या सूर्याच्या वेधावरून, नाहीं तर पहाटे घेतलेल्या ताऱ्याच्या वेधावरून, त्या वेळच्या रेखांशाचें गणित केलेलें असे. तेव्हांपासून दुपारपर्यंत बोटीनं किती मार्ग आक्रमला हें पाहून, दुपारीं बोट समुद्रात बरोबर कोणत्या जागी आहे हे दुपारी मापून, त्या ठिकाणच बरोबर अक्षवृत्त नि रेखावृत्त नकाशावर मांडीत. सेक्स्टटच्या ( कोन-मापनयंत्राच्या ) दुर्बिणींतून सूर्याकडे पाहून सूर्याच प्रतिबिंब त्यांनीं यंत्राचा आरसा बसविलेला हात पुढें सरकवीत क्षितिजाजवळ आणल. लखलखीत सूर्यप्रकाश तळपत असल्यान बोटीच्या भोवती सर्व बाजूला क्षितिजाची वस्तऱ्याच्या पात्यासारखी तीक्ष्ण सफाईदार धार स्पष्ट दिसत होती.

फिक्ट हिरव्या गढूळ रंगामुळ पाण्याची खोली फारशी नसल्याचं दिसत होतं. वर निळ्याभोर स्वच्छ आकाशाचा अर्धगोल पाण्यावर झाकण ठेवल्यासारखा वाटत होता.

डोळे दिपू नयेत म्हणून पिवळ्या निळ्या रंगाच्या काचा मधें घातल्यामुळ यंत्रात सूर्याचं प्रतिबिंब हिरव्या रंगाचं नि गोल गरगरीत दिसत होतं. त्या प्रतिबिंबाची खालची कड ते क्षितिजाच्या रेषेवर आणून टेकवीत, हातानं सेक्स्टंट अर्धचंद्राकृति फिरवीत, म्हणजे कोन बरोबर मापला जात आहे कीं नाहीं तें कळे, नि मग तो वळवून त्याच्या अंश कोरलेल्या पट्टीवर आंकडा पाहत. एकदोन सेकंदात फिरून पाहिलं कीं, सूर्यबिंब फिरून क्षितिजाच्या रेषेवरून आणखी वर सरकलेलं दिसे. ते फिरून ते क्षितिजावर आणून टेकवीत. असं होतां होता सूर्य डोक्यावर आल्यावर तें प्रतिबिंब क्षितिजावर क्षणकाल स्थिरावल्यासारखं दिसे. त्या वेळची उंची अक्षांशासाठी घ्यावी लागे. त्या क्षणीं सूर्य दिवसात सर्वात उच्च बिंदूवर असे; आणि त्यानंतर तें बिंब चढण्याऐवजीं क्षितिजरेषेवर खाली खालीं सरकू लागे.

हिंमतन अंश मोजले नि दौलतला विचारल, "तुझ्या यंत्राप्रमाणं किती आली उंची?"

"साठ अंश, साडेपंचावन कला."

"चूक आहे. इतकी असणं शक्य नाही. आपलं अक्षवृत्त तर एकवीस अंश पंध्रा कला असायला पाहिजे अंदमासें."

"माझ्या चुका काढायला तू नकोस मला हिंमत. तुला नौकानयनात अडचण असली तर विचार मला, मी शिकवीन तुला!"

"तुला एवढा त्रागा करायला काय झालं चूक दाखवली तर? तुझं लक्ष नीट नसल्यानं चूक झाली असेल."

"माझं लक्ष ठिकाणावर आहे. नौकानयन करायला पोरीची सोबत लागणाऱ्यांपैकीं मी नव्हे!"

"तू काय भकतो आहेस?"

"तुला नाहीं का समजत! मग मुकुलला आज रात्रीं विचार फिरून, कीं— "

हिमत रागावला होता खूप. पण त्याला अगोदर काम संपवायचं होत. म्हणून तो तसाच तोंड वळवून नकाशाच्या टेबलापाशीं गेला आणि गणित करण्यात गढून गेला.

नकाशावर दुपारची बोटीची जागा खूण करून माझून गंगासागर-पर्यंत, म्हणजे कलकत्त्याला जाण्यासाठीं हुगळी नदीच्या मुखापर्यंत, किती अंतर उरल तें हिमतन मोजल, वाऱ्याची दिशा पाहिली नि तो कितपत अनुकूल आहे तें पाहून कोणत्या दिशेन बोट चालवायची तें नकाशावरून ठरवून तो बाहेर आला. त्यान सुकाण्याला सांगितल, " दो पोंता जम्ना बाजू "

" दो पोंता जम्ना बाजू, जी." सुकाण्यान चक्र उजव्या बाजूला फिरवल. त्याबरोबर बोटीच नाक वळू लागल. वारा पूर्वी बोटीच्या कण्याच्या पिछाडीहून येत होता, तो आतां कण्याच्या जरा पुढून येऊं लागला. सारंग नि खलाशी तयार उभे होते त्यानीं वारा बदल-ल्यामुळ हाललेलीं शिडं फिरून ठीकठाक करून त्याचे ताण नि अंजे फिरून नीट बांधले. बोटीच नाक होकायंत्राच्या योग्य, हव्या त्या दिशेवर आल्यावर हिमत सुकाण्याला म्हणाला, " ठीक अलेख ! "

" ठीक अलेख, जी. " अस म्हणून सुकाण्यान चक्र थोड उलट्या बाजूला फिरवून बोटीच वळण थाबवल नि मग फिरून चक्र मधोमध आणून त्या दिशेवर बोट स्थिर केली.

" ठीक अलेख." हिमत पुन्हा म्हणाला.

" ठीक अलेख, जी. नॉर्थ-वेस्ट-बाय-वेस्ट है जी दिशा."

" ठीक आहे, नॉर्थ-वेस्ट-बाय-वेस्ट."

काम सुरळीत पार पाडल्यावर हिमतन दौलत कुठ आहे तें पाहिल. दौलतला फैलावर घेण्याच त्याच्या मनात होत, पण दौलत तिथून निघून गेला असल्यान ते साधल नाहीं.

हिमत नि दौलत जुळे भाऊ होते, नि त्यांच्या शरीराच्या बांधणींत,

अंगकाठींत व चेहरेपट्टींत पुष्कळच साम्य होत. नवीन माणसाला गोंधळून जाण्याइतकहि साम्य असल तरी त्यांच्या स्वभावात जमीन-अस्मानाचा फरक होता. कान्होजींच्या स्वभावातलीं वैशिष्टय या जुळ्या भावडांतहि उतरलीं होतीं, पण ती विभागून उतरली होती. हिमतच्या स्वभावात दिलदारपणा, सहिष्णुता, उद्योग नि विचारीपणा हे गुण प्रामुख्यान आलेले होते, तर दौलतच्या स्वभावात हेकटपणा, दुराग्रह, कामांधता नि तामसी वृत्ति यांचा अतिरेक झालेला होता. या जुळ्या भावांच्या स्वभावाची घडण कोणत्या मानसशास्त्राच्या नि शारीर-शास्त्राच्या नियमाप्रमाण झाली होती कुणास ठाऊक, पण स्वभावात सारखेपणा व आनुवंशिक विशिष्ट गुण समसमान प्रमाणांत येण्याऐवजीं दोघांमधें त्यांची विभागणी अतिशय विषम प्रमाणान झाली होती. हिमतच्या स्वभावाची विचारी दूरदृष्टि, अत्यत शूरपणा, आणखी गोडवा दौलतमधे नव्हता. तो अतिशय हलक्या कानाचा, कारस्थानी असा झाला होता. तो शूर नव्हता अस नाही, पण बाजू अगावर आल्यावरहि त्यातून पार पडण्याच मनोधैर्य, हालअपेष्टांशीं झगडून ताठ राहण्याचा जोर त्याच्यांत फारशा प्रभावान नव्हता. त्यांच्या या मूळच्या स्वभावावर ते ज्या निरनिराळ्या बोटींवर—त्या दोघाना कान्होजीरावानीं वेगवेगळे निरनिराळ्या बोटींवरून उमेदवार म्हणून शिक्षणासाठी बरींच वर्ष ठेवलं होत हे वर सांगितलच आहे—ज्या निरनिराळ्या तऱ्हेच्या सोबती-सगतींत वाढले त्याचाहि फार परिणाम झाला. त्या वेळीं ते दोघेहि अतिशय लहान असल्यानं त्याची बुद्धि साहजिकच फार ग्राहक नि अनुकरणशील होती. धूतवस्त्र फुलझाडावर वाळत घातल तर गधमान होऊन जात, उलट, ते खालीं जमिनीवरच काळजी न घेता वाळत घातल तर मृत्तिका नि गोमय यानींच बरबटून निघत.

मुकुलला पाहिल्यावर हिमतला तिच्याबद्दल आकर्षण वाटल; पण तें साहजिक तसंच मर्यादशील असल्यान त्याच्यात गोडी होती.

मुकुललाहि त्या आकर्षणाच्या पडसादांनीं हिमतच्या उलट प्रेमांत पाडल.

पण मुकुलकडे पाहिल्यावर दौलतच्या मनात निराळयाच वासना जागृत झाल्या. त्या वासनात प्रेमाचा लवमात्र नव्हता, पण केवळ उपभोग नि स्वामित्व यांचच प्राबल्य होत. दारूबाजाची दारूबद्दलची तृषार्तता जशी दिसते, तशी दौलतच्या नजरेत त्याची वैषयिक तृष्णा उघड दिसे. त्यामुळ मुकुलला त्याची नावड उत्पन्न झाली, व त्याच्या बोलण्याचालण्यातील छचोरपणान शेवटीं तिला त्याच्याबद्दल पुष्कळच शिसारी वाटू लागली.

* * *

“ जिजी ! मी आता किनई दौलतच्या चागली सणसणीत श्रीमुखात भडकावली.” मुकुल जिजीच्या खोलींत तिच्या पलगावर तिच्याशेजारी बसून म्हणत होती.

“ चागल केलस बाई ! मग आता काय माझ्या मारायची का तोंडात तुला ? ”

“ अस काय ग जिजी ? ” अस म्हणत मुकुलन जिजीच्या गळया-भोवतीं आपले हात टाकले, नि ती म्हणाली, “ तू तर मला आई-सारखी आहेस की ग ! तुला कस ग मारीन ? ”

“ कां ? दौलतच्या मारलीस तोंडात म्हणून तूच सांगते आहेस ना ? नि तो तर तुझा मोठा भाऊच कीं ! ”

“ इश्श ! आपली लहानपणापासूनची ओळख नि घरोबा म्हणून मानलेला भाऊ म्हणायचा झाल ! ”

“ अग पण त्यान केल काय येवढ चिडायला ? ”

“ माझा मुका घेतलान् गाढवान ! ”

“ अग त्याला तू बहिणीसारखीच वाटतेस ! आता बहीण झाली म्हणून भाऊ मुके घेत सुटत नाहींत हें खर, पण दौलतचा स्वभाव आहे गमत्या नि मोकळा; त्याच्याकडं कसल लक्ष देतेस !

अग त्या दिवशीं सायतारा चितगावला परत आली नि मी इतक्या वर्षांन त्याला भेटलें तेव्हा त्यान माझासुद्धा मुका नाहीं का घेतलान्? दौलतच करण एक एक विचित्र असतं इतकच!"

"आऽहाऽहा! जिजी, तुझी नि माझी एकच तऱ्हा वाटत? माझ्याकड तो कसा निराळ्याच दृष्टीन पाहतो."

मुकुलच्या मनातून आणखीहि एक गोष्ट जिजीला विचारायची होती ती ही, की तिच नि हिमतच लग्न होण्याची कितपत शक्यता आहे? पण सरळ विचारण अवघड म्हणून तिन निराळ्याच पद्धतीनं तो प्रश्न पुढ आणला.

"त्या दौलतला वाटत, की आपल्या जुन्या ओळखीची, घरोब्याची मुलगी आहे, तिच्याशीच कराव लग्न! तसच कदाचित् त्या हिमतलाहि वाटत असेल. काय बाई तरी समजूत! अस शक्य कस होईल वेड्यासारख"

मुकुलच्या या कुशल पवित्र्यान जिजी बरोबर फसली. ती म्हणते, "काय झाल त्यात वेड्यासारख? चागलीं सोन्यासारखीं जुळीं भावड त्याच्याचपैकीं एखाद्याशीं झाल तुझ लग्न म्हणून काय बिघडल! तसं जवळच नातं नाहीं नि गोत नाहीं. आपली वर्षानुवर्षांची ओळख! चागलच होईल की."

आपल्याला हव तेच उत्तर आलेल पाहून मुकुलला आनद झाला. पण तो बाहेर न दाखवता ती हलकेच सहज उठल्यासारखी उठली. "किती उकडत या खोलींत जिजी! छे बाई, मी आपली बाहेरच जातें." अस म्हणत ती तिथून निसटली. जिजीन अनेक वृद्ध माणसासारख आपल मन विचाररहित केल, नि वेळ घालवायच उत्तम साधन या दृष्टीन तिन आपली झोप सुरू केली.

* * *

बोटीच्या पुढच्या बाजूकड तोड करून झिलमिटन डेकवरन

आपल्या सोबत्याना आरोळी दिली, "अरे ए सावळ्या, ओ सारंग, मच्छी लागलाय् हो गळाला. हकड या बिगि बिगि."

मासा गळाला लागल्याच वृत्त ऐकल्यावर काहीं खलाशी धावतच आले. बोटीवरच्या त्या साध्या दैनदिन कार्यक्रमात ही एक फार महत्त्वाची गोष्ट होती. बोट समुद्रावर अनेक दिवस राही. ताजी फळभाजी मिळण स्वप्नींहि शक्य नसे. बरोबर घेतलेला आटा, तादूळ, तूप, डाळ असल्या तऱ्हेची लवकर खराब न होणारी शिधा-सामग्री असे. त्याशिवाय बिनदुधाचा लालभडक चहा त्यात खूप साखर घालून ते पीत. नारळाच्या काळ्या करवटीचा केलेला एखादा हुक्का असे. बहुतेकजण तो ओढीत, नाही तर तमाखू तोंडात चघळीत. अशा खाण्यापिण्याच्या स्थितींत ताजा मासा गळाला लागल्याच वृत्त ऐकलं, कीं साऱ्याच्या तोंडाला पाणी सुटे.

खलाशानी असे मासे पकडण्यासाठीं एक फार सुटसुटीत पण युक्तिबाज गळ तयार केला होता. वारा असेल त्या बोटीच्या बाजू-कड एक पधरा-वीस फूट लांबीचा मजबूत कळक बोटीच्या बाहेर सरळ आडवा, नि बाहेरच टोक बोटीच्या आजूबाजूपासून दूर पाण्या-वर येईल असा, रश्शानीं बाधीत. या कळकाच्या बाहेरच्या टोकापाशी एक छोटी कप्पी असे. तिच्यांतून ओवून एक बारीक हिरवी पण अति मजबूत दोरी माग पाण्यांत लोंबती सोडलेली असे. बोटीच्या मागच्या टोकाच्या बरीचशी मागेपर्यंत पोंचेल इतपत लाब दोरी सोडून, तिच्या टोकाशीं तारेच अणकुचीदार टोक आकड्यासारखं वळवून केलेला एक गळ बाधीत. त्या गळाच्या तारेवर रंगीत फितीचे तुकडे झुपक्यासारखे लावलेले असत. दोरीचा रग हिरवा असल्यान दोरी दिसत नसे, पण गळावरच्या रगीत झुपक्यान तो फार आकर्षक दिसे. माणसांच्या, आत एक बाहेर एक अशा, छद्मीवृत्तीची माहिती नसणाऱ्या एखाद्या माशान तो बोटीमागोमाग

धावणारा रंगीत प्राणी पाहिला की, साहजिकच त्याचा पाठलाग करून त्याला गिळंकृत करण्यास तो मासा येई आणि अधाशीपणानं जबडा उघडून तो रंगीत प्राणी सबंध गिळल्यावरच त्यातील दगाफटका त्याला कळे. पण मग काय उपयोग ! त्याच्या धडपडीनं उलट ते गळाचे आकडे त्याच्या घशात घट्ट रुतत, नि सुटका अशक्य होई.

त्या कळकाच्या बाहेरच्या टोकापासून आणखी एक अगदीं नाजुक निराळी दोरी बोटीच्या पुढच्या भागाकडं नेऊन बांधलेली असे. या दोरीवर एक निशाण बांधलेलं असे. त्याचा उपयोग असा कीं, मासा गळाला लागल्यावर त्या कळकावर जोर येई आणि तो वाकून धनुष्याकृति होई. त्यामुळं ती नाजुक दोरी तुटे आणि त्याबरोबर तिला बांधलेलं निशाण फडफडूं लागल्यानं खलाशांना मासा गळाला लागल्याची खूषखबर कळे. झिलमिटनं निशाण फडफडलेलं पाहूनच मासा अडकल्याची वर्दी दिली होती.

झिलमिटनं गळाची दोरी कळकाच्या कप्पीवरून काढून बोटीच्या कडेपर्यंत आणली, नि मग बाकीचे सारे मिळून ती आत ओढूं लागले. मासा चांगला सणसणीत मोठा होता. त्याच्या जिवाचाच प्रश्न असल्यानं तो झगडून निसटण्याची पराकाष्ठा करीत होता. पण खलाशाच्या अन्नाचा प्रश्न असल्यानं तेहि मोठ्या खबरदारीनं तो ओढून काढीत होते. बोटीच्या कडेपर्यंत तो ओढणं सोपं होतं. पण नंतर तो पाण्यातून उचलून वर आणणं मात्र खरंच अवघड होतं. सावळ्या नि आणखी दोघे त्या दोरीला धरून ओढीत होते, नि झिलमिट बोटीच्या कडेवरून पुढं रेलून तो मासा थोडा उचलीत होता. दोरी थोडी कांचलेली असावी. बोटीच्या कठड्यावर घासून ती एकदम ताडकन् तुटली. सावळ्या नि ते दोघे खलाशी त्यामुळं एकदम मागं डेकवर कोलमडून पडले. झिलमिटच्या हातावर एकदम वजन आल्यामुळं त्याचा पाण्यात तोल गेला, नि त्याशिवाय त्या

दोरीच्या राहिलेल्या टोकाचा वेढा त्याच्या मानेभोवतीं करकचून झिलमिटच्या गळ्याला जवळ जवळ फासच बसला.

मासा सापडल्याची हाकाटी ऐकून तो कसा पकडतात तें पाहण्यासाठीं मुकुल डेकवर गेली होती. ती कठड्याजवळ उभी होती. तिन प्रसगावधान राखून झिलमिटला चटदिशीं माग खेचून सावरल. येवढच नव्हे तर, माशाच्या दोरीला हात घालून अतिशय प्रयासान तिन तो वर खेचला. दोरी सैल झाल्यान झिलमिटच्या गळ्याचा फास ढिला पडला.

मुकुलच्या एकटीच्यान तो धडपडणारा चवताळलेला मासा—चागला सहासात फूट लाब होता तो— सावरण शक्य नव्हत. पण लागलीच कोलमडून पडलेला सावळ्या व आणखी दोघे परत उठून आले व त्यानीं मासाहि धरला. मुकुलच्या हातून दोरी पकडली व झिलमिटची मान सोडवली.

त्या कणखर दोरीचा फास बसल्यान झिलमिटच्या मानेला जरा लागल होत. त्यामुळ तो मटकन् डेकवर बसला. तोंवर मुकुलन शेजारच्या बादलीमधल पाणी त्याच्या कपाळावर सपासप मारल. थोड्या वेळान त्याला बर वाटल. तोंडून शब्द फुटू लागल्याबरोबर तो मुकुलला कृतज्ञतेन म्हणाला, “ताईसाच! तुमी आज व्हता शेजारी म्हून माझ्या कारबारनीच कुकू राह्यल, न्हाइतर त्ये मच्छीच जीव घेतल्याबदल मला आताच फाशीची सजा व्हत होती. कदी न्हाय इसरायचा ताईसाबाच उपकार मी!”

मासा पकडला कीं, अगोदर बोटीचा कप्तान मुख्य असल्यानं शिस्त नि आदराची खूण म्हणून त्याला नेऊन तो मासा दाखवीत. त्यान एकदा तो पाहिला, कीं मग तो भडाऱ्याकड कापून शिजवायला देत.

झिलमिट व सांवळ्या यानी तो नेऊन कान्होजीरावांना दाखवला नि त्याबरोबर मुकुलच्या प्रसगावधानाबद्दल तोंडभर स्तुति केली.

हिंमतहि तिथ असल्यानं त्यानं तें सार ऐकल, नि हर्षानं त्याची चर्या फुलून गेली.

*   *   *

गंगेच्या अनेक मुखामुळं बंगालच्या दक्षिण समुद्रकिनाऱ्याजवळ पाण्याची खोली खूप कमी होत गेलेली आहे. वर्षानुवर्ष नदीच्या पाण्याबरोबर किती तरी माती धुपून येऊन या मुखाजवळ साठत आली आहे. तेव्हा प्रत्यक्ष नदीच्या तोंडाशी येण्यापूर्वी ४० मैल दूर-पासूनच काळजीनं बोट आणावी लागते. जागोजाग वाळूच्या दाड्या जमलेल्या असतात. त्या सगळ्या टाळून जाण्यासाठीं तिथला पूर्ण माहीतगार वाटाड्या लागतो.

ब्रिटिशानी हिंदुस्थानात पाय रोवले ते प्रथम बंगालमध्ये. त्यामुळ कलकत्ता हे त्याच हिंदुस्थानात येण्याजाण्याच महाद्वार झाल होत. हुगळी नदींतून त्याची सारी वाहतूक होत असे. त्यानीं हुगळी नदींतून बोटी सुरक्षित नेण्या-आणण्यासाठी निरनिराळे उपाय अमलात आणले होते.

हुगळी नदीची पाहणी करून पाण्याच्या ठिकठिकाणच्या खोलीचे नकाशे तयार केले होते. जास्त व भरपूर पाणी असलेल्या नदीच्या जागा लोखंडाचे भोपळे नागरून चटकन् दिसतीलशा केल्या होत्या. फारच उथळ पाण्याच्या जागा बोटींना जाण्यासाठीं धोक्याच्या असल्या-मुळ त्याच्यावर खुणा केलेल्या होत्या. नदीच्या दोन्ही तीरावर जागो-जागीं आणि वळणावळणावर लाकडी, नाहीं तर दगडाविटानी बाधून चुन्याची सफेती दिलेले खाब होते. त्याची उभारणी अशा तऱ्हेन केलेली होती, कीं दोन विशिष्ट स्तभ एका रेषेत दिसतील असे ठेवून बोट चालविली, कीं सुरक्षितपणें उथळ जागा टाळून बोट चालविता येई. त्याखेरीज नदीला भरती ओहोटीमुळ खूप पाणी चढे नि उतरे. त्यामुळ भरती-ओहोटीच्या वेळेवर अवलबून नदीची ठिकठिकाणची खोली कमजास्त होई. भरती किंवा आहोटीपैकीं काय चालू आहे,

त्यामुळ पाणी नकाशान दाखविल्याच्यावर किती जास्त चढलेल आहे हें दाखविण्यासाठीं काहीं काहीं ठिकाणीं काळया, पाढऱ्या नि तांबड्या खुणा फुटाफुटाच्या अतरान केलेले खांब नदीतीरीं पुरले होते. येवढच नव्हे तर काही ठिकाणीं मुद्दाम माणसं नेमून पाण्याच्या चढउताराच्या खुणा उच उच खांबावर निरनिराळया निशाणानीं, चिन्हानीं वगैरे दाखवण्याची सोय केली होती.

हुगळी नदीच्या नौकानयनासाठीं ब्रिटिशानी पुष्कळच व्यवस्था केली होती. पाण्याचे प्रवाह सारखे बदलतात म्हणून अद्यावत् नकाशे तयार करणारे अधिकारी नेमलेले असतच, पण त्या नकाशाबरहुकूम बोट नदींतून हाकारून आणण्यासाठीं मदतनीस म्हणून पूर्ण माहीतगार, चलाख, नि पूर्वी वर्षानुवर्ष दर्यावर्दी पेशात बोटीवर काम केलेले लोक ठेवलेले असत ज्या बोटीच्या कप्तानाना त्याच्या मदतीची जरूरी वाटे—बहुतेक त्याची मदत घेत, कारण हुगळी नदीतून बोट नेण अनोळखी कप्तानाला बरच धोक्याच असत—ते या वाटाड्याना नदीच्या मुखाशी बोटीवर घेत नि त्यावर पुढच काम सोपवीत. या हुगळी नदीच्या वाटाड्यांची साऱ्या दर्यावर्द्यात मोठी ख्याति असे. अनुभविकपणा नि कौशल्य या गुणामुळ या सस्थेला मोठा मान प्राप्त झाला होता, आणि तो कायम टिकवण्यासाठीं त्या वेळीं हे निरनिराळे वाटाडे फार कसोशी करीत.

प्रत्यक्ष नदीमुखापूर्वी सुमारे ३०-४० मैल बाहेर किनाऱ्याच्या दक्षिणेस अतराअतरान दोनतीन तरत्या दीपगृहांची साखळीच नागरलेली आहे म्हणा ना! तांबड्या रगान रगविलेलीं, वर पाढऱ्या ढोबळ अक्षरात त्याचीं नाव लिहिलेलीं अशी हीं मध्यम आकाराचीं तीन होडगीं आहेत. त्यांवर रात्रीं दीप जळत ठेवण्याची योजना करून ठेवलेली असते, नि त्या होडग्याची व्यवस्था पाहण्यासाठीं प्रत्येकावर एक एक माणूस ठेवलेला असतो. या होडग्याची मी साखळी म्हटली ती अशा अर्थान, कीं रात्रीं किंवा दिवसा केव्हाहि जरी

कलकत्त्याला जाणार गलबत आलं दूर समुद्रातून, तर थोडथोडया अंतरानं नांगरलेल्या त्या तिन्हींपैकीं एक तरी दीपनौका दिसून त्याला आपला ठावठिकाणा काढायला मदत होते. या तीनहि दीपनौका दृष्टीस न पडतां एकदम फार उथळ पाण्यांत, किनाऱ्यावर, भलत्या ठिकाणीं गलबत जाण्याचा संभव फार कमी उरतो.

या तीन दीपनौकांचीं नांवं 'पायलट्स् रिज', 'ईस्टर्न चॅनल' नि 'मातला' अशीं आहेत. त्यांपैकी मधलीच्या म्हणजे ईस्टर्न चॅनल या दीपनौकेच्या आसपास हुगळी नदीचे वाटाडे वर असलेलं त्या संस्थेचं एक गलबत असे तें याच ठिकाणीं हिंडत राही. वाटाड्याची जरूरी असणारी एखादी बोट आली कीं, ती या गलबताजवळ ( पायलट्स् ब्रिग ) येई, आणि निशाणानीं खुणा करून स्वतःच्या मदतीसाठीं वाटाड्या मागून घेई.

पुष्कळ दिवसाच्या किंवा महिन्याच्याहि सफरीनंतर, हुगळी नदीच्या मुखाजवळ येऊन 'पायलट' बोटीवर घेण्याकडे साऱ्यांचे डोळे लागलेले असत. पायलट घेतला कीं, 'हत्ती गेला नि शेपूट राहिलं', दीर्घ सफर संपली, आतां येवढी हुगळी नदी पार पडली कीं, जमिनीला पाय लागणार असा वेध मनाला लागे. सफरीचे सारे कष्ट क्षणांत विसरून जात नि चित्त आतुरतेनं बंदराकडे लागे. बंदरात बोट पोंचल्यावर आपण काय काय करूं, कुठं जाऊं, काय खाऊं, कुणाला भेटूं, कशी चैन करूं जिवाची, अशा विचारांत सारे रमून जात. सफरीवर जातांना या बंदरांतील साऱ्या गोष्टी जशाच्या तशा तहकूब करून त्या गुलदस्तांत ठेवाव्या लागत नि सफरभर त्यांची आठवण विसरून, फिरून परत त्या बंदरीं येण्याच्या सुमारास त्यांचीं न्हा हातीं घ्यावी लागत. वाचतांना पुस्तक एखाद्या पानाशीं खूण घालून बंद करून ठेवावं, दुसऱ्या गोष्टीकडे लक्ष द्यावं नि पुन्हा वेळ सांपडल्यावर त्या पानापाशीं पुस्तक उघडून वाचनाची साखळी तुटली तेथपासून पुन्हा सुरू करावी तसंच हें सारं होई.

ज्या खलाशाचे सगेसोयरे असत त्यांच्या भेटीची ते प्रतीक्षा करीत. मुलाबाळामधें चुकला बाप पुष्कळ दिवसांनीं जाई; मुलं मोठीं असलीं तर त्यांना ओळख पटायची, छोटी असलीं तर जणू कांहीं कुणी परका घरीं आला अस त्याना प्रथम प्रथम बुजल्यासारखं व्हायचं नि थोड्या दिवसाच्या सरावान जरा कुठ त्याना ओळख पटू लागे, तो फिरून जायचे दिवस यायचे! कारभारणीला तर या थोड्या स्वर्गतुल्य दिवसात नवऱ्याच काय कोडकौतुक करू, त्याच्या सफरीचा शीण कसा घालवू, त्याला स्वहस्तान गोडधोड त्याच्या आवडीनिवडीच शिजवून कस खायला घालू अस होऊन जाई.

जो मुरलेला जुना दर्यावर्दी असे त्याचे नात्यागोत्याचे सबध नावा-पुरते मात्र उरलेले असत. त्याला बदरात यायची उत्सुकता, जरा फेरबदल करायला मिळणार, चवपालट नि थारेपालट करायला मिळणार म्हणून वाटे. बोटीवरच्या मर्यादित जागेऐवजी मोकळेपणान मनमुराद हिंडायच, नेहमींच्या अधिकाऱ्याच्या हुकमतीखालीं कडक शिस्तींत राहाव लागत त्याऐवजी अनिर्बंध गैरशिस्तींत धिंगाणा घालायचा. समुद्रावर असताना नेहमी खबरदार नि हुषारीन राहाव लागत त्याऐवजी दारू पिऊन गाफीलपणान रात्री काढायच्या बोटी-वर खाण-पिण फुकट असत, कधीं पैशाचं कारणच पडत नाहीं तिथ, नि शिवाय नसतहि कांही खिशात. त्याउलट बदरात आल्यावर दोन-तीन महिन्याचा पगार सफरीच्या शेवटी एकदम मिळल्यानं, खिसा भरलेला असतो नि खलाशाला आपण कुठल्या सस्थानचे अधिपति आहो कीं काय अशी श्रीमती वाटत असते. नेहमी बोटी-वरच्या गैरसोयी बिनबोभाट सहन कराव्या लागतात, त्याऐवजीं पैशाच्या जोरावर सर्वांच्यावर गुरकावत, भाडततडत, वेळेनुसार मारामाऱ्या करीत, गैरसोय स्वतः सहन न करितां लोकाना शक्य तेवढी तसदी द्यायची. बोटीवर कधीं स्त्रियाची सोबत मिळत नाहीं, सगळेच आपले पिंपळावरचे मुंजे! अशा परिस्थितीचा वचपा काढायचा

म्हणून स्त्रियाचा किलबिलाट करणारा, हसत खिदळत अपरिचित शृंगारचेष्टा नि अंगविक्षेप करणारा, मृदु पण मुक्तकंठानं गाणीं नि लावण्या म्हणणारा तांडा भोंवतीं बसवून ठेवून, जणू जहांगिराच्या बादशाहीवर आपण औट घटका तख्तनशीन् आहों अशा मिजाशीनं रंगांत दंग व्हायचं, अशीं अनेक मनोराज्य करण्यात बंदर यायच्या वेळीं खलाशांचीं मन गुंगत.



हिंमतन त्या दुपारीं सूर्याच्या उचीवरून सायतारेची जी जागा गणित करून नकाशावर खूण करून मांडली, ती बरोबर असती तर दोनप्रहरच्या सुमारास सायतारा 'पायलट ब्रिग'च्या दृष्टिपथात यायला पाहिजे होती. त्याउलट दौलतच्या गणिताप्रमाण राल पडेपर्यंत बोट तिथपर्यंत पोंचण शक्य नव्हत. पण शेवटीं सायतारेच्या पुढच्या पहारे-कऱ्यान जेव्हा खरोखरच दोन प्रहरीं पायलट ब्रिग उजव्या नाळेवर दिसल्याच वर्तमान घटेवर एक टोला मारून गर्जून जाहीर केल, तेव्हा हिंमतच नाक वर झालं.

दौलत कठड्याजवळ उभा होता, त्याच्या शेजारीं जाऊन हिंमत म्हणतो, "काय हो! आपल्या हिशेबान रात्रीं दिसणार होतं ना पायलट ब्रिग? मग हे ब्रिग दिसत आहे आता तो आभास आहे, कीं दुपारीं सूर्याची उची साठ अंश साडेपचावन्न कला आपण मोजलीत तो आभास?"

दौलतला अर्थातच हे बोलणं कसं रुचणार? तो म्हणाला, "अरे जा! आकडेमोड म्हणजे नौकानयन नव्हे. आकाश निरभ्र असताना उत्तम हवेच्या दिवशीं बोट मोकळी सोडलीस तरी आपण होऊन

सुद्धा ती पायलट ब्रिगपर्यंत जाईल. मगज लागतो अशा वेळीं, कीं जेव्हा वादळात सूर्यच राहू दे, बोटीच पुढच टोकसुद्धा दिसत नाहीं, नि मग शिकारी कुत्र्यासारख नाकान हुगत माग काढावा लागतो. तुला दुपारीं सागितल तेंच पुन्हा सागतों, कीं तुला काहीं गोष्टी अडल्या म्हणजे माझ्याकडे ये, मी शिकवीन तुला !" अस म्हणत दौलतन आपली पाठ फिरवली नि तो जाऊ लागला. पण त्याचा दंड मजबूत पकडीत हिंमतन त्याला माग खेचल. "तुला मी थांबविल आता तें तुझ्यापासून काहीं शिकण्यासाठीं नव्हे, तर तुलाच कांहीं शिकविण्यासाठीं. तू मुकुलच्या वाटे जाऊ नकोस, तिचा नाद सोड."

"तिच्या नादीं लागलेला मी नव्हे, तूच आहेस."

"म्हणूनच मी तुला सागत आहे, कीं तू तिच्या वाटेस जाऊ नकोस, मी त्याला हरकत घेईन."

"तू कोण हरकत घेणारा? मुकुलची माझी ओळख कांहीं आजकालची तुझ्यामुळ झाली आहे, अस नव्हे. नि शिवाय तिची काळजी घ्यायला तिचे वडील आहेत, जिजी आहे, तुझी लुडबूड कशाला मधें?"

"दौलत! चद्रदत्ताना आणि जिजीला वाटत लहानपणीं होता तसाच तू आहेस. पधरा वर्षांत तुझ्यांत झालेला फरक त्याना अजून कळलेला नाही. पण मींहि तुझ्यासारखा चार बदराच पाणी प्यालेला आहे. मला तुझ्या स्वभावाची चागली पारख आहे. मुकुलच्या बाबतींत मला लुडबूड करण्याचा काय अधिकार ते मी तुला सागण्याची जरूरी मला वाटत नाहीं. पण येवढ मात्र सागतों, की तिच्या इच्छेविरुद्ध तिच्या वाटे कुणी गेला, तर मी त्याची चामडी लोळवीन. माझ्या बोलण्याचा पडताळा पाह्यचा असला तर तिच्या वाटे जा."

"तू असा बोलतो आहेस, कीं एखाद्याला वाटाव मुकुल म्हणजे जगांत उरलेली शेवटचीच एकटी एक मुलगी आहे. कलकत्त्याला उद्यां

आपण जातोच आहों, तेव्हा माझ्याबरोबर सध्याकाळी जरा फेरफटका करायला यायची तसदी घेतलीस, तर मी तुला माझ्या ओळखी दाखवीन; माझ्या मैत्रिणी दाखवीन, सौंदर्य म्हणजे काय, नि तें कशाशीं खातात तेंहि शिकवीन. मग तुला मी बायकाना कोणत्या किमतीन लेखतो हें कळेल. अरे, त्या मुकुलसारख्या छप्पन मुली दाखवतों मी तुला. तिच्यासाठीं येवढी जान कुरबान करण्याइतका मी मूर्ख किंवा तुझ्यासारखा दीडशहाणा नाहीं!"

"मुकुलच्या वाटेला तू का जाऊ नये त्याचीं कारण तूच आपल्या तोडान सांगितलीस. तू स्त्री-जातीला कस लेखतोस, बंदरोबंदरीं कसा धुळवड खेळतोस ते मला माहीत आहे. म्हणूनच मीं तुला सागितल, कीं त्या बिचाऱ्या मुकुलसारख्या निष्पाप, निर्मळ फुलाला झाडावरून खुडून धुळीत टाकण्याच्या पापाचा धनी होऊ नकोस. मुकुल जगात जणूं एकटीच एक मुलगी आहे असें तुला वाटत. पवित्रपणा नि आदर या चिजा काय आहेत त्याची तुला तोंडओळख असती तर मी तुला असें बोलतो ना. तुझ्या नि मुकुलच्या मधें मी अवाक्षर काढल नसत मग. मनमोकळेपणान तुम्ही बोलता चालता नि तुमचा परिचय वाढता तरी मला आनदच झाला असता, दुःख वाटल नसत, पण सहोदर असल्यान तुझे मनोव्यापार कसे चालतात तें मला आपोआप छान कळत. दुसऱ्या कुणाहीपेक्षा मला तुझा स्वभाव— येवढच काय तुझ्या स्वतःपेक्षाहि तुझा स्वभाव—मला जास्त परिपूर्ण ठाऊक आहे. म्हणूनच तुला मी सागत आहे, कीं मुकुलच्या वाटे जाऊ नकोस, तिच्यावांचून तुझ अडेल असहि नाहीं."

* * *

सायतारेच्या डोलकाठीवर एका बाजूला एक मोठ चौकोनी पांढर, मधोमध निळ्या रगाचा चौकोन असलेल निशाण लावलेल होतं. त्याचा अर्थ, 'मला पायलट हवा आहे' असा होता. त्याखेरीज

दुसऱ्या अजावर जहाजाच नांव काय, तें कुठून आल आहे इत्यादि माहिती दर्शविण्यासाठीं त्या अर्थाची निशाण चढवलीं होतीं.

फार पूर्वीपासून दर्यावर्दी लोकांनीं आपल्या सोईसाठीं आतरराष्ट्रीय सदेशवाहनाची पद्धत अमलात आणलेली होती. इग्रजी भाषेमधल्या A पासून Z पर्यंत अक्षरांच्या नावाच एक एक अशीं, चौकोनी लाबट अशा आकाराचीं, विशिष्ट रगानी चिन्हाकित अशीं निशाण ठरवलेलीं होतीं. त्या निशाणाच्या निरनिराळया अनुक्रमान केलेल्या अनेक सचाना निरनिराळे अर्थ ठरवलेले होते. हे अर्थ सर्व देशच्या निरनिराळया भाषात निरनिराळया तऱ्हानीं लिहिले जात असले, किंबहुना एक भाषा दुसऱ्या बोटीवरच्या लोकाना येत नसली, तरी त्या निशाणाच्या विशिष्ट सचाचा अर्थ आतरराष्ट्रीय मान्यतेन एकच समजला जात असल्यान, भाषा येत नसतानाहि निरनिराळया देशच्या दर्यावर्द्यांना एकमेकाचा मतलब दुसऱ्याला कळवण्याची व अर्थबोध भाषेवाचून करण्याची सोय झाली होती. इग्रजींत त्याला The International Code of Signals म्हणतात. उदाहरणार्थ "YR" या अक्षर-समुच्चयाचा अर्थ, "मला गोड पाणी हव आहे" असा होतो, तर "NC" याचा अर्थ 'मी सकटात असल्यान मदतीची मला निकडीन जरूरी आहे' असा होतो. कुठल्याहि देशच्या जहाजानं ती निशाण दाखवलीं तरी पाहणाराला एकच अर्थबोध होतो.

पायलट ब्रिगवरच्या डोलकाठीवर निशाणाचा अर्थ आम्हाला कळला अशा अर्थाच निशाण चढविण्यांत आल, तेव्हा सायतारेवरची निशाण खाली उतरवलीं गेलीं.

कान्होजीराव डेकवर हजर होते. सुकाणाच्या चक्राजवळच उच डेक ही मोठी पवित्र जागा मानीत. तिथ कप्तान किंवा ड्यूटीवर असणारा अधिकारी येवढेच असत. त्या जागेच्या स्वच्छतेकड जास्त कसोशीन लक्ष पुरवीत असत. कोणतेहि समारभ किंवा महत्त्वाचीं काम व्हायचीं असलीं बोटीवर, तर या 'क्वार्टर डेक्' वर तीं होत.

कप्तान नि त्याचे अधिकारी तिथ उभे राहत नि बाकीचे सारेजण त्या क्वार्टर डेकच्या पुढच्या बाजूच्या, उचीन सात आठ फूट खालीं असलेल्या डेकवर जमत. इतर वेळीं बोट चालू असताना त्याच डेकवरून अधिकारी सर्व ठिकाणीं लक्ष ठेवी.

कान्होजीरावांनीं स्वतः सुकाण्याला हुकूम देत सायतारा वळवून पायलट ब्रिगच्या जवळ नेली. आणि मग हवेच्या दिशेन तिच तोंड वळवल. त्याबरोबर सायतारेच्या शिडांमधली हवा निघाल्यान तीं रितीं होऊन फडफडूं लागली चालती बोट थोडा वेळ थांबवायची असली म्हणजे असच उभे राहत.

पायलट ब्रिगपासून एक 'कटर' पाच-दहा खलाशांनी वल्हवीत आणल. वल्हवताना त्या सर्वांची वल्हीं एकदम हालत आणि ती छोटी होडी एखादा जलचर प्राणी आपले बरेचसे पाय हालवीत पुढे येत असल्यासारखी दिसे. तिच्या मागच्या बाकावर एक वृद्धसा पण चलाख माणूस बसलेला दिसत होता, तोच तो पायलट.

ते कटर सायतारेच्या बाजूशी आल्याबरोबर एका खलाशान एक रस्सी बोटीवरून खाली सोडली. तिच टोक धरून कटरमधल्या नाळकऱ्यान कटर बोटीशीं घट्ट धरल. सायतारेवरून एक दोराची शिडी बाजूवरन खालीं सोडली होती. तिला पायलटन उभे राहून प्रथम हिसडा देऊन पाहिला नि मग तो तिच्यावरून वर चढून आला.

नतर खलाशांनीं पायलटचा बिस्तरा बाकस दोरीन वर खेचून घेतली. पायलटचा नोकरहि वर आला. कटरच्या सुकाण्यान 'डफराव' म्हणतांक्षणीं, नाळकऱ्यान बोटहुकान बोटीच्या बाजूपासून कटर दूर ढकलल नि वल्हेकरी वल्हीं ताणू लागले, व कटर पायलट ब्रिगच्या रोखान जाऊं लागल.

पायलट शिडी चढून खालच्या डेकवरन क्वार्टर डेकवर गेल्याबरोबर कान्होजीरावांनीं त्याच स्वागत केल. पायलटन विचारल,

"कप्तानसाहेब! सफर चागली झाली ना? ठीक! तुमच्या बोटीचा ड्राफ्ट किती? (तिला पाणी किती खोल लागत तरायला?)"

"चौदा फूट सायतारा वळते खूप झरझर. तिच सुकाणू जरा थोराडच आहे. थोड्याशा सुकाणान ती भोवऱ्यासारखी गिरकी मारते. सुकाणवाला घ्या आता तुमच्या ताब्यात." कान्होजीराव म्हणाले.

पायलटच्या ताब्यात बोट चालवण्यासाठीं देताना बोटीच काहीं चालणुकीतल वैशिष्ट्य असल तर तें पायलटला सांगण्याची पद्धत असते. पायलटला सारी खडानूखडा माहिती असल्यान त्याच्या कलानं बोट चालवीत, पण शेवटी कप्तानाच्या हुकमतीला त्यान बाध येत नसे. सुकाण्या पायलटच्या हुकुमान बोट वळवीत असला तरी, पायलटच्या-खेरीज बोटीवरचा अधिकारी ड्यूटीवर नेहमीप्रमाण हजर राहून देखरेख ठेवीत राहीच.

पायलटन हुकूम दिल्याप्रमाण सायतारा गगामुखाकड चालू झाली. शिड वगैरे ठीकठाक झालीं. मग पायलटन म्हटल, 'कप्तानसाहेब! आज गगासागर बेटापर्यंत मार्ग क्रमून रात्रीसाठी नागर टाकायचा आहे. उद्या सकाळी दिसू लागल्याबरोबर निघता येणार नाहीं. सूर्योदयानतर तासाभरानतर भरती बेताची सुरू झालेली असेल, त्या वेळी नागर उचलून पुढ निघू."

* * *

सायतारेन गगासागराजवळ नागरट केली होती. मुकुलच्या खोलींत मुकुल एकटीच बसली होती. तिच्या मनात विचाराची गर्दी उसळली होती. 'उद्या'ला कलकत्ता येणार. तिन कधीं एकोणीस वर्षांत आपल कर्णफूल खेडेगाव सोडल नव्हत. तिला कलकत्त्याचीं वर्णन, चद्रदत्त नि जिजी याच्या तोंडून ऐकायला मिळालीं होतीं खरी, पण त्यानीं तिला फारशी कल्पना आली नव्हती. पण त्याहीपेक्षा तिच्या मनांत विचार येत होते ते त्याहीपुढचे होते. कलकत्ता सोडून आपण परत केव्हा निघू नि मग कदाचित् आपण परत चितगावला

पोंचल्यावर पुढ काय करायच ? आता चिंतगावला मनाला पूर्वीसारखी निर्वेध शांति काही मिळायची नाहीं. सायतारा जाईल, किंवा हिंमत जाईल त्याच्या मागोमाग आपल मनहि फिरत राहील. सायतारेवरन केलेली कलकत्त्याची सफर सारखी मनात घोळत राहील, नि दुसऱ्या कशावर चित्त लागायच नाहीं. सायतारेवरच आपल्याला राहण शक्य होईल का ? या छोट्या सफरीवरन परीक्षा केली तर हिंमतच्या सान्निध्यात असच नेहमीं राह्यला मिळाल तर किती सुख लागेल जिवाला!—–

इतक्यात खोलीच दार उघडून जिजी आत आली आणि मुकुलच्या विचारांची तद्री जिजीन नष्ट केली. जिजी म्हणते, "मुकुल, तू आता मोठी झाली आहेस हो फार. तुझ लग्न करून टाकल पाहिजे. अनायासे आलो आहों कलकत्त्याला आपण, आणि राहूहि थोडे दिवस आल्यासारखे, तर हेहि एकदा काम उरकून टाकल पाहिजे." नंतर मुकुलच्याकड निरखून पाहून अभिमानान तिला जवळ पोटाशीं ओढीत म्हणते, "आमची ही पोर, अशी लाखात मिळण दुर्मिळ. कुठल्याहि मोठ्या धनाढ्य जमीनदाराच्या घरीं गृहलक्ष्मीसारखी शोभून दिसेल, नि बाई, मी तुला लहानाच मोठ केल तें कस तळहाताच्या फोडासारख. माझ्या या सोन्याच्या सखुबाईला स्थळहि अस मिळाल पाहिजे, कीं सतरा कुळंबिणी नि चाकरमाणस आजूबाजूला उभीं हवींत, 'जी हुजूर' करीत. पोरी! तुला लाडान वाढवल, नि अजून तू लाडूबाईसारखीच वागतेस! नाहीं तर तुझ्या वयाच्या पोरी किती नम्रतेन, आजुळेपणान वागतात. तेव्हा तुला स्थळ मिळाल पाहिजे चागल श्रीमत बिजवराच, म्हणजे आमची ही मुकुल कशीहि वेडी असली तरी नवऱ्याला तिचं आपल सारच कौतुक वाटून तो नुसता तुझ्याभोंवतीं 'बायको ग' करीत हिंडला पाहिजे."

जिजीच तोंड अफाट असे. तिन एकदा बोलायला सुरुवात केली कीं, तें मग तिला आवरायच नाही. एकान दुसरं, दुसऱ्यानं तिसर अस

बोलणं काढीत त्यांत काय काय गोष्टी येतील त्याचा मग सुमारच नाहीं. आता तिला त्या 'बायको ग' गाण्याची आठवण झाली. खदखदून हसून ती पुढ म्हणते, " मुकुल, तुझी आई मोठी गमती असायची. तिनं काय काय जीं कवन करायची नि म्हणायची ती एकता ऐकता हसून साऱ्याचीं पोट दुखत. हें 'बायको ग'च गाण असच मोठ मजेच होत. काय बाई होत ते ? ह—म्हणे,

" मला नको वडील, तुला नको सासरा,
मला तुझा आसरा, बायको ग।

मला नको आई, तुला नको सासू,
आपण दोघ असू, बायको ग।

मला नको भाऊ, तुला नको दीर,
मला तुझा धीर, बायको ग।"

हे 'बायको ग'च गाणं, त्या गाण्यातील नवऱ्याचे सारे नातलग उद्धरीपर्यंत चालवल असतन् जिजीन, पण मुकुल म्हणाली, " जिजी माझ किनई या उबट हवेन डोक जरा चढलय्. मी बाहेर थड हवेंत हिडतें ग, म्हणजे थाबेल जरा." आणि जिजीन यावर काहीं म्हणण्या-पूर्वीच ती याहि वेळी चटकन् बाहेर पडली. तिच्या मनात कसले विचार चालले होते, नि जिजीच आपल काहींच्या बाही तिसरच बोलण !

मुकुल हिंडतां हिंडता हिमत कुठ आहे ते शोधू लागली. तो नकाशाच्या खोलीत पायलटशीं काही बोलत उभा होता. त्याची वाट पाहत ती बाहेर थाबली. अधार पडला होता नुकताच. कुणी तरी व्यक्ति हिंमतच्या खोलींतून बाहेर पडली. तिच्या हातात काहीं तरी लपेटलेली वस्तु होती. त्या व्यक्तीनं आजूबाजूला कुणी नाहींस पाहिल नि बोटीच्या पुढच्या भागात खलाशी राहतात त्या बाजूला ती व्यक्ति झपझप चालत गेली.

इतक्यात पायलटशी बोलणं सपवून हिमत खाली येत होता. मुकुल त्याच्याजवळ गेली नि म्हणाली, " तुम्ही कामात आहा ? "

" छे ! दुसर काहीं काम नाहीं, तुझ्याशीं मात्र आहे काम."

" माझहि तुमच्याशी काहीं काम होत."

" ठीक आहे, तुझ काम अगोदर साग तर."

" हिमत, आपण कलकत्त्याला किती दिवस राहू ? "

" महिना दीड महिना राहू. कदाचित् जास्ती किंवा कमी. आपण कलकत्त्याला अजून धड पोचलोंहि नाही, मग कलकत्ता सोडण्याची गोष्ट कशाला ? "

" कलकत्त्याहून परत आम्ही सायतारेबरोबर चितगांवला येऊ ना ? "

" ते तरी मला आता काय बर माहीत ? निघायच्या वेळीं पाहू ते."

" हिमत ! जिजी म्हणत होती, की माझ लग्न कलकत्त्याला करून देणार आहेत ते या मुक्कामात." अस म्हणून हिमतच्या चेहऱ्यावर त्याचा काय परिणाम होतो तें ती लक्षपूर्वक पाहत होती.

पण अगदीं शातपणान हिमत म्हणतो, " छान ! तर मग मलाहि तुझ्या लग्नाला हजर राहता येईल ! "

त्या उत्तरान मुकुलची निराशा झाली. ती पुढ तशीच म्हणते, " मला वाटल तुम्हाला हें एकून वाईट वाटेल."

" वा: ! अग, तुझ लग्न होणार चागल अन् त्यात मला वाईट वाटाव ! नाहीं तरी तू मोठी झाली आहेस. चद्रदत्त आता वृद्ध झाले आहेत. तेव्हा आता लवकरच तुला कुठ तरी चागल स्थळ पाहून दिल म्हणजे तुझ्या काळजीतून ते सुटले. तुला सुखी झालेल पाहिल म्हणजे त्यानाहि वृद्धपणीं सुख लागेल.

" मला नाहीं अशा लग्नान सुख लागायच ! " मुकुल म्हणाली. तिचा आवाज जड जड येत होता. हिमतला मुकुलचे विचार पूर्ण कळून चुकले होते, पण जाणूनबुजूनच काही लक्षात न आल्यासारख

दाखवीत बोलून तो मुख्य प्रश्नाला बगल देत होता. मुकुल पुढं विचारते, " माझं लग्न झाल्यावर तुम्ही काय करणार ? "

" मी काय सध्या करतों तेंच करणार! सायतारेवरून दर्यावर्दीपणा करणार, नि ज्या ज्या वेळीं कलकत्त्याला बोट येईल त्या त्या वेळीं तुझ्या घरीं येईन, तुझ्या मुलाबाळाना दूरदूर देशातून सुंदर सुंदर खेळणीं आणीन."

" आणि मग तुम्हाला लग्न करायची इच्छा झाल्यावर, माझी नाहीं आठवण होणार ? "

" छे, छे! मी नाहीं लग्न करणार. मला लग्न करायचं असलं तर मी तुझ्याशी आताच लग्न ठरवीन कीं! पण मी पेशानं दर्यावर्दी फिरस्ता, या आयुष्याचं नि लग्नाचं जमत नाही."

आता मात्र मुकुलच्यान राहवेना. ती स्फुंद स्फुंदून रडूं लागली हे पाहून हिमतचाहि जीव कळवळला. तिला जवळ ओढ्न, गोंजारून तिच्या केसावरन त्यान हात फिरवला, तों मुकुलला जास्तच भडभडून येऊं लागलं. तिला घेऊन तो आपल्या खोलीकडं गेला. त्याची खोली बाकीच्या खोल्याच्या विरुद्ध बाजूला असल्यानं जास्त निवान्त होती.

तिला कोचावर बसवून तो तिच्यासमोर स्टूल ओढून घेऊन बसला नि तिचे जोडलेले हात आपल्या हातात धरून तिला म्हणाला, " मुकुल, माझ्याकडं पाहा आता."

मुकुलनं आज्ञाधारकपणानं आपला चेहरा वर करून हिमतच्या दृष्टीला दृष्टि भिडवली, हुदके दाबण्यासाठी तिनं आपले नाजुक, पातळ ओठ घट्ट मिटून आवळून धरले होते. अन् त्यामुळं हुदक्यानीं तिच्या नाकपुड्या आवेगानं थरथरून हालत होत्या. तिचे केस थोडेसे विस्कळित होऊन काहीं बटा कपाळावर पुढं आल्या होत्या. तिचे हात हिमतनं धरले होते ते सोडवून घेऊन डोळे पुसायचा प्रयत्न ती करीत नव्हती, त्यामुळं तिच्या लाल झालेल्या टपोऱ्या विस्फारित

डोळयात अश्रु जमत, त्यानीं डोळे डबडबून जात, नि शेवटीं पाणी मावेनासं झाल्यावर गरगरीत थेंब खालच्या पापणीच्या केसावरून प्रथम वेगानं तिच्या आरक्त गि अतिशय गौरवर्ण नितळ गालावर ओघळत, नि मग नुसता तो ओला ओघळच चकाके.

तिच्या त्या दुःखपूर्ण चर्येतहि ती आतिशय मोहक दिसत होती. कदाचित् त्यानं मोहूनच हिंमत क्षणभर जास्त तिजकडे पाहत राहिला असावा. मुकुलच्या त्या चेहऱ्यावर अगतिक प्रेमाची शरणागति, अनन्यसाधारण विश्वास, नि जीव तोडून केलेली विनवणी असे अनेक भाव व्यक्त झालेले होते.

"मुकुल, त्या रात्रीं मी तुला म्हणालो ना, कीं मन आवरलं नाहीं तर एक नवीनच, न आवरणारं घटनाचक्र फिरू लागेल म्हणून? ते हे असं.— त्याच रात्री गोष्टी अशा घडतील असं मला माझं मन सांगत होतं. तुझा मीं मुका घेतला तर त्यानं प्रेमाचा बांध फुटून त्या प्रचंड प्रवाहाखाली तुझा नि माझाहि जीव गुदमरेल, असं मला वाटत होतं तेंच खरं ठरलं. तुझ्या मनाचे हे सारे क्लेश वाचावे म्हणून मी तुला खोलींत परत पोचविणार होतों त्या रात्री."

"पण झालं त्याबद्दल मला मुळींच नाहीं दुःख वाटत." मुकुल म्हणाली, "मला दुःख वाटतं तें तुमच्याशीं लग्न करायला मिळणार नाहीं म्हणून. तुम्हीं म्हणता तुम्हाला दर्यावर्दी पेशात सारा जन्म काढायचा. मग त्याला काय हरकत आहे? मीहि तुमच्याबरोबर सदैव तुमच्या बोटीवर राहीन अन् तुमच्याबरोबर सगळीकडे हिंडेन. मग माझं आणि तुमचं लग्न तुमच्या समुद्रसंचाराच्या आड कसं येईल? तुमची आई नाहीं का जन्मभर सायतारेवर राहिली?"

हिंमतच्या आईचा उल्लेख केल्याबरोबर हिंमतनं आपल्या टेबलाकडे नजर टाकली. तिथं तिची तसबीर ठेवलेली असे. ती दिसेना. "आईची तसबीर कुठं गेली इथली?" तो म्हणाला. मुकुलनंहि टेबलाकडे पाहिलं. पुढं तो मुद्द्याकडं वळून म्हणाला, "मुकुल, आईच्या

बाबतींत गोष्ट निराळी होती. तिला बोटीवर राहण्याशिवाय गत्यतरच नव्हत."

"माझा जीव तुमच्यावर असताना, तुम्ही जर सदैव बोटीवर रहणार तर मग मलाहि तुमच्या बोटीवर राहण्याखेरीज गत्यतर नाहीं राह्यच." मुकुल मधेच म्हणाली.

प्रेमाविरुद्ध तर्कशुद्ध युक्तिवादाची मात्रा कधींच लागू पडत नाहीं. हिमतलाहि त्याची जाणीव झाली. तो म्हणाला, "मुकुल ! पुष्कळ वेळ आहे आपल्याला या गोष्टीचा विचार करायला. आता रात्र झाली. चल जा तुझ्या खोलीकडं. उद्या सकाळीं तुला जिजीबरोबर गंगासागरांत स्नान करून गगासागराच दर्शन घ्यायच आहे ना?"

पण खोलीबाहेर जाण्यापूर्वी मुकुलन आपले ओठ वर आशाळभूतपणें उचलले. तिच थोड समाधान व्हाव म्हणून हिमतन तिच्या ओठावर क्षणभर आपले ओठ टेकले. पण मग त्याच्याच ओठाना चटक लागली नि दुसऱ्यादा त्यान आपले ओठ मुकुलच्या अधराजवळ आणले त्या वेळीं मात्र हिंमत नि मुकुल या दोघाच्याहि बाहूना नि मुखाना वेळेच भान उरल नाही अस दिसल-- हें सर्वभक्षक प्रेम ! !



गंगामुखाशीं सुंदरबन नांवाचा निबिड अरण्यानं व्यापलेला प्रदेश आहे. गंगेच्या पाण्यानं वाहून आलेल्या मातीमुळं ही सारी जागा अतिशय सुपीक बनलेली आहे. पावसाळ्यांत पर्जन्याची रेलचेल, तर इतर ऋतूंत गंगेच्या पाण्याचीच विपुलता नि सान्निध्य यामुळं जंगल असं दाट वाढलं होतं, कीं त्यांतून वाट काढणं मुष्किल! नदीच्या दोन्ही तीराजवळचा कांहीं प्रदेश सोडून जरा पलीकडं गेलं कीं, दाट जंगल लागे, आणि त्यांत हिंस्त्र पशु आणि मोठमोठे पट्टे वाघ यांचं राज्य होतं. नदीमुखाशीं गलबत बुडालं तर त्यावरच्या तीराला लागणाऱ्या खलाशांनीं सुंदरबनांतून वर कलकत्त्याकडं चालत मार्ग काढण्याच्या भरीस पडूं नये, अशा सूचना कप्तानांना दिलेल्या असत. कारण अपेक्षेबाहेर दाट अरण्यांत मार्ग चुकून, भुकेनं तडफडून, किंवा वन्य पशूंच्या भक्ष्यस्थानीं पडून या जंजाळांतून फारच थोडे पार पडत. त्यापेक्षां नदीतीरावरच्या जरा मोकळ्या भागांतच थांबून, जाण्यायेणाऱ्या गलबतांवरच्या खलाशांचं लक्ष वेधून, त्यांच्याकडून आपली सुटका करून घेणं हें जास्त सोईचं असे.

या दाट सुदरबनांतील निर्जनतेमुळच ज्याना लोकाना टाळावयाची इच्छा असेल अशाना हें ठिकाण मानवे. लोकामधें राहिल्यान साहजिकच लोकाची बधन माणसावर पडतात. इच्छा असली नसली तरी त्याच्याशीं सबध पदोपदीं आल्यान ही जोखड नाखुषीन सहन करावी लागते. ज्याना मन मानेल तस अनिर्बध वागण आवडतं अशाना विजनस्थळी हवा तो मोकळेपणा मिळतो. म्हणून एक तर ऐहिक सुख-दुःख, संसारपाश वगैरेमधून स्वतःच अग काढून घेऊन, विरक्त बनून ईश्वरोपासना निर्वेध करणारे तडीतापसी अशा ठिकाणीं येऊन राहत, किंवा सर्व जनसमुदायांत राहून नेहमीच्या मार्गांनीं मिळेल त्यापेक्षा पुष्कळ जास्त संपत्तीचा व ऐश्वर्याचा वाटा आड मार्गांनीं नि अत्यत जलदीन मिळवण्याचा हव्यास धरलेले लोक, आपल्या शिजणाऱ्या कारस्थानाकडे लोकाच लक्ष वेधू नये म्हणूनहि अशाच विजन प्रदेशांचा आश्रय धरतात. अत्यत विरागी, किंवा अत्यंत लोभी व महत्त्वाकांक्षी अशा दोन्हीहि विरुद्ध जातीच्या व्यक्तींना असा निर्वेधपणा लागतो. जगातल्या अनेक इतर गोष्टींप्रमाणं एकाच परिस्थितीचा उपयोग अत्यंत विरोधी दिसणाऱ्या साध्यांसाठी निरनिराळया साधकाना होत असतो.

गगासागराजवळ गंगामुख इतक विस्तीर्ण आहे, कीं नदीची दोन्ही तीर नीट दिसत नाहींत. दहा मैल रुद अशा मोठमोठ्या खाड्यांनीं सारा भूमिभाग विभागून गेलेला आहे. अनेकविध मुखांनी गंगा सागराला मिळते. जणू काहीं मोठ्या सागराशीं एकरूप होण्यापूर्वी गगोत्रीहून आलेल्या या हिमकन्येला आपलाहि विस्तार नि बडेजाव इतका वाढवावा लागतो; नाहीं तर ही आपल्या तोलाची नाहीं, तुल्यगुण नाही अस वाटून सागर तिचा अव्हेर करायचा एखादवेळीं!

नदीचीं तीरहि फारशीं उच नसतात. त्यामुळ नदीला पाणी आल कीं, हा-हा म्हणतां तें किनाऱ्यावर चढून आजूबाजूच्या साऱ्या प्रदेशावर पसरत. क्रीडापटु कामिनी प्रियकराला वश होण्यापूर्वी त्याला

हुलकावण्या दाखवीत त्याला अधीर करते, तद्वत् गगा समुद्राला मिळण्यापूर्वी आपला प्रवाह बदलीत, वळण घेत घेत, लाजत, मुरडत जातेशी दिसते.

गंगासागर बेटाजवळ एक सुदर देवालय होत. मोठमोठ्या वृक्षाच्या हिरव्गाचार दाट राईत त्या देवळाच्या भिंतींचा पांढरा सफेत रग खुलून दिसे. देऊळ होत लहानसच, पण त्या मानान त्याची उची बरीच वाटे. त्याच्या कळसावरून आणखी क'ही भगवी त्रिकोणी निशाण फडकत होती.

बगाल्यातून व कलकत्त्याहून कित्येक भाविक लोक गगासागरात स्नान करण्यासाठी येथें येत, आणि त्यांना कृतकृत्य झाल्यासारख वाटे. हिंदु सस्कृतींत परपरेन ज्या अनेक गोष्टींबद्दल हिंदु मनाला पूज्यभाव उत्पन्न झालेला असतो अशामधे, हिमालय, गगा नि समुद्र याना बरच अग्रस्थान असल्यान हिमालयामधल्या हिमनद्यातून स्फूर्त झालेली, नि शेंकडों मैल भरतभूप्रदेशावरून वाहत आलेली ही गगा–भाविक तिला माता म्हणतात—समुद्राशी समरस होते त्या या त्रिवार पवित्र तीर्थात स्नान करण्याच त्याना केवढ महत्त्व वाटणार हे सांगायला का पाहिजे ?

सायतारा गगासागराजवळ रात्रभर नागरलेली होती; आणि सकाळीं सुद्धां फार लवकर पुढं निघता येत नसल्यानं अवधिहि होता. अशी गगासागरात स्नान करण्याची चालून आलेली सुसधि जिजी गमावणं शक्य नव्हत. तिच्याबरोबर मुकुललाहि ते पुण्य आपोआप घडायचं होतं. चद्रदत्त फारसे भाविक नसले तरी फारसे नास्तिकहि नव्हते. त्यामुळं स्नान करायला त्याचीहि हरकत नव्हती. चला, स्नान तर करून घेऊ या. पुण्य असल खरच तर लाभेल; बर नसलं तरी कांहीं स्नान केल्यान बिघडत नाही, अस त्यांच सोईच नि हिशेबी धोरण होत. तेव्हा सायतारेपासून पहाटे निघालेल्या 'कटर'मधें जिजी, मुकुल नि चद्रदत्त तिघेंहि बसलेलीं दिसलीं.

कान्होजीराव असल्या धार्मिक बाबतींत फारच उदासीन होते. उभा जन्म समुद्रावर काढल्यानं व निरनिराळ्या बंदरींच्या बहुदेशीय नि बहुधर्मीय माणसाशीं सारखे व्यवहार पडल्यानं 'साधीसुधी माणुसकी' या एका गोष्टीखेरीज दुसऱ्या कोणत्याहि धर्माची त्याना जरूर वाटत नसे, कीं इतर कोणतीहि धार्मिक बंधनं त्यांच्या खिजगणतींत नसत! माणसाचा पेहराव कसाहि असो, त्याची भाषा कशीहि असो, त्याचा वर्ण श्वेत, पीत, कृष्ण, रक्त कसाहि असो, त्याच्या धार्मिक समजुती कशाहि असोत, त्या गोष्टी ज्याच्या त्याला. आपल्याला त्याशी काय कर्तव्य आहे? कोणत्याहि कारणानं व्यवहारांत आपला त्याशीं संबंध आला तर सरळपणानं नि सचोटीनं त्याशीं वागावं, बस झालं; मग त्याच्या आवडीनिवडी त्याला, नि आपल्या आपल्याजवळ! अशी दर्यावर्दीची वैशिष्ट्यपूर्ण सहिष्णु वृत्ति कान्होजीरावाच्या अंगीं बाणली होती. तेव्हा त्याना 'गंगासागरा'च्या दर्शनाचं नि स्नानाचं काहींच महत्त्व नव्हतं.

दिशा उजळायला लागल्या होत्या. गंगेचं गढूळ पाणी सारखं वाहत होतं. हे 'कटर' तीराकडं वल्हवून येत असतां, तीराजवळ येण्याच्या जरापूर्वी त्याच्या मार्गांत कमरभर पाण्यात कुणी व्यक्ति उभी होती. अजून नीट दिसू लागलं नसल्यामुळं कटरच्या सुकाण्यानं कटर त्या व्यक्तीच्या बरंच जवळून नेलं. इतकं कीं, झिलमिट कटरच्या नाळेंत वल्हं धरून बसला होता, त्याचं वल्हं त्या व्यक्तीच्या आड आलं नि तें झिलमिटला वर उभं करून ओवाळून बाजूला काढावं लागलं. सावळ्या सुकाणाशीं होता त्याला ओरडून झिलमिट म्हणत होता, "अरे, नीट पाहतसुद्धा नाहींस का कुठं कटर चालवलं आहेस तें? या मच्छीमाराच्या जाळ्यात अडकवणार तू सुकाणं." इतकं म्हणता म्हणता कटर त्या व्यक्तीच्या जवळ आलेलं होतं. झिलमिटनं वल्हं त्या व्यक्तीला अडलेलं उभवून काढतांना त्या व्यक्तीकडं अगदीं जवळून पाहिलं, नि त्याचं धाबं दणाणलं.

कटर पुढ तीराकड पोचल्याबरोबर तो सावळ्याला म्हणतो, " सावळ्या, अरे तुला दिसत नाहीं का मुळींच ? तो मासेमार नव्हता. मीं त्याच डोळ पाहिल. नक्षत्रावानी चमचम करत होते ! मीं वल्ह उभ करताना पाहिल नि मला भीति वाटली. काय रे डोळ ते ! तो कुणी महापुरुष आहे. गंगेमध पहाटेचं उभ राहून तप करत होता. नि गाढवा सावळ्या, तुला नीट लक्ष ठेवायची शुद्ध नाहीं. त्यामुळ माझं वल्ह लागल त्याला. तुझी चूक नि मला शाप. देवाच्यान माझ्या जिवाला मोठी धाकधूक लागलीय. आता याचीं स्नान होत्याल तोंवर लक्ष ठेव त्या पाण्याकड. मीहि पाहतों. दिसला तो साधु तर मी पाय धरणार आहे त्याचे."

कटर नदीतीराशीं नांगरल्यावर चंद्रदत्त, जिजी नि मुकुल त्यातून बाहेर येऊन स्नानाची तयारी करू लागली. जिजीन ढोपरभर खोल पाणी लागल्याबरोबर पुढ जाण्याच थांबवून स्तोत्र म्हणण्याला सुरुवात केली; पुण्यसाधन करायचं असल, तरी फार खोलात जाण्यात अर्थ नाहीं असा तिचा स्वभाव. तेवढ्या ढोपरभर पाण्यातच तिनं स्नान करायला सुरुवात केली. तिथ ती खाली बसली असती तरी तिच तोंड पाण्यावर राहिल असत इतकं थोड पाणी होत. तरी-सुद्धां डाव्या हातान ओल्या लुगड्याचा पिळा गुडघ्यापाशीं उचलून धरीत, उजव्या हातान नाक दाबून धरीत, तोंडान गेंगाण्या आवाजात 'जय गंगे ! महाभागीरथी !' असा, ( चित्रगुप्त पहाटेच्या झोपेंत असल्यास जिजीच्या हिशेबीं पुण्य ल्याहायच विसरायचा एखादा, तेव्हा त्याला सुद्धा जागें करील असा ), मोठ्यान जयघोष करीत जिजीन पाण्यात बुचकळी मारली. पाण्याचा डोक्याला स्पर्श होतो न होतो तों डोक वर काढून ती उभी राहिली आणि पाहतें तो मुकुल तिच्याकडे पाहून गमतीखातर हसत उभी होती तीरावर.

" जिजी ! अग जरा आणखी पुढ जा कीं ! मासासुद्धा बुडायचा

नाहीं येवढ्या पाण्यात तुला बुचकळी कशी मारता येणार? काहीं बुडायची नाहींस हो तू, जा पुढ."

जिजीनं मुकुलकडे पाहत म्हटल, "थांब हो कार्टे!"—दुसरी बुचकळी मारीत, "जय गंगे, माई भागीरथी!", नि डोकं वर आल्यावर नाक तसंच दाबून धरलेलं ठेवीत पुन्हा मुकुलला उद्देशून गेंगाण्या स्वरात—"माझी चेष्टा करतेस म्हातारीची!"

असें म्हणत तिनं पुन्हा तिसरी बुचकळी मारली? नि कृतकृत्य होऊन ती परत येऊं लागली. मुकुलनं तितक्यात पुढं येऊन तिला हाताला धरून पुढं खोल पाण्यात ओढायला सुरुवात केली चेष्टेनं. तेव्हा घाबरत जिजी म्हणते, "अग गाढवी! कार्टे! बुडवशील की मला!" मुकुलनं हात सोडल्याबरोबर शक्य तितक्या जलद पाय उचलीत तिनं तीर गाठलं नि लुगडं बदलीत, कुडकुडत, तोंडानं काहीं स्तोत्राचे शब्द नि मधेंच मुकुलला उद्देशून काहीं शब्द असें बोलत जिजी उभी राहिली.

आता लख्ख प्रकाश पडलेला होता. सूर्याचं बिंब वर येऊन गोल गरगरीत दिसत होतं. सूर्यबिंबाची कडा स्पष्ट होती नि त्याच्यामधे अतिशय तेजस्वी नि जवळ जवळ बिनरंगाचं पण सारखं हालणारं नि स्फुरण पावणारं असं द्रव्य असल्यासारखं टक लावून पाहिलं कीं दिसे.

पांढरे बगळे आपल्या कर्कश स्वरानीं किलबिलाट करीत होते. ते पाण्यासरपट उडत, पंख न हलवता पाण्यासमांतर राहत, माना एकदां इकडे, एकदां तिकडे करीत. पाण्याच्या पृष्ठभागावर बोंबिलाची जरा कुठं कड दिसते ना दिसते तो झडप मारून एखादा बगळा अतिचपळतेनं बोंबील चोंचींत पकडून घेई. मग काही वेळ दुसरे बगळे त्याचा पाठलाग करीत. पहिल्याच्या चोंचींतून बोंबील निसटला त्या झटा-पटींत, तर तो पुन्हा पाण्याला स्पर्श करण्याच्या पूर्वींच दुसरा एखादा बगळा तो बोंबील वरच्यावर हवेंतच चोंचीनं पकडी. थोडेसे मासे गिळून झाल्यावर, ते अल्लद येऊन पाण्यावर बसत, नि आपले पंख

मिटून घेत. पाण्याबरोबर वाहत जाताजाता मधेंच ते आपल्या पायांनीं पाणी वल्हवीत इकडे तिकडे वळत, किंवा मधेंच मान पुढ वाकवून पाण्यांत बुचकळीत, तर मधेंच चिवचिवाट करीत पुन्हा हवेंत भरारी घेत.

ओल्या जमिनीचा गोड वास, सकाळची ताजी थंड हवा, कोमल नि पिवळसर सूर्यकिरण, प्रवाह वाहताना पाण्याचा होणारा मंजुळ खळखळाट अशा साऱ्या गोष्टी मिळून होणारी त्या वेळच्या गंगा-सागराची शोभा अवर्णनीय होती!

झिलमिटनं नीट लक्ष ठेवलं होतं त्या व्यक्तीवर. ती पाण्यात अजून उभी होती. त्या जागीं पहाटेच्या अंधारांत वाटलं त्या मानानं पाणी जास्त होतं. तो पुरुष वळला नि अत्यंत जलदपणें तीरावर येऊन पोंचला. जटा पांढऱ्या शुभ्र, अंगानं सडपातळ, नि कमालीचा उंच असा तो पुरुष होता. त्याच्या त्या तेजःपुंज चेहऱ्याकडं पाहिल्यावर तर झिलमिटची जवळ जवळ आश्चर्यानं नि आदरयुक्त भीतीनं वाचाच बसली.

आपल्याच विचारात गढलेला नि बाकी कशाचं भान नसलेला तो पुरुष इकडे तिकडे न पाहता, झपाझप लांब लांब ढांगा टाकीत गंगा-सागराच्या देवळाकडं चालता झाला. झिलमिट 'आ' वासून पाहत होता. त्यानं भानावर येऊन त्या पुरुषामागं धूम ठोकली.

देवालयाजवळ झिलमिटनं त्याला गांठलं, आणि त्या पुरुषाचे पाय घट्ट धरिले. पाय धरल्यावरच त्या पुरुषाचं लक्ष झिलमिटकडं गेलं. त्यानं झिलमिटकडं पाहत विचारलं, "बेटा! क्या चाहता है?

झिलमिटनं सकाळीं त्याच्या हातून वल्ह लागल्याबद्दल क्षमा मागितली. तेंव्हा तो पुरुष म्हणाला, "ऐसा? मुझे तो कुच भी नहीं लगा."

झिलमिट म्हणाला, "महाराज! मुझे कुच आशीर्वाद दीजिये."

"आशीर्वाद की जरूरी क्या है? जैसा तेरा कर्म, वैसा तेरा प्रारब्ध."

अस तो म्हणून जाणार इतक्यात सावळ्यान सांगितल्यावरून जिजी नि मुकुल लगबगीन तिथ आल्या होत्या, त्यानींहि नमस्कार केले.

त्या सर्वोच्याकड शात नि दयापूर्ण दृष्टीन तो पाहत होता; मुकुलकड पाहिल्यावर एकदम तो उद्गारला, “अम्मा! हिमाचल छोड के तू यहा क्यौ आयी? सागरसे मिलनी चाहती है तू? वो नहीं मिलेगा तुझे. देखो गगामाता कैसी आयी है इतनी दूरतक गगोलीसे. लेकिन सागर को मिल जाती है तो फिर सूरजसे बादल बन कर उसको फिरही हिमाचलपर जाना पडता है. लेकिन इससे भी सतानो को पानी और खाना मिल सकता है. हा, ठीक. अम्मा! तुझें वैसेही जाना है. भगवान् प्रभुकी लीला येही है.” अस म्हणत तो पुरुष त्याच्यापुढून गेला. त्यान लोट्यांतल पाणी देवळातल्या पिंडीवर ओतल, नि मग तो फिरून झपाझप ढागा टाकीत सुदरबनातल्या दाट जगलाकडे जात दिसेनासा झाला.

तीं सर्वजण त्या पुरुषाच्या दृष्टीच्या नि बोलण्याच्या जादून भारावल्यासारखीं दिसत होती. तो दिसेनासा झाल्यावर ते बोलू लागले —

जिजी म्हणाली, “काय बाई तरी महापुरुष! आशीर्वाद दिला नाही, की प्रसाद दिला नाहीं. गगेबद्दल चार वाक्य बोलला काय, नि एकदम निघून गेला काय! साराच या महापुरुषाचा लोकविलक्षण प्रकार! नाही तर त्याच्या हातावर काहीं दक्षणा टेविली असती मी. नशिबीं नाही त्याच्या!” अस म्हणत जिजीन हातातले पैसे परत कडोसरीला लावले.

झिलमिटला खरा मनापासून आनद झाला आपल्याला शाप मिळाला नाहीं म्हणून.

पण सावळ्यान नि त्यान तिखटमीठ लावून जें आति अद्भुत वर्णन आपल्या सोबत्याना ऐकवलं त्यावरून त्या दोघासाठीं स्वर्गात

पांच रुपयाच्या खुर्चीच पहिल्या रांगेतील तिकीट राखून ठेवलं गेलं आहे असा त्याचा समज झाला असला पाहिजे.

एकटी मुकुल मात्र त्या साधूच्या वाक्यान विचारात गुगली.

*　　　*　　　*

सुदरबनांतील या देवळाच्या उत्तरेस दीड दोन कोस अतरावर दाट जगलात एक गढी होती. त्या गढीपर्यंत खाडीचा एक छोटा फाटा पोचत असल्यामुळ गढीपासून होडीन नदीच्या मुख्य प्रवाहापर्यंत सहज जाता-येता येत असे.

गढी माणसानीं नि होड्यानी गजबजलेली होती. गढीजवळच्या छोट्या खाडीच्या दोन्ही तीरावर अनेक होड्या उभ्या होत्या. उथळ पाण्यात चिखलात खोल रोवून ठेवलेल्या कळकाना दोरीन बाधून काही नावा तरगत होत्या, तर काहीं तीरावरच्या उतरत्या रेतीवर पाण्याबाहेर ओढून ठेवल्या होत्या. काहीं उपड्या करून त्यांच्या तळावर दुरुस्त्या चालू होत्या, तर काहीं जुन्या मोडक्या फुटक्या होड्यांचीं लाकड नि सागाडे काही ठिकाणीं पसरले होते. कोळयाच्या लहानमोठ्या होड्या बाधण्याचा कारखानाच होता इथ.

त्याशिवाय कोळयाचीं जाळीं विणलीं जात होतीं. तीरावर लाबवर दोऱ्या पसरून कोळणी हातातल्या दोरीच्या बिंडयातील दोरी त्यामधून खालीं-वर विणीत व भराभर गाठी मारीत, नि पाहता पाहतां जाळ तयार होई ! त्याच्या हाताइतक्याच जोरान त्याचीं तोंडहि काम करीत होतीं. उधानीच्या मोठया ओहोटीच्या वेळीं गंगौघाच्या लाटा जितका खळखळाट करीत त्याहून जास्तच खळखळाट या साऱ्या कोळणींच्या बडबडीन झाल्यासारखा वाटत होता.

“ का ग, जमनी दिसत नाही कुठं ? ”

“ गेली असेल चौधरीच्या घराकड. तिला अलीकड दुसर सुचतच नाहीं. ती सारखी घोटाळत असते त्या पोरामाग.”

“आपल्या चौधरीचा बनबीर म्हणतेस होय तू? त्याच्याशीं तर तिच लगीन ठरलय् ना?”

“चौधरीन लग्न ठरवलय. तो म्हणतो ही सारी वाडी माझी नि सारी कोळीलोकं बी माझीच. माझ्या मुलाला बायको करीन तीहि वाडीमधलीच येकादी पोर हवी. बनबीराला बायको शोधायची दुसऱ्या ठिकाणची कशाला? म्हातारा चौधरी मोठा समजुतीचा आहे. त्यान साऱ्या पोरींमधून ही जमनी पसत केली सून म्हणून. म्हणाला कसा, ही जमनी म्हणजे बिजली आहे. खरी राजाला राणी शोभेल ही. पण माझ्या बनबीराला नशिबान मिळणार. त्याला सुद्धां ती खाकोटींत मारून धावेल अशी आहे तिची तडफ, नि म्हणून बनबीराच लगीन जमनीशीं मी करणार.”

“मग चौधरीनच पसत केल्यावर आठकाठी कुठली? या वाडीचा कोणता कोळी नाही म्हणेल चौधरीच्या शब्दाला? चौधरीन-म्हाताऱ्यान शब्द उच्चारावा नि वाडीच्या साऱ्यानीं तो पार पाडावा अस चाललाय् सदा.”

“होय, हें तर खरच, पण चौधरीचा दरारा नि हुकमत साऱ्या गढीवर असली तरी स्वतःच्या पोरावर मात्र नाहीं! अग म्हातारा जग जंग पछाडतो त्या बनबीराला शिस्तींत धरण्यासाठीं, पण तो बनबीर म्हणजे बापसे बेटा सवाई!”

“बनबीर मात्र कसा इतका हूड निपजला आहे कुणास ठाऊक!”

“नुसता हूड नाहीं, अगदीं दुर्गुणी झाला आहे कार्टा! स्वतः कधीं काम करायचा नाहीं, अन् लोकानीं केलेलहि पाहवत नाहीं त्याला. उपद्व्यानी तर असा आहे—याची कागाळी त्याला सांगील, त्याची याला, नि मग आपण गमत पाहत बसेल. कुणाच वाईट झालेलं पाहिल की याला अगदीं आनंद! विघ्नसंतोषी झाला आहे तो.”

“काय बाई तरी! बाप कसा नि त्याचा पोरगा हा असा! मग या जमनीशीं करतोय का तो लगीन?”

“ तो म्हणतोय् म्हणे, कीं मला लगीन नको, नि या कोळी-वाडयात राहण नको. मी जाईन मनाला गोड लागेल तिथ. कल-कत्त्याला जाईन, तिथ येणाऱ्या जहाजावरन दूर दूरदेशीं जाईन. वाटेल तें करीन. मीं तर ऐकल आहे, कीं हा बनबीर चाचे लोकांशीहि अलीकड सधान बाधून राहिला आहे. स्वारी अधून मधून आठवडा आठवडा घरातून सूबाल्या करते. म्हणजे बनबीरान अगदीं स्वभावाला योग्य धदा शोधून काढला म्हणायचा.”

“ बापाला ठाऊक नाहीं का ? ”

“ कुणाला म'हीत ? कळली असेल कुणकुण कदाचित्. पण माहीत असून काय करणार ? मोठ्या पोराला आता धाकात ठेवतां येत नाहीं. तेव्हा ऐकल कांहीं त्याच्याबद्दल तरी न ऐकल्यासारख करून आपला-च आब आपण राखायचा. कदाचित् म्हाताऱ्यानं या बनबीराच्या लीलाना पायबद बसावा म्हणूनसुद्धा त्याची या जमनीशीं लग्न करून गाठ बाधण्याचा विचार केला असेल.”

“ अग, येवढ्या बापाच हा बनबीर ऐकत नाहीं, तर मग ही जमनी त्याला कसा आळा घालणार ? ”

“ तुला जमनी म्हणजे कशी जगदबा आहे तें ठाऊक नाही ! अग ही मुलगी चागल्याशीं चागली वागते, पण कांहीं कांहीं वेळा मला तर अशी भ्रात पडते, कीं हिच्यांत वेडाची तर झाक नाहीं ना ? तिला कुणी दुखवल, कीं मग तिचा राग पाहावा. ती मग वाटेल तें करील. स्वतःचा जीव धोक्यात घालील, हवी तिथ जाईल, पुढ काय होईल त्याचा विचार करणार नाही. जग जग पछाडील, पण तिला दुखव-ल्याचा सूड उगवील तेव्हाच राहील. ती जरा लहान असताना तिच्यावर तो शेजारचा कोळी नेहमीं खेकसायचा, तिला हुडुतफुडुत करायचा; एकदा तर त्यान तिला पकडून खूप चपराका लगावल्या. ही जमनी एवढीशी चिरमुटली पोर, नि तो शेजारी चागला उचा पुरा तगडा पुरुष ! पण या जमनीन पाळत राखून एक दिवस तो तीरावर

निजलेला आहे अशी संधि साधून होडीच्या नांगराच्या दाडक्यानं त्याच तोंड जवळ जवळ ठेचून टाकलन्, किती इजा झाली त्याच्या तोंडाला नि डोळ्याला. अगदीं त्या दिवसापासून कुण्णी वाटे जात नाहीं तिच्या! जो तो वचकून वागतो. ही अशी खुनशी पोर! कुणाला हवी ही नसती ब्याद माग ?"

"पण तस पाहायला गेल तर आपण होऊन ती कुणाच्या वाटे जात नाही त्या दिवशीं गंगासागराला आलेल्या यात्रेकरूंची नाव उपडी झाली, तर जमनीन प्रवाहाच्या अगदीं धोरपर्यंत पोहून एक बाई नि एक पोर वाचवल. पुरुषासारखे पुरुष तिच्या बेडरपणान थक्क झाले नि लाजले. मनात आल कीं लोकांसाठी प्राण द्यायला तयार. गरिबाच कनवाळूपणान करणारी, तर कुणी दुखवल की त्याच्या हात धुऊन माग लागणारी अशी ही चमत्कारिक आहे जमनी."

"मग काय ग, चौधरीन तरी ही असली सून करून घेऊन जळत घर भाड्यान घ्यायच कस काय ठरवल आहे ?"

"हे पाहा, चौधरी आहे खरा शहाणा. काय त्याच्या मनात आहे त्याच त्याला ठाऊक. पण आपल्या उच्छृंखल मुलाला सवाशेर कुणी हव म्हणून कदाचित् या महाकालीची योजना त्यान केली असेल अस मला वाटत बाई. तस असल तर, विंचू पालीपुढं नांगी टाकतो तसच होईल."

बोलता बोलता या दोघी कोळणी एकदम चूप बसल्या. जिच्या-बद्दल उचापती करण्यात इतका वेळ कामात हात गुतले असताना एकीकड त्यांचीं तोंड चाललीं होती ती जमनीच त्या रोखानं येताना दिसल्याबरोबर त्यानी 'आपल्याला कशाला लोकाच्या चौकशा' असा आव आणला.

जमनी उंच नि किडकिडीतच होती जराशी. इतकी तारुण्यांत आलेली असूनसुद्धा वेषभूषा किंवा केशभूषा यांची काळजी सर्व-

साधारण मुलींप्रमाण ती घेत असेल अस दिसत नव्हत. तिचा पदर डोक्यावरन माग सरकून मानेवर पडला होता, नि वाऱ्यान तो फड-फडत असताना तिच्या काचोळीवरूनहि तो बाजूला सरत होता. पण तिचा हात तो सावरण्यासाठीं क्वचितच धडपड करी. तिचे केससुद्धा जरा कोरडे चरचरीत झाल्यान वाऱ्याबरोबर मन मानेल तसे भुरभुरत होते.

केसांना तेलाचा हात तीन-चार दिवसांत बहुतेक लागला नसावा. तिच्या वयाच्या इतर मुली किती लाजत मुरकत. लुगडयाचा रग कोणता आहे, तें चापून-चोपून बसलं आहे कीं नाहीं यावर त्या किती लक्ष देत. वाडींतल्या झाडावर एखाद्या चागल्या फुलाला उमलून निर्धास्त राहण्याची सोयच नव्हती, कळी असल्यापासूनच या मुली त्यावर नजर ठेवीत, नि जरा कुठ ती उमलली, कीं आपल्या केशभूषेचं सौंदर्य वाढवण्यासाठीं त्यानी ती खुडून आपल्या डोक्यात खोचलीच म्हणून समजाव. पण जमना मात्र या साऱ्या गोष्टींना अपवाद होती. तिला अशा गोष्टींना जणू काहीं वेळच नव्हता. निसर्ग-दत्त निकोप प्रकृति असल्यान, नि आता ती वयात आल्यान आपो-आपच उठून दिसे. तिचा चेहरा तजेल होता. मात्र तिचे डोळे विलक्षण होते. स्वच्छ नि पाणीदार दिसले तरी त्याच्यात सथपणा नव्हता. चुकलेल्या वासरासारखी, नाहीं तर बुजलेल्या घोडीसारखी त्याच्यात चलबिचल होती. तिच्या त्या डोळ्याकड पाहिलं की, लागलीच वाटायच, कीं हें कांहीं न्यारच काम आहे! स्वतःच्याकडं तिचं लक्षच नसे. बहुतेक वेळ ती वाडीभर भिरभिर हिंडत असे आणि कुठ याच काम कर, कुठ त्याच काम कर, या कोळणीला हात दे, कुठ मुलांच्याशीं खेळ अस करीत ती हिंडे. पण बहुतेक वेळ लोकाच्या मदतींतच जात असल्यान कुणी तिला नकोनकोस करीत नसे, किंवा कुणी तिला दुखवीतहि नसे.

या कोळणीच जाळ विणून झाल होत. त्या ते गुडाळीत होत्या.

जमना आली ती सरळ त्याना तें गुडाळू लागली. गुडाळून झाल्यावर त्यानी ते तिच्या मदतीन त्याच्या नवऱ्याच्या होडग्यावर चढवल.

"शाबास जमने! कशी आमची जमनी आहे पण! अगदीं वेळेवर हव तेव्हां मदतीला हजर. कसा कामाचा उरक आहे बाई हिला!" एका कोळणीन जमनीला खुलवण्यासाठी म्हटल.

तिच्या सोबतिणीन ताबडतोब मैत्रिणीचा हेतु समजून पुढ म्हटल, "खरच बाई, जमनी ज्याला बायको मिळेल तो भाग्याचा. घरच काम करून त्याच सुद्धा मासेमारीच काम करायला जाईल ती. कसा ग तुला कामाचा इतका उरक जमने?"

"अग आपल्या जमनीला आता काय कमी आहे? तिला कशाला काम करायला हव. ती तर वाडीच्या चौधरीची सून झाल्यासारखीच आहे आता. जमने! विसरू नको अ आम्हाला."

जमना गपचूपपणें ऐकत होती. ती कोळीण पुढ म्हणते,

"बनबीरसारखा उद्योगी नवरा नि जमनीसारखी चुणचुणीत बायको. अशी अनुरूप जोडी जमली, कीं चौधरीच्या घराण्याची नि आमच्या या वाडीचीसुद्धा अशी भरभराट होईल, की पाहत राहा!"

जमनीच्या चेहऱ्यावरून तिच्या मनांत काय चालल आहे हें ओळखण दुर्घट होत साधारणतः. पण तिच्या नि बनबीरच्या लग्नाबद्दल, नि त्यांच्या अनुरूपतेबद्दल त्या कोळणीन केलेला आताचा उल्लेख जमनीला खास आवडत होता. कारण तिच्या तोंडावर हसूहि दिसत होत, नि तिच्या दृष्टींतहि जरा मार्दव आलेल दिसत होत.

त्या कोळणीन आपल्या सोबतिणीकडं एक दृष्टिक्षेप टाकला. आपण या अर्धवट मुलीला कसे बनवीत आहों असा त्याचा अर्थ असावा.

वास्तविकपणें या स्त्रियाना वाटणारी आपल्या शभर टक्के शहाणपणाची खात्री, नि जमना अर्धवट आहे तेव्हा तिची टिंगल करून थोडी स्वतःची टिगल करून घेण्याची प्रवृत्ति, या दोन्ही गोष्टी

म्हणजे लोकाच्यामधे नेहमी दिसून येणाऱ्या अज्ञानाचा व क्षुद्रपणाचा एक नमुना होता. नाहीं तर शहाणपण ही किती सापेक्ष चीज आहे, नि सर्वसाधारणपणें स्वतःला शहाणपणाचं माहेरघर समजणाऱ्या व्यक्तीचा शहाणपणा, परिस्थितीच्या निरनिराळ्या आचेन किती तडकतो, त्या शहाणपणाची रंगपालट किती होते नि वेडाच्या नि शहाणपणाच्यामधें किती पातळ पापुद्रा असतो या गोष्टींच यथार्थ ज्ञान असल्यावर, आपल्या स्वतःला शहाणपणाचा नाना फडणवीस समजून इतराची टिंगल करण्यापूर्वी लोक विचारात पडतील!

ती कोळीण मग म्हणते, "बनबीर तर आता उंबराच्या फुलासारखा दुर्मिळ झाला आहे! वाडींत तर क्वचितच दिसतो. जमने! काय ग करीत असतो तो? हुशार आहे तो, तेव्हा काहीं तरी नवीन धंद्याचा जम बसवीत असेल, नाहीं? हें मच्छिमाराच काम करायला का हुशार माणसानी हुशारी नासायची?"

"मला नाहीं ठाऊक!" जमना म्हणाली.

"हो हो; तर तर! खरच वाटेल ना ग आम्हाला तुझ हें बोलण?" ती दुसरी कोळीण म्हणते, "तू आत्ता तरी इथ उगीचच आलीस जशी काहीं जमने!"

"कुठ ठरलीय् भेट घ्यायची?"

"कुणाची भेट?"

"अग बनबीरची! म्हणूनच तो त्या बाजूला जाताना दिसला बर का मघाशी! तरी म्हटल त्या जंगलाकड ही स्वारी कुठ निघाली! आणि ही जमना आता इथ हजर! जा बाई, लवकर जा हो तूसुद्धा! जंगलात तिष्ठत असेल कुणी."

हें ऐकल्याबरोबर जमना एकदम चमकून विचारते, "बनबीर कुठ गेला म्हणालीस?"

जंगलाकड बोटान दाखवीत ती कोळीण म्हणते, "हो, त्या तिकडच बर जमने, तुमच भेटायच ठरल होत ना, तिथच!"

हे ऐकल्याबरोबर जमना खरोखरीच त्या बाजूला चालू लागली. तेव्हा ती पहिली कोळीण दुसरीला विचारते, " अग, कधीं पाहिलास बनचीर तिकड जाताना तूं? तिला काय सांगितलस तू आत्ता ? "

" छे ! मी कधीं पाहिला ? आपल पाणी मुरत आहे का नाहीं येवढ पाहण्यासाठीं खडा टाकून पाहिला."

" नि मग ती जमनी चालली आहे कीं त्या जगलाकड उगाचच ! "

" जाऊ दे ग वेडीला, खाईल तकाटा थोडा नि येईल परत वाडीला."

# ९

दुसरे दिवशी सकाळीं गंगासागरापासून नांगर उचलून ' सायतारा ' पुढचा मार्ग आक्रमूं लागली. भरतीच्या नदीतून वर वाहणाऱ्या प्रवाहाबरोबर मुख्यतः वाहत जायचं होतं. आणि त्याखेरीज त्या वेळीं वाहणाऱ्या वाऱ्याचा उपयोग, योग्य तीं थोडीं शिडं उभारून साय-तारेच्या गतीला आणखी मदत म्हणून करून घ्यायचा होता. गंगेचं पात्र मुखापाशीं नऊ-दहा मैलांइतकं रुंद आहे. ते पुढं अरुंद होत होत साधारण अर्धा मैल रुंदीचं होतं. या निरुंद पात्रांत सायतारेसारखी शिडांनीं चालणारी बोट हवी तशी वळवणं मोठ्या कौशल्याचं काम असतं. वाफेचं गलबत जागा निरुंद असली तरी स्वतःच्या एंजिनाच्या शक्तीनं पुढमागं अथवा दोन्ही बाजूंस हवं तसं वळवणं फार सोइस्कर असतं. त्याउलट सायतारेसारख्या बोटीच्या बाबतींत पाण्याच्या प्रवाहामुळं मिळणारी गति आणि असेल तसल्या वाऱ्यापासून शिडांच्या साहाय्यानं मिळूं शकणारी गति या दोहोंचा समन्वय करून योग्य दिशेला बोट नेणं हें पुष्कळ अनुभव, चलाख बुद्धि, आणि धिटाई यावाचून शक्य नसतं.

सायतारा बोट मार्गस्थ झाली तेव्हां गंगासागराच्या किनाऱ्यावर जंगलाच्या तोंडाशीं दोन व्यक्ति उभ्या होत्या. त्यांचं लक्ष सायतारेवर

लागलेलं होतं, नि त्याबद्दलच तिच्यामधें बोलणं चाललेलं होतं. त्या दोघांपैकीं उंचेला होता तो म्हणाला, "बनबीर, हें असलं गलबत आपल्याला हवं. आपल्या कामाला हेंच फार योग्य आहे. त्याची नाळ पाहा, त्याची बांधणी आणि घाट पाहा. सारं कसं मजबूत काम आहे. त्याच्या भक्कम डोलकाठ्या पाहा आणि त्यावरील अवजाराचा व्याप पाहा. हें गलबत थोड्याशा वाऱ्यानसुद्धा ताशीं सहा-सात मैल वेग धरील, आणि वारा मागचा असला तर ताशीं दहा-अकरा मैलाला तरी निदान मरण नाहीं. मला जर जहाजाची कांहीं पारख असली, तर या जहाजासारखं जहाज बांधवूनसुद्धा मिळणं कठीण, असं मला खात्रीनं वाटतं. विकत घ्यायचं तर त्याची किंमतहि फार होईल. आणि शिवाय हवी वाटणारी वस्तु आम्ही पैसे देऊन विकत घेऊं लागलों तर मग आमच्या 'पिढीजात' चाचेगिरीचं कसब उपयोगांत यायचं तरी कुठं?"

बनबीर लक्ष लावून पाहत होता सायतारेकडं. आपल्या सोबत्याच्या भाषणाचा त्याच्या मनावर फार परिणाम होत चालला होता.

"बनबीर! मी तुला तुझी करामत दाखवण्याची संधि आतां देणार आहे. चाचेगिरी करून संपत्ति मिळवायला अक्कल नि कर्तबगारी खूप लागते. हें नुसत्या बनियाचं तक्या-लोडाला टेकून बसून अर्धा पाव आण्याची चोरी रोज करीत उभा जन्म काढणाऱ्याचं काम नाहीं, किंवा अहोरात्र ओलेत्यानं मच्छीमारींत काबाडकष्ट करीत चिनडोक्याच्या गाढवासारखं जन्मभर राबणाऱ्याचंहि काम नाहीं. चाचेगिरी करायला बनियाची बुद्धि नि कोळ्याचं काटक शरीर तर लागतंच, पण त्याहून जास्त धाडस नि युक्तिबाजपणा लागतो. हें काम सागकाम्याचं नव्हे. चाचेगिरी करायला लागणारे गुण तुझ्यांत आहेत असं मला वाटलं म्हणून, मी इतकं तुझ्याशीं बोलत-चालत आलों. मूर्खांवर मी वेळ फुकट कधींच दवडीत नाहीं. पण आतां मी तुझी परीक्षाच घेणार आहे. माझा भागीदार होण्याची महत्त्वाकांक्षा तूं बोलून दाख-

वतोस. भागीदारीच्या गोष्टी राहू देत, पण माझा दुय्यम हस्तक होण हे सुद्धां अवघड काम आहे. माझा कोणताहि वेचक हस्तक मी सागणार आहे तसल काम पार पाडील. तुला ते जमल तर पुढची परीक्षा. आहे कबूल ?"

बनबीरला आपल्यापेक्षां या चाच्याचा हस्तकसुद्धा काम चागलं करील इत्यादि भाषण रुचत नव्हत, पण तें बोलून दाखवण त्याला योग्य वाटलं नाही. भागीदारीची पात्रता आहे कीं नाही, का खुद्द या चाच्याला आपला हस्तक म्हणून राबवून घेण्याची आपली पात्रता आहे या गोष्टी पुढ आपण प्रत्यक्ष करूनच पटवून दाखवू अशी बनबीरला उमेद वाटत होती. पण जोंपर्यंत या चाचेलोकाच्या टोळीत आपला नीट प्रवेश होऊन आपल चूड स्थिर झाल नाही, तोपर्यंत असल्या वादाच्या भरीस पडण्यात शहाणपणा नव्हता. तेव्हा तो म्हणतो, "अस काय अवघड काम आहे ? सागून तर पाहा. माझ्याच्यान कितपत होत ते दिसेल मग.

"काम अस की, या सायंतारा बोटीवर आत्ता प्रवेश मिळवायचा. कसा नि कुठ ते तुझ तू पाहा, आणि मग सायतारेवर ती कलकत्त्याला पोंहोचेपर्यंत राहायचं. बोटीची चालचलणूक वगैरेची नीट माहिती करून घ्यायची. कप्तान व त्याचे अधिकारी कसे आहेत, कितपत अडथळा आणूं शकतील त्याचा अदमास घ्यायचा."

"आणि कलकत्त्याला गेल्यावर पुढ ?" बनबीरन विचारल.

"तूं तिथपर्यंत जा तर आधीं. योग्य वेळीं तुला पुढ काय करायचं वगैरे सूचना माझ्या माणसाकडून मिळतील."

"माणूस आपल्यापैकी आहे हे कस ओळखणार ?"

"जेवायला बसल्यावर पहिला घास ज्याच्या हातून खालीं पडेल त्याला विचार 'गॉल बदराला तूं गेला आहेस ना ?' त्यान हो म्हटलं तर त्याला विचार "खूण साग." 'नरकुडम् बेटाची देवी' अस उत्तर त्यान दिलं तर तो आपल्यापैकीं आहे अस समजून

त्यावर निःशंक विश्वास ठेव. हे खुणेचे शब्द दुसऱ्या कुणाला सांगू नकोस. आमच्या माणसांपैकीं कुणीहि फितूर झाल्याचा संशय आला तरी लागलीच त्याला देहान्त शासन मिळत."

बनबीरनं खुणेचे शब्द परत उच्चारून दाखविले आणि ते नीट लक्षांत आल्याची खात्री झाल्यावर तो म्हणाला. "ठीक आहे, माझी तयारी आहे केव्हां सुरू करूं मी काम ?"

"केव्हां ? या क्षणाला, ती पाहा सायतारा अगोदरच नांगर उचलून चालू झाली आहे. ती पुढं निघूनसुद्धां जाईल तू विचार करीपर्यंत."

"त्याची नको काळजी. मीं काम अंगावर घेतलं आहे. आतां झाल नाहीं फत्ते तर विचार." असं म्हणून बनबीर दौडतच तेथून निघाला.

तो उभा होता त्या ठिकाणीं नदी एक अर्धचंद्राकृति वळण घेत होती. आणि या पुढं आलेल्या तीराच्या टोकाभोंवतीं सायतारेस अर्ध-वर्तुळाकार वळण घ्यावं लागणार होतं हें लक्षांत घेऊन, या पुढं आलेल्या तीराला वळण घेऊन सायतारा अवजाराची हालचाल करीत अतिशय हलके हलके पुढं येणार तोंवर, दुसऱ्या बाजूपर्यंत धावून तिला गाठण्याचा विचार बनबीरनं केला. वाटेंत येणाऱ्या अनेक झाडांच्या अधून मधून झराझर उड्या टाकीत बनबीर दुसऱ्या बाजूस येऊन पोंचला. त्याच्या अपेक्षेप्रमाणं तीरावर बरींच होडगीं ओढून ठेवलीं होतीं. त्यापैकीं त्यानं एक ढकलून पाण्यांत लोटलं आणि आता तो त्यांत बसणार इतक्यांत कुणी तरी मोठ्या आर्जवानं त्याला हाक मारिली, 'बनबीर!'

त्याच्या मागं जमनी येऊन उभी होती. बनबीरच्या या गढलेल्या वृत्तींत जमनी केव्हां येऊन उभी राहिली तें त्याला कळलंच नाहीं. या गर्दींत जमनीनं व्यत्यय आणणं त्याला आवडलं नाहीं. तो तिच्याकडे लक्ष न देतां तसाच पुढं गेला असता पण जमनीनं त्याच्या खांद्यावर आपला हात ठेवीत म्हटलं—

" बनबीर! कुठं चालला आहेस इतक्या गर्दीनं ? "

तिचा हात झिडकारीत बनबीर म्हणाला, " जमने ! तुला नसत्या चौकशा करण्याची काय जरूर ? मी कुठंहि चाहील तिकडे जाईन. माझा पाठलाग करीत जाऊ नकोस नेहमीं नेहमी—"

" आपलं लग्न ठरलं आहे, मग मला हक्क नाहीं का तुझ्याबद्दल चौकशी करायचा ? "

" अग, माझ्या बापानं लग्न ठरवलं म्हणजे ते मीं मानलं असं कशावरून ? "

" तें मानू नकोस वाटलं तर, पण माझ्याशीं इतकी सलगी केलीस त्याचा अर्थ काय मग ? "

" त्याला कसला आला आहे अर्थ ! तू सलगी करू दिलीस म्हणून मीं केली ! मला लग्नाला वेळ नाहीं. मला कोळी, किंवा मच्छीमार म्हणून जन्म काढायचा नाहीं."

" नको काढू, पण त्यासाठीं मला का सोडून देतोस. तू जाशील तिथं मी येईन, तुला मदत करीन. शहाणी म्हण, वेडी म्हण, मी तर तुला वरलं आहे, आणि तसंच तुला मानीत आलें आजवर."

सायंतारा आता त्या पुढं आलेल्या तीराला वळसा घालीत येत होती. दिशा बदलावी लागत असल्यानं, अवजाराची हालचाल केली जात होती. सारे खलाशी निरनिराळे दोर सोडीत नि बांधीत होते

बनबीरला होडींतून मध्य प्रवाहापर्यंत जाऊन सायंतारा गाठायची होती. तो अधीर झाला होता. जमनीशी लग्न करून बांधलं जाण्याची त्याची कधींच इच्छा नव्हती. पण इतर सर्व तसं म्हणत त्यावरून जमनी त्याच्याशीं सलगी सलगीनं वागू लागली. चौधरीनंहि तिचं लग्न आपल्या बनबीरशीं करून द्यायचं असं सदैव म्हटलं होतं, त्यामुळं बनबीरच्या वागणुकींत कपट आहे असं तिला कधींच वाटलं नव्हतं. आता बनबीरच्या या बोलण्यानं तिला धक्काच बसला.

बनबीरनें होडग्यांत बसून वल्ह हातात घेतल नि तो म्हणाला, "चल सोड होडग, मला काम आहे."

"माझ्याशीं नीट बोल. माझ्या प्रश्नाचं नीट उत्तर दे, मग मी सोडीन होडग."

"तुझ्या मूर्ख प्रश्नाला काय उत्तर द्यायच ? तुला काय वाटल, मी तुझ्यासारख्या वेडीशीं लग्न करून खोड्यात पडून राहीन सदा ! माझी महत्त्वाकांक्षा कोळीवाड्याच्या सीमेपाशी संपत नाही. जा परत नि दुसऱ्या एखाद्या कोळ्याशी कर लग्न. सोड हात होडग्याचा--"

जमनीन होडग घट्ट धरून ठेवल होत. तिचे ओठ तिन घट्ट मिटून घेतले होते, नि तिच्या दृष्टीमधें तरलपणा दिसूं लागला होता. तिच्या उपाधीन बनबीरला उशीर होत होता. त्याला वाटल, सायतारा पुढ निघून सुद्धा जाईल.

बनबीरन पुढ वाकून जमनीच्या हाताचीं बोट पिरगाळीत तिची होडग्यावरची पकड ढिली केली आणि त्यान तिला जोरान दूर माग लोटून होडग वल्हवण्यास सुरुवात केली.

पण जमनीसुद्धा कमी चिकट नव्हती. तिन उसळी मारून पाण्यात अंग टाकल आणि वल्हवीत जाणाऱ्या होडग्याच एक टोक तिन पकडून घट्ट धरल.

बनबीरच्या मुर्दाडपणाची जमनीला कल्पना नव्हती आजवर. पण आता तो नीट कळण्याचा प्रसंग आला होता.

बनबीरन न कचरता हातातल्या वल्ह्यान जमनीच्या होडग धरलेल्या हातावर आणि पाण्यावर उचलून धरलेल्या तिच्या डोक्यावर जोरान लागोपाठ प्रहार केले, आणि तिचा हात सुटून ती पाण्यात पडल्यावर एक इरसाल शिवी हासडून त्यान विकट हास्य करून 'निकाल लागला' अशा विचारान होडी सायतारेच्या मार्गामधें वल्हवली.

जमनीच्या तोंडून हाताचीं बोट चेंचल्यावर अस्पष्ट विव्हळण ऐकू

आल न आल तोंच, तिच्या डोक्यावर झालेल्या आघातांनी तिला भोंवळ आली व ती निश्चेष्ट होऊन पाण्याखाली दिसेनाशी झाली.

*　　　*　　　*

सायतारेच्या मागच्या डेकवर कान्होजीराव उभे होते. पायलट त्यांच्याशीं अधून मधून गप्पा मारीत होता. कलकत्त्याला येणाऱ्या बोटींवर हे सर्व पायलट सारखे येत-जात असल्यामुळ त्यांच्या कप्तानाशी व अधिकाऱ्यांशीं त्याचा पुष्कळ सबध येई, पुष्कळ सभाषण होई, व साऱ्या बोटींच्या हालचाली, व्यापाराच्या उलाढाली व बदरोबदरीच्या बातम्या एकमेकाना कळत. हे पायलट स्वतःच पूर्वी दर्यावर्दी असल्यान त्यांना बदरोबदरीची हकीकत ऐकून आपल्या सफरींची आठवण होई व आनद वाटे. स्वतःला आतां पूर्वीप्रमाणं हिंडता येत नसल्यान या सर्व जलपर्यटन करून येणाऱ्या कप्तानानी सागितलेले वृत्तान्त ऐकून त्यांना दुधाची तहान ताकावर भागल्यासारखी वाटे. त्याउलट पायलटला जवळ जवळ सर्वांच्याकडून बातम्या कळत राहिल्यान त्याच बोलण एखाद्या बातमीदाराप्रमाण अथवा रेडिओवर वृत्त-साराश सागणाऱ्या मार्मिक टीकाकाराप्रमाणं श्रवणीय वाटे. अर्थात् अशा गप्पांना गगा नदींतून बोट जाताना ऊत येई आणि रंग चढे. नेहमीं-च्या सरावान तोंडपाठ झालेल्या दिशेन बोट वळवीत चालवण्यास पायलट सुकाण्याला हुकूम देई. तीरावरच्या निरनिराळया खुणांवर एकीकडे लक्ष ठेवी, आणि एकीकडे कप्तानाशीं त्याचं सभाषण चालू राही. त्याखेरीज डेकवर तिष्ठत राहिलेले खलाशी मार्ग बदलला की लागलीच हवेच्या दिशेनुरूप अवजारं ठीकठाक करीत.

"तुम्ही आता कलकत्त्याहून परत कोणत्या सफरीवर जाणार?" पायलटनं विचारल.

"पाहूं, अजून ठरवल नाहीं. कोणत्या बंदराचा माल मिळतो आहे, मालाच्या ने-आणीचे भाव काय आहेत तें कलकत्त्याला कळल्यावर मग ठरवीन." कान्होजीराव म्हणाले.

"भावात कांहीं नेहमींपेक्षा फरक नाहीं. डाक्क्याचं रेशीम, चहा, तागाच्या गाठी नि तांदूळ इत्यादि माल घेऊन या आठवड्यांत चार जहाज गेली इथून."

"ह. आणखी कोणती जहाज बंदरात सध्या आहेत?"

"लिव्हरपूलच एक आहे, एक चीनहून आलेलं आहे. बरींचशीं ककासांच्युरीची जहाज आहेत, नि एक मुंबईहून आलेलं सरकारी गलबत आहे"

"अस्स." कान्होजीराव ऐकत होते.

"तें चीनहून आलेलं जहाज आहे त्याचा कप्तान सांगत होता कीं, चाच्यानीं त्याच्यावर हल्ला चढवला होता."

"मग चिनी समुद्रात त्यात कांहीं नवीन नाहीं. नेहमीचाच आहे तो प्रकार. इतर साऱ्या समुद्रातून चाचेलोकांच निर्मूलन झाल तरी पिवळ्या समुद्रातून कांहीं त्याच कुणाला उच्चाटन नाही करता येत."

पायलट म्हणतो, "छे, हो! हा हल्ला पिवळ्या समुद्रात नाहीं झाला, अंदमानच्या पूर्वेला— अहो, या बगालच्या उपसागरांत!"

"बगालच्या उपसागरांत आणि चांचेगिरी! हे माल नवीनच ऐकतों आहे मी. या बाजूला आम्ही अलीकड सुरक्षित मानीत होतों."

"सुरक्षित! अहो, समुद्रावर सुरक्षित असतं काय? चांचे नसले, तर वादळ, वादळ नाहीं तर अपघात, कांहीं तरी कारणानं सदा धोका. आपल्याला वाटत, 'वा! सगळ कसं अगदीं छान चाललंय् घड्याळा-सारख.'— आणि एकदम अचानकपणें असं कांहीं संकट येऊन पुढं दत्त म्हणून उभं राहत, अन् मग वाटत क्षणभर, कीं भरलीं आम्हीं शंभर वर्ष!"

"चालायचंच. हा समुद्र आहे. पण सुरक्षित नाहीं अस नाहीं. मीच पाहा कीं, ही सायतारा बोट घेऊन किती सारखा हिंडतों आहे! पण वर्षानुवर्ष चाललंय् ना सारं ठीक? संकटं यायचींच, पण मग त्यांतून बोट वांचवून न्यायला कप्तान असतोच ना? कप्तान हवा

चागला मुरब्बी दर्यावर्दी, मग खुशाल त्या बोटीला नरकात द्या पाठवून. तरी तो तिथून बोट सुरक्षित आणील परत.” कान्होजीराव म्हणाले. त्याना स्वतःच्या दर्यावर्दी कौशल्याची नि अनुभवाची फार खात्री वाटे त्या अभिमानाला थोडासा गर्वाचा देखील वास अनेकदा येई.

पायलट म्हणाला, “ असेल, तसहि असेल, बोटीबद्दलची खात्री ज्याची त्याला वाटणार, पण कप्तान चागला असो वा नसो, नरकाच्या सफरीवर मी कध्धीं निघणार नाही.”

पायलटला खिजवण्याकरिता चेष्टेन कान्होजीराव म्हणतात, “ का पायलटसाहेब ! तुम्ही हाय खाऊ लागलेले दिसता. वय झाल बर का तुमच ! ”

“ झाल खर वय, पण तें माहीत असलेल ज्याच त्याला ठीक. तो माझ्यावरचा पायलट पाहा. त्याला वाटे आपण अजूनसुद्धा ऐन उमरींत आहो, नि पहिल्या ऐटींत राजेश्रींनीं नको ते धाडस केल नि शेवटीं आतां हात चोळीत घरीं बसले आहेत.”

“ का ? काय केल त्यान ? ”

“ ‘सेंट मेरी’च्या वळणाजवळ वळण कमी घेऊन तीराच्या जवळून जायचा प्रयत्न केला नि ते साधल नाही.”

“ मग काय झाल ? ”

“ काय झाल ! बोट पाण्याच्या धारेत सापडून गेली वाळूच्या दांडीवर, नि आता आपण तिथन जाताना पाहालच त्याच्या आत्मविश्वासाच मूर्तिमत स्मारक ! ‘सेंट मेरी’ वळणाजवळ अर्ध गलबत नि दोन तिरप्या डोलकाठ्या उरल्या आहेत आता ! नरकाच्या सफरीची भाषा बोलत होता ना तुम्ही ? ती होती खरी एक नरकाची सफर ! आणि कप्तान नि पायलट दोघहि मुरब्बी असूनसुद्धां त्यांच्यान बोट परत सुरक्षित आणण झाल नाहीं ! ”

पायलट चिड्ड लागल्याचा रग पाहताच कान्होजीरावानीं विषय बदलला. होकायन्त्राच्या स्तभावरील दोन्ही बाजूच्या लोखडी गोलावर

दोन्ही हात टेकून बोटीच्या पिछाडीकडे तोंड करून रेलून उभे राहत ते म्हणतात, " ते असू द्या, पण काय हो, त्या चाच्याच्या हल्ल्याबद्दल तुम्ही सांगत होतां ते राहिलंच कीं! काय, झालं काय?"

"मलाक्काच्या सामुद्रधुनींतून बाहेर पडल्यावर," पायलट म्हणाला, ' ही बोट निकोबार बेटाकडे चालली होती. नानकौरी बंदरांत त्यांना जायचं होतं, व तिथून अंदमानच्या बाजून वर येऊन 'टेबल आयलंड' दीपगृह आणि "Cow and Calf" द्वीपसमूहामधल्या चॅनेलमधून सरळ कलकत्त्याकडे जायचा तिच्या कॅप्टनचा बेत होता. पण दक्षिण अंदमानपासून उत्तरेकडे त्याच्याचसारखी जाणारी आणखी एक बोट त्यांना दिसली. त्या बोटीला वेग बेताबाताचाच असावा. कारण ॲमडसेनच्या बोटीपर्यंत तिला एकदांसुद्धा पोंचता येईना. शेवटीं त्या दुसऱ्या बोटीवरच्या लोकांनीं त्यांच्या बोटीला आग लागल्याचं कपटनाटक केलं. त्या बोटीचा कप्तान ॲमडसेन मोठा हुशार माणूस आहे. त्यानं मदतीला जाण्यासाठीं बोट वळवली आणि त्या दुसऱ्या बोटीच्या बऱ्याच जवळ तो गेला. कॅप्टन ॲमड-सेननं एका खलाशाला डोलकाठीवर अगोदरच पाठवून आग कितपत अन् कुठं आहे तें टेहळण्यास सांगितलं होतं. त्या खलाशानं खालीं येऊन सांगितलं कीं, 'आग नुसत्या डेकवर मुद्दाम पेटवल्या-सारखी दिसत होती. काहीं व्यक्ति आगीच्या आजूबाजूला उभ्या राहून त्यांत अधूनमधून सरपण घालून बाजूला झाल्यासारख्या दिसत. आणि म्हणण्यासारखी धांदलहि दिसत नव्हती' कॅप्टन ॲमडसेनच्या मनात तेव्हाच आलं कीं, कांही तरी काळाबेरा प्रकार दिसतो. शेवटी एक छोटी होडी त्यांच्या बोटीशीं आली व तींतून एक अधिकारी वर आला आणि कॅप्टन ॲमडसेन मागच्या डेकवर एकटाच दिसल्यानं त्यानं आपल्या पिस्तुलाला हात घातला. पण कॅप्टन ॲमडसेनचा हात विजेसारखा चपळ आहे. त्यानं दोन मोठे झकास ठोसे लगावून त्या भुरट्या चोराला बोटीच्या कठड्यावरून

पाण्यात फेकल. अगोदरच संशय आल्यानं मेट (पहिला अधिकारी) आणि सारंग दोराच्या शिडीजवळ छपून उभेच होते. त्यानीं पुढं येऊन दगा दिसताच रहाटाच्या दांडक्यानीं आणि लोखंडी मेखांनीं, शिडी चढून होडीतून बोटीवर येणाऱ्या त्या चाच्याच्या अनुयायास प्रसाद दिला. कॅप्टन ॲमडसेननं ताबडतोब अवजार सोडून बोट हाकारली. आणि अर्थात् ती चाच्याची बोट त्याचा पाठलाग करण्याची शक्यता नव्हतीच."

डाव्या हातानं हनुवटीवरची दाढी कुरवाळीत कान्होजीराव म्हणाले, "कॅप्टन ॲमडसेनच्या जागरूकपणानं नि त्याच्या बोटीच्या जास्ती वेगानं चाच्याचा बेत फसला तर!"

पायलट म्हणतो, "त्या बाजूनं जायचं असलं तर बोट जरा जलद चालणारीच हवी." मघाशी केलेल्या टवाळीची परतफेड करण्याच्या उद्देशानं पायलट म्हणतो, "म्हणून कान्होजीराव, तुमची ही सायतारा त्या बाजूला न फिरकलेलीच बरी!"

त्यावर खदखदा हसून कान्होजीराव म्हणाले, "पायलटसाहेब, या बाबतीत मात्र तुम्ही सपशेल घसरलात! कॅप्टन ॲमडसेनची व माझी चांगली ओळख आहे. आठ वर्षांमागं कलकत्त्याहून डंडीला बोटी भरून तागं आम्हीं दोघानीं नेला होता. त्या वेळीं कलकत्त्याहून निघण्यापूर्वीं कॅप्टन ॲमडसेन मला म्हणाला होता कीं, 'सायतारा मागं पडूं लागली तर एक चऱ्हाट माझ्या बोटीवर दे; म्हणजे माझ्या बोटीच्या पाठीमागं सायतारा बांधून ओढीत नेईन.' मी उत्तर दिलं होतं, 'चऱ्हाट तर देऊच, पण ओढणारी बोट कोणती आणि ओढली जाणारी कोणती याबद्दल पैज लावतोस का?' त्यावर ॲमडसेन म्हणाला-'केवढ्याची?' मी म्हणालों-'बोटीवरच्या साऱ्या मालाच्या किंमतीची.' मग ॲमडसेन म्हणतो-'बोटीच्या मालावर माझी मालकी नाहीं. माझी मालकी आहे या टेलिस्कोपवर. मी म्हणालों-'कंजुष आहेस तूं. पण हरकत नाहीं. हरलास तर टेलिस्कोपवर अक्षर

कोरवून देईन अशी कबुली असली तर मी पैज मारतों.' आणि शेवटीं डंडीला पोंचल्यावर सायतारेच्या मागून सात दिवसांनीं ॲमडसेनची बोट तिथं पोचली.

हे ऐकल्यावर अर्थात् पायलटन नेहमीप्रमाण सर्वसाधारण कप्तानाप्रमाण मारलेली कान्होजींची ही एक लोणकढी थाप आहे असा आविर्भाव केला, तेव्हा शब्द न बोलता कान्होजीरावांनीं नकाशाच्या खोलींत जाऊन दुर्बिण आणली आणि तिच नळकाड बाहेर ओढीत त्यावरच्या चकचकीत पॉलिश केलेल्या पृष्ठावर कोरलेलीं अक्षर पायलटपुढ धरलीं. त्यावर लिहिल होत :

'कलकत्ता ते डंडी सफरीवर सायंतारेन शर्यत जिकल्याबद्दल भेट.

— ॲमंडसेन.'

ते वाचल्यावर मात्र पायलटच्या तोंडाला चागलच कुलूप बसलं !

या संभाषणात पायलट आणि कान्होजीराव गुतले असतांना सायतारेच्या नाळेवरच्या खलाशान एक कोळ्याचं होडग वाटेत आल्याची वर्दी ओरडून दिली. तेव्हा ते दोघे समोर पाहतात तों त्या होडग्यातला कोळी वल्हीं मारून वाटेंतून दूर जाण्याऐवजीं होडग्यात उभा राहून दोन्ही हात वर करून किंचाळत होता. बोट होडग्यावर आपटणार अशा भयान त्याच अवसान सुटून बावरून नुसत्या ओरडण्यापलीकडे काही जास्त करण्याच त्याला सुचत नव्हतसं दिसल.

पायलटन सुकाण उजव्या बाजूला घातल, पण तें होडग फारच जवळ आल्यान त्याला बोटीचा धक्का लागल्याशिवाय राहिला नाहीं. आणि त्या धक्क्यान ते होडग उपड होऊन पाण्यानं भरून लागलीच बुडाल. नाळेवरच्या खलाशान धावत जाऊन बोटीच्या मागच्या बाजून एक दोर पाण्यात टाकला. त्याच टोक त्या कोळ्यान पकडलं, आणि तो दोराच्या साहाय्यान सायतारेच्या बाजूवरून वर चढून आला.

आल्याबरोबर त्यान अगदी जग बुडाल असा आकान्त करायला सुरुवात केली. त्याच होडग बुडवून त्याला अन्नाला महाग केल्या-बद्दल त्यान बोटीला नि कप्तानाला बोल लावला. घरची इतकी माणस पोसायचीं—कर्ज काढून घेतलेली होडी— एक वेळ जेवण करण्यापुरते जेमतेम पैसे मिळत होते, आता त्यान ते तरी कसे मिळ-वायचे? त्या होडीची किंमत त्याला मोजून मिळाली पाहिजे. एक ना दोन— त्यान शभर वाक्य ऐकवली.

हिंमत त्याला समजावीत होता. तो म्हणाला, "काय आहे किंमत तुझ्या होडग्याची?"

"पन्नास रुपये."

"पन्नास रुपये! पाच रुपयाला तसल होडग मिळत."

"मग माझ होडग मला परत द्या."

"दुसर विकत घेऊन देऊ."

"दुसर नको मला. तें माझ्या आज्या पणज्याच शकुनाच होडग आहे. त्यात बसून गेल की, मासे गळाला खूप लागत. नवीन होडग घेऊन काय करू? मासे जवळ फिरकले नाहीत तर नव्या होडग्याचा काय उपयोग. माझ होडगच मला हव."

"अरे! ते आता बुडल, तें कस परत येणार?"

"मग पन्नास रुपये द्या."

"छट्! उगीच अवाच्या सवा बोलू लागलास तर कोण देईल?"

"मग माझ होडग का बुडवलत?"

"तूच मधे आलास त्याला कोण काय करणार!"

"मधे येतोय्! कधींचा मी इथ कोळी म्हणून आहे. नदी वाहती तेव्हापासून आमच्या मालकीची आहे ही जागा. तुम्हीच माझ्या वाटेंत आला नि माझी होडी बुडवलीत."

दौलतन हा सवाद दुरून ऐकल्यावर तो म्हणतो, "काय रे त्या कोळ्याशीं हुजत घालीत बसला आहेस. त्याला येऊ दिला कशाला

बोटीवर अगोदर. दे उचलून पाण्यांत फेकून परत. शोधू देत त्याला त्याची होडी नदीच्या तळावर. पन्नास रुपये! तुझ्या बापान तरी पाहिलेत का?"

"बाप कुणाचा काढताय्?" तो कोळी चिडून म्हणला. "पाण्यात फेकून देताय् का? कुणाची माय व्यायली आहे, मला पाण्यात फेकायची? सांग बापाचं नाव, नि ये जरा इकड म्हणजे दावतों तुला!"

पण इतक्यात सारंगान येऊन त्या कोळ्याला चुचकारीत समजुतीच्या गोष्टी सांगायला प्रारंभ केला, नि 'चल, सगळे खलाशी जेवायला बसले आहेत, चार घास खा, विसावा घे. होडग्याच काय एवढ!' असे म्हणत त्याला तो बोटीच्या नाळेकड, खलाशाच्या डेकवर घेऊन गेला. 'आमचा कप्तान फार सच्चा माणूस आहे. तो तुला कधीं अन्याय नाही करायचा. उगीच का जिकीर करतोस.' इत्यादि भाषणान त्या कोळ्याचा राग कमी झालेला दिसला, नि निमूटपणे तो सारंगामागोमाग गेला.

जाता जातां बनबीर मनाशी हसला. 'सायतारेवर प्रवेश तर मिळवला. आता पुढच काम फारस अवघड नाहीं', असं त्याला वाटल.

# १०

बनचीर सारगाबरोबर गेला तेव्हा हिंमत दौलतला म्हणतो,

"दौलत ! सदान्कदा ज्याच्या त्याच्याशीं शिवीगाळी कशाला सुरू करतोस तू ? एर्वीतेर्वी त्या कोळयाच होडग बुडाल. त्या गरिबाला होडग्याची किमत साहजिक फार असणार, आणि ते त्याच्या उपजीविकेचं साधन असल्यान त्याबद्दल तो हळहळण रास्तच आहे."

"म्हणून काय पन्नास रुपये त्याला द्यावे अस तुझ म्हणण ?"

"छे रे ! अडाणी माणूस तो, त्याला कुठ असणार अदमास येवढा पैशाचा. त्यान पन्नास रुपये मागितले त्याचा अर्थ येवढाच, की त्याला ती होडी बहुमोलाची वाटत होती. त्याला अजारून-गोंजारून शांत केल्यावर दहा-बारा रुपये, किंवा तसलीच दुसरी होडी घ्यायला तो होईल कबूल."

"पण त्याची चूक असताना आपण काय म्हणून भरपाई करायची ?"

"अरे ! दहा-बारा रुपयान आपल्याला काय कमी पडणार आहे ? त्याउलट तेवढे पैसे म्हणजे त्या कोळयाला डोक्यावरून पाणी गेल्यासारख वाटणार. चूक त्याची असली तरी त्या गरिबाशी हुजत घालीत

न बसतां, त्याला पैसे देऊन समाधानान वाटेला लावण्याची आपल्याला ऐपत आहे. मग थोडक्यासाठी का भांडण ?"

"गरीब असला तरी पण माजुरी केवढी होती! मारामारी करायला येत होता पुढं तो."

"पण तूच ना अगोदर त्याला दुखवलस ? तेंच मी तुला म्हणत होतों दौलत, कीं थोड्याशा गोड भाषणान सर्व नीट होत, तर मुद्दाम नेहमीं वाकड बोलून जी ती गोष्ट तूं चिघळवतोस का ?"

हिंमत मनापासून बोलत होता. आपल्या जुळ्या भावाबद्दल त्याला मनातून खूप प्रेम वाटे. पण दौलतच्या स्वभावाची ठेवणच अशी झाली होती, कीं त्याच्याशीं सरळ बोलणच दुर्घट होई. सगतीच्या परिणामानं दौलतच्या स्वभावात उत्पन्न झालेल्या विकृति आपण त्याच्याशीं हलकेच गोडीन बोलून दूर करण्याचा प्रयत्न करावा असहि त्याला वाटे. पण दौलत हिंमतशीं कधीं विश्वासान नि सरळपणानं बोलायला तयार नसे.

दौलतच्या रंगेलपणाच्या ज्या आवडी होत्या त्या हिंमतला किळस-वाण्या वाटत. दौलतच्या मदिरापानाच्या बैठकी, ज्या बदरात तो नेहमीं साजरा करायचा, त्यांच हिमतला वावडं. एवढच काय पण बोटीवर सद कदान् अश्लील नि बीभत्स चुटके नि आख्यायिका सागत किंवा ऐकत रमण्यात दौलतला हिंमतची सोबत क्वचितच मिळे. कामाच्या बाबतींतहि तोच नमुना. दौलत शिवीगाळ देत, आरडा-ओरड करीत, खलाशांना गुलामासारखं पुढ राबवून घेई—प्रत्यक्ष सायंतारेवर कान्होजीराव नि हिंमत याच्यामुळ दौलतवर वचक राही आणि म्हणण्यासारखा छळ करणं त्याला शक्य होत नसे; पण दुष्ट दर्यावर्दी अधिकाऱ्यांच्या सगतींत दुर्दैवान सापडल्यान त्याची वृत्ति अशी जुलमी बनली होती. त्याउलट हिंमतच्या स्वभावांत मार्दव आणि आर्जव होते. त्याच्या चांगुलपणान हाताखालच्या लोकांमधें त्याची हुकमत हौसेनं मानण्याची प्रेरणा होई. हिंमतबद्दल त्यांना आदर

नि निष्ठा वाटे; तर दौलत कप्तानाचा मुलगा आणि वरचा अधिकारी येवढयाचसाठीं त्याच जोखड ते खलाशी सहन करीत.

या परिस्थितीचा परिणाम असा होई, कीं दौलतला हिंमतबद्दल परकेपणा आणि दुस्वास वाटू लागला. हिमत ढोंगी आहे, आपल्यात व त्याच्यात काहींच सारखेपणा नाही, आवडीनिवडींचें आपल्यांत काहींच एकमत नाहीं. आणि याखेरीज आपल्यापेक्षा सर्वस्वीं श्रेष्ठ असणाऱ्या माणसाच्या पुढं आपला प्रभाव काय पडणार अशा तऱ्हेचा न्यूनगडहि अजाणता दौलतच्या स्वभावांत आल्यान तर, हिंमतच्या सर्व बोलण्या-वागण्याकडे दौलत कलुषित मनान, कुचेष्टेच्या नि अनादराच्या भावान पाही, हिमतच्या कोणत्याच करण्यांत काही चागलं नाहीं, त्याच्या सर्व कृत्यात काहीं मतलब आहे अशी गैरसमजूत दौलतनं करून घेतलेली होती.

जेव्हा जेव्हा हिंमत दौलतशीं सरळ बोलू लागे तेव्हा तेव्हा दौलत मुद्दाम वक्रोक्ति नाहीं तर व्यजोक्तीचा आश्रय करी, आणि शेवटीं दौलतशीं नीट बोलण्याच काम दुस्तर अस समजून कटाळून हिंमत गप्प बसे.

आत्ताप्रमाण अगदीं राहवलच नाहीं म्हणजे हिमत दौलतशी बोलण्यास उद्युक्त होई.

“मीं गोष्ट चिघळवली ? छान !” दौलत म्हणाला, “कुठून काहीं गोष्ट सुरू झाली तरी, हिंमत, शेवटीं त्याचं खापर माझ्या माथीं मारण्याच तूं सोडीत नाहींस ! त्या कोळ्याशी बाचाबाची करताना मी तुझ्या मदतीला आलों ही गोष्ट माझी चुकली खरी.” अस उपरोधानं म्हणून दौलत तेथून चालता झाला.

असल्या बोलण्यापुढ काय उत्तर द्याव ! कस बोलल म्हणजे दौलतला सरळ वाटेल ! असा विचार करीत ‘अशक्य’ म्हणून हिंमतनं जरा खेदानच ती गोष्ट डोक्यांतून काढून टाकली.

हिमत पुढ गेला तो झिलमिट डेकवर बसून काम करीत होता. त्याच्याशेजारीं तीन इंची जाडीच्या दोराचे पाच-सहा वाव लांबीचे बरेचसे तुकडे पडले होते. प्रत्येक तुकडा घेऊन त्याचीं दोन्ही टोकं उलगडून व एकमेकात मिळवून आणि ओवून झिलमिट त्याची अखंड स्लिंग तयार करी. बंदरात बोटीवरून माल धक्क्यावर चढवण्या-उतरवण्यास या स्लिंगा लागत. कलकत्त्याला गेल्यावर काहीं नव्या स्लिंगा तयार हव्या म्हणून सारंगान झिलमिटला त्या तयार करण्यास बसवलं होत. आणि झिलमिट जो ठिय्या मारून बसला होता, तो त्या सगळ्या करून झाल्याशिवाय उठण्याचं चिन्ह दिसत नव्हत.

झिलमिटचा हा मोठा गुण असे. त्याला कामाची हौस फार. काम करण्यात त्याला खरी गोडी वाटायची. इतकी कीं, कामात रमल्यावर त्याला तहानभुकेचीसुद्धा शुद्ध उरत नसे. आत्ताच पाहा ना, न्याहारी-ची वेळ टळून गेली, बाकीच्या खलाशाची न्याहारी सपली तरी, हा आपला एकटाच स्लिंगा करीत बसला होता. त्याच्या सोबत्यांनीं बोलावल की, "हा, आलोंच आत्ता अर्ध्या मिलटात" असं म्हणत याच काम चालू राही. त्यामुळ कोणतहि काम सारंग निर्वेधपणें झिलमिटवर सोपवी. झिलमिटला ते करायला सागितल होत, याचाच अर्थ तें उत्तम तऱ्हेन पार पडलसुद्धा असा होत असे!

हिंमत आत्ता तसाच पुढ गेला असता, पण झिलमिट एकटा नसून मुकुल त्याच्याशेजारीं उभी होती. झिलमिटच्या ओबडधोबड दिस-णाऱ्या हाताचीं, काम करून वाकडींतिकडीं झालेलीं बोटं ज्या चपळाईन नि कुशलतेन त्या दोराच्या टोकांची झराझर मिळवणी करीत, त्या त्याच्या कसबाकडं आश्चर्यान नि कुतूहलान पाहत मुकुल रमली होती आणि शिवाय त्याच्याशीं विचारपूस करीत बोलत होती,

"तुझं गाव कोणतं रे झिलमिट?" ती म्हणाली.

"माझं गाव व्हय!—चांदवली."

"कुठस आहे रे तें?"

“ कलकत्त्याहून निगालं किनाऱ्याकिनाऱ्यानं म्हजी पश्चिमेकडं हाय ते शंबर–सवाशे मैल. तुमच्या गावला कर्णफुली नदी हाय ना !—तशी आमच्या गांवाला धर्मा नदी हाय. आन् त्या धर्मा नदीच्या आतमदी माजं त्ये चादबली गाव हाय.”

हिंमत हलकेच येऊन तिच्या पाठीमागं उभा राहिला तो तिला कळलाच नाहीं. झिलमिटन वर पाहिलं तेव्हां हिंमतन मुकुलच्या खांद्यामागून आपल्या ओठावर बोट ठेवून ‘चूप’ अशी त्याला खूण केली; आणि त्यानंतर हात नि डोकं हलवून ‘चालू दे, बोलत राहा’ अस झिलमिटला खुणवल.

“ मग तूं घरीं केव्हा जातोस ? ” मुकुलन विचारल.

“ जातो कदीमदी पाच–सा वर्सानं. या बोटीवर हिंडता हिंडतां येळ मिळत न्हाइ कदी.”

“ पांच-सहा वर्षान ? बाई, बाई ! मग राहतोस कशाला बोटीवर तूं, घरीं नाहीं जाता येत तर ? ”

“ मग काय करायच मुकलाताई ? पैसे मिळवाया होवत ना घरच्या मानसासाटी.”

“ तुझ्या गावाला नाहीं का पैसे मिळत कामधंदा करून ? ”

“ आमच्या गावी शेती करत्यात नि मच्छीमारी बी करत्यात. पन त्येन कुट मिळतुया पैसा ? ”

“ का ? ”

“ शेती करत्यात ती एक दोन वर्स व्हती, आन् मग दोन-तीन वर्सानं ज्ये वादळ येत त्ये, पार सार पान्याखालीं बुडवून वाहून न्येतं बगा. त्यो आमचा मुलूक असा इच्चित्रच हाय, की या समिद्रात वादळ झाल रे झाल, की त्ये त्या बाजूला येऊनशान् आमच्या मुलकाजवळ येऊन धडकलंच पाहिजे. प्रत्तेक पावसाळ्याला ह्योच प्रकार. आमच्या गावाचा भट सांगतो की, “ जगन्नातान जवा जगन्नातपुरीला राह्यचं ठरवलन् तवा समिंद्र म्हनाला त्येना, की देवा ! आता तू तर माज्यावर

अवाक्रिपा केलीस. शेषशायी व्हऊन तरंगत हिंडत व्हतास समिंद्रावर —या आमच्या बोटीसारख— त्ये आता जमिनीवर राह्यला जातुयास आता तुझी सेवा म्या कशी करायची? तवा जगन्नातान सांगितलं त्येला, की दरसाली पावसाळा आला की येत जा मला भेटाया. नि तवापास्न तो आजतागायता समिंद्र अक्षी बिनचूक येतोया. अस वादळ फिरवीत नि लाटा आपटीत येतोया, की सार त्येच्याखाली गडाप! पन येकदा जगन्नातपुरीला द्येव भेटला की झाल! शात व्हऊन परत जातुया गपचिप! अक्षी माझ्या बाच्यान ह्ये सत्य हाये."

खरोखरची वस्तुस्थिति अशी आहे कीं, पावसाळ्यात होणारी वादळ बगालच्या उपसागरात अदमानच्या आसपास निर्माण होऊन वायव्येकडे सरकत जात जात, जगन्नाथपुरी—चादबली या किनाऱ्या-जवळ हिंदुस्तानच्या जमिनीवर शिरतात. आणि बहुतेक नेहमीं हा भाग वादळाच्या मार्गात असल्यान दर वर्षा-दोन वर्षांनीं या भागांत अतिवृष्टि, महापूर, समुद्राच्या प्रचड लाटा इत्यादीमुळं नुकसान, प्राणहानि होते. मुकुलला चद्रदत्ताच्या जवळ शिकताना या गोष्टीचं यथार्थ ज्ञान झालेल होत. पण याच सृष्टिनियमसुलभ घटनेला चादबलीच्या भटानं पौराणिक दतकथेच दिलेल स्वरूप नि श्रद्धाळूपणाचं हे स्पष्टीकरण ग्राह्य धरून तिचं वर्णन करून सागतांना झिलमिटला ऐकून मुकुलला अति मौज वाटली. मुकुलच्या खदखदून हसण्यान हिमतलाहि हसू येऊ लागलं, पण त्यान तें प्रयासान दाबल.

"अस्स! नि मच्छीमारीचं काय?" त्याला मुकुलनं विचारलं.

"मुकलाताई! शेती नि मच्छीमारीन कुट पुरं पडतया व्हय? इकतीं मानसं घरची सारखी खपत्यात तवा कुट पोटाला जरास मिळत. पन लगीनकार्य येत्याती नि मग उचलून खर्च करावा लागतुया. त्येला कर्ज काडाया लागतं, न्हाइतर ह्ये माझ्यावानी समिंद्रावर कामं करून पैसे आणाया लागत. आता हितं बोटीवर खायालाप्यायाला कप्तानसाब देत्याती, कपड बी लागत न्हायती हित फारसं, दुसरा काय बी खर्च

न्हाय. पांच सा वर्सं काम झाल मंजी जातो मग घरी वरिसभर- न् मग फिरून याव लागतं समिंद्रावर!"

"मग आता केव्हा जाणार तू घरीं?"

"जाईन आता एक दोन सपरी झाल्या की. चार-पाच वर्सं झाली घरी गेल्याला आन् घरचा निरोप बी आलाया—"

"काय निरोप आलाय् घरचा?"

"माझ्या आवाला ल्येकरू झाल या म्हून?" अति आनंदान झिलमिट म्हणतो.

"तुला लेंकरू झालय्!"

"हा जी ताईसाब."

"पण तू घरीं गेला नाहींस ना चारपाच वर्षं?" चमत्कारिक वाटून मुकुल म्हणते.

"मग त्येला काय झाल, माज भाई न्हाइती का घरी?"

हें ऐकून मुकुल लाजली. उगीच विचारल आपण काहीं तरी अस तिला झाल. पण झिलमिटला त्यात यत्किंचित्‌हि वाईट दिसत नव्हतं. त्यांच्यामधली चालच ती होती. आणि म्हणून तो मोकळया मनान निर्विकारपणान बोलू शकत होता.

हे ऐकून वाचकसुद्धां हसतील. पण खर हसण्यासारख त्यात काय आहे? पृथ्वीच्या पाठीवर अनेक लोक आहेत नि त्याच्या अनेक चालीरिती आहेत. एकाची चालरीत दुसऱ्याच्या चालीरितींच्या तुलनेन हास्यास्पद वाटते. पण चालरीत ही अगरख्यासारखी नाहीं का? सोय पाहून ती अमलांत आलेली असते. काचोळी सोईची म्हणून स्त्रियानीं तिचा अवलब केला. त्यानीं ती धारण केली म्हणून कोणी हसत नाहीं; पण तीच एखाद्या पुरुषान घातली म्हणजे हसून हसून मुरकुडी वळेल ना? तसच. या किनारपट्टीवर राहणाऱ्या दर्यावर्दी —कोळी—शेतकरी अशा तिन्ही धद्याचा आश्रय करून उपजीविका करणाऱ्या लोकांच्या या जमातींनीं आपल्या उपजीविकेच्या—वंश-

वर्धनाच्या व जीवनाच्या परिस्थितीनुरूप सोइस्कर चालीरीति हळूहळू बनविल्या नि अंगिकारल्या तर त्यात काय चुकल ?

सधन, पांढरपेशा, नि सदा जमिनीवर राहणाऱ्या लोकांनीं आपल्या चालीरीति तेवढ्या खऱ्या, उत्तम अस मानून, त्याच्या चालीरीति हास्यास्पद ठरवण्याचा प्रयत्न केला तर खरोखर बाजू कोणावर उलटते ? त्या प्रामाणिक चालीरितींवर का आपल्याच चालीरीति तेवढ्या नमुनेदार अस अट्टाहासान मानणाऱ्या अल्पमतींवर ?

खरोखरी समाजसुधारकापुढ उभ्या राहणाऱ्या व अवघड वाटणाऱ्या अनेक प्रश्नाची सोडवणूक या अनेक कामकरी गरीब लोकांच्या जमाती कशी करतात ते पाहण त्याना कल्पनेबाहेर उद्बोधक होईल. पांढरपेशाना वाटणारी खोटी लाज भीड न धरता या जमाती आपल्या जीवनातील प्रश्न अतिशय व्यवहारसुलभ नि सत्यशोधक बुद्धीन सोडवतात, आणि त्यामुळ ते प्रश्न समाधानकारकपणे सुटतात सुद्धा. असो.

विषय बदलायचा पण अगदीं साहजिक रीत्या आणि फार लक्ष न वेधता. अवघड सवादातून सोडवणूक करून घ्यायची ही एक कलाच आहे. मुकुलच्या पुढच्या बोलण्यात हेंच धोरण दिसल.

" थांब, थाब झिलमिट ! " ती म्हणाली, " मी इतका वेळ पाहत आहे स्लिगा करताना तुला. ही शेवटची स्लिग तू नको करू. मला पाहूं करता येते का ? "

" ताईसाब ! या कामाला हात लई राट लागत्याती. या जाड दोरान आन् या मेखांनी तुमच हात सोलून निघतील."

" नाहीं रे झिलमिट, मला येईल ते." अस म्हणत मुकुलनं ती स्लिग करण्यास दोर आपल्या हातीं घेतला. " तू न्याहारी नाहीं ना केलीस अजून ? जा तर, खा थोड. मी बघ करून ठेवतें का नाहीं छान स्लिग."

" आन् तुमास्नी मदत लागली म्हंजी ?" झिलमिटन विचारलं.

"मी करीन मदत झिलमिट, जा तू." असं म्हणून हिंमत पुढं झाला.

झिलमिट गेल्यावर मुकुल म्हणते, " केव्हा आलांत तुम्ही इथं ?"

" कां ? झाला थोडा वेळ. तुझ्या माग तर उभा होतों, पण तूं गुतली होतीस सवादात."

" सगळा सवाद ऐकलात तर तुम्हीं आमचा !"

" ऐकला तर, नि तू विषयांतर केलेलहि ऐकल."

मुकुल यावर कांहीं बोलली नाहीं. ती त्या रिंलगचीं तोंड मिळवीत होती. पण त्यांत दोराचीं टोक ओवण्यात कुठ तरी चुकून मिळवणी चुकूं लागली. मिळवणी छान झाली म्हणजे त्याला गोल, गोडस आकार येतो, पण या मिळवणीला टेंगूळ आल होत.

तिच्या हातांतून दोर आपल्या हातीं घेऊन हिंमतन त्याचीं टोकं फिरून उलगडलीं. डेकमधून वर येणाऱ्या खिडकीच्या वरच्या लाकडी चौकटीवर टेकून बसून तो मिळवणी करू लागला.

" तुम्हांला या साऱ्या गोष्टी स्वतः हातान करतां येतात ?" मुकुलन विचारल.

" हो. दर्यावर्दी कप्तान नि अधिकारी यांच्या बाबतींत एक असा नियम आहे मुकुल, कीं दुसऱ्याला हुकूम करून जी जी गोष्ट आम्ही करायला सागू, ती ती प्रत्येक गोष्ट अगोदर आम्ही स्वतः करूं शकलों पाहिजे."

"तुम्हांला त्या डोलकाठीवर चढता येत ? त्या आडव्या वाशावर त्या खलाशांच्याप्रमाण दोराच्या रिकिबींत पाय ठेवून उभ राहून अवजार गुंडाळता येतात ? नि सुकाण धरता येतं ?" मुकुलन औत्सुक्यान विचारल.

" शका आहे कीं काय ! मुकुल, माकड पिलाला पोटाशीं धरून

झाडाच्या फांद्यांवरून हिंडतं ना निर्वेध. तसं तुला घेऊन मी या या सगळ्या डोलकाठ्यांवरून हिंडवून आणूं शकेन."

हिंमतचं आत्मविश्वासपूर्ण बोलणं मुकुलला फार मधुर वाटत होतं. स्वावलंबन नि स्वाभिमान या गुणांनीं ओतप्रोत भरल्यानं त्याच्या बोलण्याला एक प्रकारचा खणखणीत निनाद होता. खरं नाणं दगडावर खणखण वाजावं तशी त्याची ऐट होती. अशा आपल्या समोर उभ्या राहिलेल्या गुणवान् तरुणाचं आकर्षण एखाद्या युवतीला थोडथोडकं का वाटत असेल!

त्या सगळ्या उंच डोलकाठ्यांवर काम करणाऱ्या हिंमतची मूर्ति कल्पनाचक्षूपुढं आणून ती पाहू लागली. किती छान दिसत असेल हिंमत तीं धाडसाचीं कामं करतांना!

गालातल्या गालात हसून ती हिंमतला म्हणते, "पण एक गोष्ट मात्र तुम्हाला नाहीं करता यायची झिलमिटसारखी?"

"शक्यच नाहीं असं होणं."

"पाहा अं! येईल करता?"

"अशी काय आहे गोष्ट?"

"लग्न!" असं म्हणून प्रथम मुकुल नि मग हिंमत असीं दोघंहि हसू लागलीं.

"अग मुकुल! तेंहि येतं मला करता. पण दुसऱ्या अर्थानं. या दोरांच्या टोकाची मिळवणी करताना त्यांचे निरनिराळे भाग एक-मेकांत मिसळतात ना, त्याला इंग्रजींत म्हणतात 'Marry', आणि दुसरीहि गमत अशी कीं, तारेचे सहा सहा कळ्यांचे केलेले दोर असतात ना, त्यात तर मधें एक अंबाडीचा मूळ धागा असतो, त्याला म्हणतात त्या दोराचं 'हार्ट'. म्हणजे त्यांची मिळवणी करतांना दोन दोरांच्या कळ्या उलगडून त्या अगोदर अशा एकमेकाशीं मिसळायच्या." असं म्हणत त्यानं आपल्या हाताचीं बोटं पसरून धरलीं, नि

मुकुलच्या हाताचा पजा धरून त्याचीं बोटं पसरून आपल्या एका बोटाआड तिच एक बोट असं ठेवल नि मग हात मिटला. “ एक एक बोट म्हणजे दोराची एकेक कळी अ, अशा सगळया कळया एकमेकांत मिसळायच्या नि मग तें अबाडीच ‘हार्ट’ असत ना तोंहि एका दोराच दुसऱ्यांत गुफायच, म्हणजे दोराची मिळवणी अशी बेमालूम होते, कीं दोन दोर उरतच नाहींत पाहा. बर मुकुल ! मीं तुला लग्न सुद्धा करून दाखवल. मग झाली फजिती ?”

मुकुलन त्याच्या बोटात बोट तशींच घट्ट ठेवीत म्हटल, “ तर मग झाल ना लग्न आपल ? बरच झाल.”

“ छट्, छट्, छट् ! मी असा फसणार नाहीं मुकुल. ” हात सोडवून घेत पुरी केलेली स्लिग गुडाळून डेकवर टाकून हिमत म्हणतो.

“ मुकुल ! आत्ताच तुला सागत होता ना झिलमिट ? त्यान लग्न केलय् पण काय तसल्या लग्नाचा उपयोग ! पाचसहा वर्षांनं भेटायच नवराबायकोन. दोघानाहि सुख नाहीं. सदा विरह नि प्रतीक्षा.”

चेष्टेवरनं निघता निघता एकदम आपल्या मनातला मुख्य विषयच बोलण्यात आल्याबरोबर मुकुलचं तोड गंभीर झाल.

“ मी बोटीवर राहीन ना पण नेहमीं.” ती आर्जवून म्हणूं लागली.

“ छेः ! बोटीवरच हें आयुष्य बायकांकरितां नाहीं मुकुल. एखाद्या सफरीवर जाणं वेगळं, नि जन्मभर बोटीवर राहणं वेगळ. दर्यावर्द्योच्या कामाला पुरुषच हवा.”

“ मग तुम्ही राहा जमिनीवर.”

“ तेंहि शक्य नाहीं. माझं आयुष्य दर्यावर्दीचच. जमिनीवर कध्धीं माझ्याच्यान राहवायच नाहीं सारख.”

" हिंमत ! मला एखादी गोष्ट कितीहि प्रिय असली तरी तुमच्या-साठीं मी ती सोडीन. बायका किनई प्रेमासाठीं इतर सार सोडतात. मला निलाजरेपणान म्हणवत नाहीं, पण तरी मी बोलून दाखवतें आहे, कीं माझ तुमच्यावर प्रेम आहे हो ! "—तिचा कठ सद्‌गदित झाला होता. ती पुढ म्हणाली, " मी गप्प कशी हो बसू ? दोन-चार दिवसात कलकत्त्याला जाऊ आपण, नि माझ्या लग्नाची खटपट बाबा नि जिजी करू लागतील. बुडणार माणूस धडपड केल्यावाचून राहतं का ? नि तुम्ही एका शब्दान बोलत नाहीं हिमत, माझी धडपड पाहूनसुद्धां."

मुकुलच आपल्यावरचं प्रेम नि आपल तिच्यावरच प्रेम याची पूर्ण जाणीव हिंमतला झाली होती. पण आपण दर्यावर्दी असताना मुकुलशी लग्न करून आत्ता प्रणयाच्या पहिल्या उन्मादात तात्कालिक सुख झाल तरी जन्मभर कष्टी व्हायच ही गोष्ट त्याला सुविचाराची वाटत नव्हती. स्वतःला तो विरह सहन करता आला तरी, मुकुलसारख्या मुलीला ही दीर्घ विरहदुःखाची शिक्षा जन्मभर भोगायला लावणं किती क्रूरपणाच आहे हें त्याला दिसत होत.

एकमेकांबद्दलच आकर्षण जवळजवळ अनिवार होऊन तीं दोघ एकत्र येत. परस्पराच्या प्रिय सान्निध्यात तीं आनदान रमत, खेळी-मेळीन हसण्याबोलण्याचे क्षण अतृप्त मनानं उपभोगीत. गाडी उतरडी-वर लागली आहे हे हिंमतला कळे. पण त्या सहवासतृषेला, त्या प्रेम-मोहाच्या अतीव वेगाला पायबद घालण दुर्घट होई. पहिल्यापासूनच आपण आपल मन आवरायला पाहिजे होत अस आता हिंमतला वाटूं लागल. सध्याच त्यांच्या प्रेमान इतक मूळ धरल होत, कीं तें रोपटं उपटून टाकताना मुकुलला नि त्यालाहि खूपच यातना होणार हें त्याला दिसत होत. पण मुकुलच्या चिरकालीन सुखासाठीं त्याला ही गोष्ट करण भाग होत. आत्तांच तिला तोडून टाकावं, नि कलकत्त्याला तिच कुठ चांगल्या स्थळीं लग्न जमलं तर चंद्रदत्तांना प्रोत्साहन देऊन

तें उखडून टाकावं असं त्याला वाटूं लागलं. आत्ता तिला वाईट वाटेल, पण नंतर लग्न होऊन संसारात गुंतल्यावर तिला विसर पडेल असं त्यानं मनाशी ठरवलं.

पण मुकुलच्या ओठांनीं अनुभवलेल्या प्रेमाच्या अत्युत्कट चुंबनाचा विसर तिला पडणं शक्य नव्हतं. तारुण्याच्या रमणीय प्रदेशांत पदार्पण केल्यावर प्रियकरानं प्रेमभरानं जवळ ओढून घेतलेलं पहिलं चुंबन फारच परिणामकारक असतं, त्यानं उसळणारी उन्मादकारक प्रेमौघाची प्रचंड लाट अधरापाशींच थांबत नाहीं, तर सारीं गात्रं नि साऱ्या संवेदना आपल्या महापुरांत बुडवीत, साऱ्या चित्तवृत्ति नि विवेक आपल्यापुढं वाहवून नेत, खुद्द हृदयाच्या गाभ्यालाच ती धडक मारते.

पुढं त्या विशिष्ट प्रेमाची पूर्तता झाली न झाली, अथवा व्यवहाराच्या गाड्याखालीं चेपल्यामुळं, प्रीतीऐवजीं सोय हेंच गमक जास्त प्रभावी ठरून जन्माची गांठ बांधली गेली, तरी स्त्रीहृदयाला त्या पहिल्या चुंबनाचा विसर पडत नाहीं. प्रेमौघाची उच्चतम सीमारेषा हृदयावर लाल जखम होऊन कोरली जाते.

किंवा असं पाहा कीं, वस्तुतः पूर्वजन्मीच्या लाग्याबांध्यांनीं प्रेरित झालेल्या, पण पूर्वविस्मृतीनं या जन्मीं अगदीं अकारण वाटल्या तरी सहजोद्भवी नि अंतःस्फूर्त भावना हें एक टोक मानलं तर, आयुष्याच्या धकाधकींत परिस्थितीच्या परिसीमेनं मर्यादित झालेली आणि शरीरधर्मानं झालेल्या गरजा भागवण्यासाठीं पाहावी लागणारी सोय, हें दुसरं एक टोक आहे. या दोन्ही टोकांचा समन्वय करण्याच्या हेतूनं प्रत्येक व्यक्ति आपआपल्या परीनं त्यावर एक मनोविचाराचा पूल बांधते. व्यक्तीच्या वकुबाप्रमाणं तो पूल लाकडी, दगडी अगर झुलता होतो. पण नवतारुण्याच्या महापुराच्या वेळीं या पुलावर जितक्या उंचीवर प्रीतीचं पाणी—हो, पाणीच नाहीं तर काय!—चढतं तितकं तें पुढं संबंध आयुष्यांत क्वचितच पुन्हा चढत असेल.

हिंमत म्हणाला, "मुकुल! जिजी नि चंद्रदत्त तुझ्या लग्नाची

खटपट करूं लागले ना कलकत्त्यात, कीं मीहि त्यांना शक्य तितकी मदत करणार आहे. तुला उत्तम नवरा शोधून काढला पाहिजे."

"म्हणजे तुम्ही नाहीं ना करणार माझ्याशीं लग्न?" मुकुलनं निराशेन दुखावलेल्या मनान विचारलं.

"छेः! माझं समुद्राशीं नि या सायतारेशी लागलंय् लग्न."

"मग माझं लग्न ठरवण्याची खटपट तुम्ही कशासाठीं करणार?"

"मला तूं फार आवडलीस नि त्यामुळ तुझं हातून होईल तें हित करावं असं फार वाटत म्हणून."

"येवढी मी आवडलें, नि इतकी हितबुद्धि जागृत झाली आहे, तर मग तुम्हींच करायचं होतत माझ्याशीं लग्न."

"तें शक्य नाहीं."

"मी फिरून विचारणार नाहीं बघा! हे शेवटचच विचारणं. तुम्ही नाहीं करणार माझ्याशीं लग्न?"

"अ ऽ ऽ ह!" म्हणत हिमतन नकारार्थी मान हलवली.

मुकुलच्या डोळयात पाणी जमलं. पण होणार दुःख गिळण्याचा तिचा निश्चय होता. तिनं खालचा ओठ दाताखालीं घट्ट धरला. ती थोडया वेळान म्हणाली, "मग तुम्ही माझं लग्न ठरवण्याच्या भानगडींत पडूं नका." ती वळली नि आपल्या खोलीकडे जाऊं लागली.

हिंमतच्या मनाला मुकुलच दुःख पाहून फार वाईट वाटत होतं. तिला असं तोडण त्याच्या जिवावर आल होतं. पण समुद्राच्या शिकवणीन निश्चय जलद करण्याची त्याला सवय झाली होती. कांहीं कांहीं गोष्टी करण भाग असतं. मनाला त्यान सुख होतं कीं दुःख होतं हा विचार अगदीं गौण असतो.

पण नकार मिळाल्यानं विव्हल होऊन परत जाणाऱ्या मुकुलची आकृति इतकी करुण वाटत होती, कीं चार पावलं तिच्या मागोमाग

जाऊन तिचं सांत्वन करावं, तिला समजुतीच्या गोष्टी सांगाव्या असं वाटून हिंमत पुढं गेला. त्यानं हाक मारली—

"मुकूल—मुकूल."

मुकुलनं मागं वळूनसुद्धा पाहिलं नाहीं.

"मुकूल!"

छे!—मुकुलला हाक ऐकायचीच नव्हती.

पुढं दौलत जात होता. त्याला हाक मारून मुकुल म्हणाली—

"दौलत, थांब जरा. मी येणार आहे सुकाणं धरायला. मला पाहायचं आहे मला सायतारा वळवता येते कीं नाहीं ते."

दौलतला आश्चर्यच वाटलं, पण तो म्हणाला, "चल कीं—जरूर चल."

हिंमत होता तिथंच उभा राहिला. त्याच्या पायापाशीं त्यानं मघाशीं मिळवलेली दोराची सिंलग होती. ती त्यानं ठोकरीनं दूर सारली, मग वर उचलली, त्याचे मिळवलेले धागे त्यानं पुन्हा उसकून बाहेर काढले, नि टोक उलगडलेला तो दोर समुद्रात दूरवर भिरकावून देऊन 'मोकळे झालों' अशा आशयानं दोन्ही हात एकमेकांवर आपटले. दर्यावरचं आयुष्य हें असंच! गोष्टी मनासारख्या झाल्या नाहींत तरी चेहऱ्यावर दाखवायचं नाहीं. मोठं वादळ होऊन गेलं तरी तें सपल्यावर समुद्रांत काही फरक दिसतो का त्यानं? अनुकूल वा प्रतिकूल स्थिति असो, वारा कसाहि वाहो, दर्यावर्दीला ध्येयाकडं बोट हाकारीत राहावं लागतं! जन्मभर झुंजायचं. त्यातच पौरुष आहे.

# ११

कलकत्त्याच्या एका उपनगरात एक मोठा इमला होता. त्याच्या बाहेरच्या उच्च कुपणाच्या भिंती आणि त्याना लागून असलेल्या उच्च झाडाच्या पानाची गर्दी यामुळ आतल बाहेरून फारच थोड दिसे. इमला दुमजली असून बाहेरून तरी त्यात काहीं कलाकुसर केलेली नव्हती. घराभोवतीं मात्र बगीचा फारच सुंदर केलेला होता आणि बगीचाच्या मधोमध आणि घराच्या समोर एक बराच मोठा आणि पांचसहा पुरुष खोल असा तलाव होता. कलकत्त्याला पाण्याची रेलचेल असल्यान बारा मास तलावाला काठोकाठ पाणी असे. खोल असल्यान व आजूबाजूच्या उच्च वृक्षाचा आडोसा असल्यान तलावाचं पाणी सदा शात, निःस्तब्ध असे. त्यात भोवतालच्या साऱ्या वस्तूच प्रतिबिंब पडे. त्या दुमजली इमल्याच्या खालीच त्याच प्रतिबिंब दिसल्यान तळयाच्या दुसऱ्या तीरावरन चार मजली घराचा आभास निर्माण होई. घर आणि बगीचा सुदर तर होताच, पण त्यापेक्षा त्याचं प्रतिबिंबच अधिक रम्य नि सुदर दिसत असे.

तलावाच्या घरासमोरच्या तीरावर फरसबदी केलेली असून तेथून पुढें पाण्यात जाण्यासाठीं पायऱ्या बांधून काढल्या होत्या. पायऱ्यांच्या

बाजूच्या उभ्या कठड्याला रेलून आपल्याच विचारांत गढलेली एक पंचवीस-सव्वीस वर्षांची तरुण स्त्री उभी होती. हिचच नाव राणी. नैनीबाबू वारल्यानतर त्यांच्या साऱ्या जमीनजुमल्याची, व्यापारी पेढीची, आणि सपत्तीची एकटी एक मालकीण ही विधवा स्त्री झाली होती. राणी अगानं सडपातळ, मध्यम बांध्याची नि वर्णान अगदीं काळी होती. गौरवर्णाची असती तर कदाचित् दुसऱ्या एखाद्या तरुणाशीं लग्न ठरून नैनीबाबूशी लग्न करण्याचा प्रश्न आला नसता. पण नैनीबाबूला वृद्धपणामुळ तरुण मुलगी मिळणं कठीण होत, तेव्हा तिचा वर्ण काळा-सावळा असला तरी त्याला त्याची हरकत नव्हती. शिवाय अगदीं गरीबींत वाढलेली. त्या वेळीं तर धड अगभर वस्त्र नसे, की पोटभर अन्न मिळत नसे. त्यामुळहि दारिद्र्याच्या सावलींत ती आणखीनच वाईट दिसे.

पण नैनीबाबूशीं लग्न झाल्यानतरच्या सुस्थितीनं तिच्या अंगावर हलके हलके श्रीमतीचं तेज चढू लागल. तो मेल्यानतर तर राणी सर्वस्वाची व स्वतःची सर्वस्वी मालकीण झाली. त्या स्वतन्त्रतेनं तिच्या मनोगुणाना वाढण्याला भरपूर वाव मिळाला. तिचा स्वभाव आणि शरीर या दोन्हीवर अनुकूल परिस्थितीचा परिणाम झाल्यानं आतां राणींत एक प्रकारच वैशिष्ट्य, व्यक्तिमत्व आणि तेज आलं होतं. तिची वागणूक, चालचलणूक इतक्या ऐटींत असे, कीं तिच्या राणी नावाला सार्थता आली होती.

कठड्याजवळ उभी राहून राणी आपल्या पाण्यातल्या प्रतिबिबाकडे न्याहाळून पाहत होती. आणि तिन केसावरून हात फिरवला, आणि समाधानपूर्वक मुद्रेन तो माग वळली.

तिची एक दासी येऊन मागं उभी होती. तिनं एका परडींत फुलं आणलीं होतीं, तीं पुढ करून ती म्हणाली, “ घरांत मुनशीबाबू येऊन बसले आहेत कधींचे. त्याची गाठ घ्यायची आहे ना ? ”

राणीन त्यातील कांहीं सुंदर लांब देठाचीं पानांसहित असलेलीं फुलं वेचून आपल्या सैल अंबाड्यांत खोचलीं. "किती वेळ झाला मुनशीबाबूला येऊन?"

"झाले दीड-दोन तास! त्याच्याबरोबर आणखीहि एक माणूस आहे."

राणी घराकडं चालू लागली.

ती घरांत पुढच्या बैठकीच्या खोलींत आल्याबरोबर मुनशीबाबूनं उठून लवून नमस्कार केला आणि तो तसाच उभा राहिला. जवळच्या उंच कोचावर बसून राणी त्याशीं बोलू लागली, पण मुनशीबाबूला बसण्यास तिन चुकून सांगितल नाहीं.

हा मुनशीबाबू त्यांच्या पेढीचा सर्वांत जुना आणि विश्वासू कारकून. नैनीबाबूच्या हाताखालीं गेलीं पंचवीस वर्षं तो पेढीवर काम करीत असल्यान पेढीच्या व्यवहाराची सूक्ष्म नि परिपूर्ण माहिती त्याला झाली होती. जुनेंपणान येणारी आपलेपणाची वृत्ति आणि स्वामिभक्ति त्याच्यांत बाणली होती. नैनीबाबूच्या माग राणीलाच त्यांच्या जागीं मानून तो आपल काम पूर्ववत् सचोटीन पार पाडी.

अगोदर मुनशीबाबून काल दिवसभर पेढीवर झालेल्या व्यापार-व्यवहाराचा तपशील सादर केला. मग हिशेबाच्या वह्या पुढं टाकल्या त्या नीट तपासून पाहून राणीन स्वतःची खात्री करून घेतली.

मुनशीबाबू म्हणाला, "मला आठ-पंधरा दिवस कामाला यायला व्हायचं नाहीं. माझा जावई फार आजारी आहे."

"मग? आजारी असला तरी पेढीचं काम कसं बंद ठेवणार?"

"बंद राहणार नाहीं पेढी, मी नसलों तरी बाकीचे चालवतील."

"मग तुमच्यावाचून पंधरा दिवस काम चालूं शकत तर नेहमीं सुद्धां नाहीं चालूं शकणार?"

" होय राणीजी ! सहज चालू शकेल. अस कुणीच नसत, कीं ज्याच्यावाचून जगव्यवहार अडून बसतील. तें मला पुर ठाऊक होत म्हणून तर नैनीबाबूच्या हाताखालीं पचवीस वर्ष नौकरी केली."

" पूर्वी पचवीस वर्ष चागली नौकरी केली ही आता ढिलाई किंवा हलगर्जीपणा करण्याला सबब होत नाहीं ! "

" राणीजी ! आपल अन्न खातों, त्याशी बेइमान व्हायच कधीं स्वप्नींहि आल नाही. आपल्या बोलण्यावरन आपला गैरसमज झालेला दिसतो. काय कसूर झाली माझी ? "

" मुनशीबाबू ! तुमच्या हाताखालचे इतर कारकून नि मुनीम, सारेच फार उद्दाम झालेले दिसतात. त्याना तुमची फूस असल्याशिवाय का ते इतके शेफारतील ? त्या तुमच्याबरोबर आलेल्या मुनीमाला आत बोलवा."

मुनीम आत आला तो थरथरतच आला.

" काल दोन प्रहरी पेढीवर एक म्हातारी आली होती ना ? "

" होय जी ! "

" काय म्हणाली ती ? "

" तिला कर्जाऊ पैसे हवे होते. मीं तिला सागितल मिळणार नाहीत. तिच्याजवळ पुरेशा किंमतीची गहाण ठेवायला वस्तु नव्हती, सरकार ! "

" एवढच नाहीं म्हणालास तू, नीट आठव."

" आणखीन् नाहीं कांहीं म्हणालो, अम्माजी ! "

राणी आपल्या जागेवरून उठून पुढ आली. दरवाजाजवळच्या एका खुंटीवर लोंबणारा चाबूक तिन हातात घेतला नि ती पुढ म्हणाली, " तू काय म्हणालास माझ्याबद्दल उपहासानं त्या वेळीं तें मी स्वतःच ऐकल होतं. तुझ्या मालकिणीबद्दल असलीं मुक्ताफळ उधळताना तुला कल्पना आली नसेल, कीं ज्या म्हातारीजवळ तूं बोलत होतास ती

दुसरी कोणी नसून खुद्द मीच, तुमची सर्वांची पेढी चालविण्याची रीत पाहण्यास आलेली तुमची मालकीणच होतें !"

त्या मुनीमाची इतकी गाळण उडाली होती भीतीनं, कीं त्याचे पाय लटलटा कापत होते. पण त्याला फार वेळ उभा राहण्याची तसदी पडली नाहीं.

राणीनं त्वेषानं मारलेल्या चाबकाच्या फटकाऱ्याच्या वर्षावाखालीं बेशुद्ध होऊन तो निपचित खालीं पडला. राणीचा कडकपणा मुनशीबाबूला आजवर ठाऊक झाला होता, पण इतका त्वेष, कडवेपणा आणि क्रौर्य त्या इतक्या तरुण स्त्रीच्या अंगीं असेल याची त्याला आजच प्रचीति आली. राणीच्या सांगण्यावरून दोन नोकरांनीं त्या बेशुद्ध पडलेल्या मुनीमाला उचलून नेला. त्या शिक्षेच्या अमलबजावणीनं राणीला मोठं समाधान झालं होतं. तिच्या आत्मनिष्ठ स्वभावाला तिच्या सामर्थ्याचा आणि निरंकुशत्वाचा मोठा अभिमान वाटला असावा.

मुनशीबाबूला आपली रजा मागण्याखेरीज आणखीहि एक थोडं काम होतं. तें म्हणजे राणीचा तपास करीत आलेल्या काहीं गृहस्थांची तिच्यापुढं रुजवात करायची होती. पण या रागाच्या प्रदर्शनानंतर तोंड उघडण्याची त्याची हिंमत होत नव्हती.

"झालं ना तुमचं काम आतां ?" राणीनं विचारलं.

"थोडंसं आहे अजून. काल नैनीबाबूंच्या जुन्या ओळखीचे चंद्रदत्त चट्टोपाध्याय नांवाचे चितगांवकडचे गृहस्थ आणि कप्तान कान्होजीराव नावाचे एक दर्यावर्दी आपली चौकशी करीत पेढीवर आले होते. त्यांना आपली भेट घ्यायची होती म्हणून मीं त्यांना आज याच सुमारास भेटण्यास यायला सांगितलं होतं. मोत्याचा व्यापार करण्याचा पूर्वीं नैनीबाबूंचा विचार होता. त्या वेळीं चंद्रदत्त चट्टोपाध्याय त्यांच्याशीं वाटाघाटी करीत असत."

हें बोलणं होत आहे तों एका नोकरानं बाहेर वर उल्लेखिलेले

गृहस्थ आल्याची वर्दी दिली. मुनशीबाबूला जाण्यास सागून त्या दोघांना आत आणण्यास राणीन नोकरास सांगितल.

कान्होजीरावाना त्या मोठ्या बंगल्याचं आणि त्याच्या पोरसवदा दिसणाऱ्या मालकिणीच सकौतुक आश्चर्य वाटल. सर्वसाधारण स्त्रियाच्यापेक्षा राणी त्याना फारच वेगळी वाटली. बसल्यावर चद्रदत्त म्हणाले, "मी नैनीबाबूंचा फार जुना स्नेही. त्याचप्रमाण माझ्याबरोबर आलेले हे कान्होजीरावहि माझे जुने स्नेही आहेत. ते एका गलबताचे कप्तान असल्यान त्याना मस्कतच्या आखाताकडे व इराणच्या आखाताकडे अनेकदा जाव लागत. तिथ काढल्या जाणाऱ्या मोत्याचा व्यापार सुरू करण्याची त्याची इच्छा होती. आणलेल्या मोत्याचा व्यापार इथ एखाद्या जुन्या आणि नीट प्रस्थापित झालेल्या पेढीमार्फत करावयास हवा, म्हणून मीं त्याना तुमच्या पेढीचं नाव सुचवल."

"होय. आमची पेढी सध्या मोत्याचा थोडा व्यापार करते. चांगल्या मोठ्या मोत्यांचा नियमितपणान पुरवठा झाला तर व्यापाराची ती बाजू वाढवण्याचा मी विचार करीन."

बसल्या जागेवरून खिडकीतून बाहेरचा तलाव राणीला दिसत होता. तलावाच्या काटाकाठान एक व्यक्ति बगीचाच नि त्या घरालगतच्या तलावाचं दिसणार सुदर दृश्य पाहत हिंडत होती.

"पण नियमित पुरवठा करण्याची हमी तुम्ही घेऊ शकाल का? कारण तुमच्या जहाजाचे मालक धाडतील तिकड तुम्हाला जाव लागणार."

"मी माझ्या मालकीच्या जहाजाचा कप्तान आहे." कान्होजीराव म्हणाले, "जिकडे माझी खुषी लागेल तिकडे मी जाऊ शकतों. कोणता व्यापार करावा, केव्हा करावा हें माझं मीच ठरवणारा."

राणीच कान्होजीच्या बोलण्याकड फारस लक्ष नव्हत; तें त्या तलावाजवळ उभ्या राहिलेल्या व्यक्तीन वेधून घेतल होत. तिन

दासीला जवळ बोलावून त्या व्यक्तीला इकडे बोलावून आणण्यास सांगितल.

"क्षणभर थांबा अ," अस म्हणत राणी दाराबाहेर गेली. "कांहीं हव आहे का तुम्हाला?" तिन त्या व्यक्तीला विचारल.

"छे, छे; काहीं नको. मी नुसती बागेची शोभा पाहत होतों." हिंमत कान्होजी व चद्रदत्त याच्याबरोबर आला होता. पण आत न येता सहज बाहेरच बगीचा पाहत हिडत राहिला होता. राणी विधवा होती. पण विधवा असली तरी ती तरुण होती. हिंमतची ती उची पुरी शरीरयष्टि आणि प्रसन्न तजेल चेहरा पाहून ती दिपून गेली होती. नाहीं तर दुसर कोणी अस तिच्या बागेंत हिंडताना दिसतं तर ती वाघिणीसारखी चवताळून त्यावर ओरडली असती.

"कुणाकड आला आहात तुम्ही? कुणी हव का?"

"छे, छे, मी आपला नुसता आलों--माझ स्वतःच तसं कांहीं काम नव्हत—"

हिंमतचा आवाज ऐकून चद्रदत्त एकदम बाहेर आले.

"हात्तिच्या! याच्याशी का तुम्ही बोलत होता? अहो, हा त्या कान्होजीरावाचा मुलगा हिंमत."

"अस्स. मग ठीक आहे," राणी म्हणाली, "नाहीं तर मला कळेनाच कीं हे कोण, नि असे का आमच्या बागेंत हिंडत आहेत? या ना आत, या की."

हिमत हा कान्होजीरावांचा मुलगा आहे हें कळल्यासून राणीच्या बोलण्यात एकदम फरक पडला. नुसत्या व्यापाराबद्दल बोलणी चालणीं करण्याचा रूक्षपणा नाहींसा होऊन राणी सवादात अतिशय लक्ष-पूर्वक भाग घेऊ लागली.

"तुमची स्वतःचीच बोट आहे म्हणतां. वाः! बोटीवरन असं हिंडण्यात फारच मौज असेल. सागा पाहू मला तुमच्या बोटीबद्दल जास्त माहिती."

कान्होजीरावानीं सायतारेच नि त्याच्या दर्यावर्दीपणाच वर्णन थोडक्यातच पण बहारदार केल. किती झाल तरी 'सायतारा' त्याची जिवाभावाची बोट होती.

राणीला ते वर्णन फारच आवडल.

चद्रदत्तानीं फिरून मुद्द्यावर सभाषण आणल. तेव्हा राणी म्हणाली, " कान्होजीराव, कबूल आहे मला तुमची मोत्याच्या व्यापाराची कल्पना. पण माझी एक अट आहे, मलाहि एखादी समुद्रसफर करावीशी वाटते आहे. मला जर तुमच्या बोटीवर यायला मिळाल तर आमची पेढी हा व्यापार करण्याच काम अगावर घेईल."

" हो ! त्याला काय हरकत आहे ! जरूर तुम्हांला समुद्राच्या सफरीवर घेऊन जाऊ."

कान्होजीराव आणि चद्रदत्त आपली कल्पना साधणार या समाधानानं जायला उठले. पण ते तिघेहि जाण्यापूर्वी त्याना सर्वाना फिरून दोन-चार दिवसानी जेवावयास येण्याबद्दल आग्रहपूर्वक आमत्रण देण्यास राणी विसरली नाही. येवढच नव्हे तर जिजी व मुकल याहि बोटीवर असल्याचें कळल्यावर त्यानाहि राहावयास येण्याबद्दल कळविण्यास राणीन निक्षून बजावलं.

त्याच दिवशी सध्याकाळी राणीची म्हातारी आई तिची भेट घेण्यास आली. लग्न झाल्या दिवसापासून राणीन आपल्या आईबापाच नाव टाकल होतं. तिच म्हणण एकच, कीं पैशासाठीं तुम्ही मला विकलीत, तुमच्या चरितार्थाला मिळावं म्हणून माझा या वृद्ध नैनीचाषूशीं विवाह करून गळा कापलात. आता मी तुम्हाला मेलें, नि तुम्ही मला मेलात.

राणीचा बाप एका देवळाचा पुजारी होता. त्या देवळाच जें कांहीं उत्पन्न येई त्यांतून त्याचा चरितार्थ चालत असे. पुढं बापहि मेला आणि आई कशीबशी दिवस काढीत होती. पण राणी इतकी करारी होती कीं फिरून तिन त्या माहेरच्या माणसाच नाव काढलं नाहीं.

म्हातारी येऊन खूप वेळ दाराशीं बसली, पण राणीन लक्षच दिलं नाहीं. म्हातारी शेवटीं रडूं लागली आणि मुलीची भेट होईपर्यंत दारातून उठणारच नाहीं म्हणून तिन आग्रह धरला. " मी तर काय थेरडी झाले. हितच दाराशीं जाऊ दे माझा प्राण, पण मी हलायची नाहीं. मला तरी दुसर कोण आहे जगात ? नवरा होता तो वारला, पोटची येवढी एक मुलगी. तिच्याच घराच्या पायरीवर गेला प्राण तर निदान मला जाळतील तरी कुणी."

नोकरचाकराना सुद्धा कीव आली, पण राणी काहीं म्हणेना. सरतेशेवटीं अगदीं खरोखरच प्राण गेला तरी भेट झाल्याशिवाय न हलण्याचा निर्धार म्हातारी सोडणार नाहीं अशी खात्री झाल्यावर राणीन तिला आत बोलावल.

म्हातारी म्हणाली, " मुली ! मला तुझ्याशीं, अगदीं एकटीशीं बोलायचं आहे. दुसर कुणी ऐकणार नाहीं अशा जागीं मला ने." आईला नक्की भ्रम झाला असावा अशी राणीची कल्पना होऊ लागली. तरी पण तिन म्हातारीच्या समाधानासाठीं तिला आंतल्या खोलीत नेल.

म्हातारी म्हणाली, " हें बघ, तुझ्याकडून काहीं एक मागायचं नाहीं. माझा सारा जन्म दारिद्र्यात गेला. आता पचपक्वान्न माझ्यापुढ ठेविलीस तरी तीं माझ्या घशाखालीं उतरायचीं नाहींत, कीं शालूपैठण्या दिल्यास तरी लाज झाकण्यासारख शरीरहि उरल नाहीं. मी थेरडी मरायला घातलेली. मला तुझ्या अर्ध्या दमडीचाहि अभिलाष नाहीं."

जरा दम खाऊन म्हातारी पुढं सागू लागली, " हें पाहा, तुझ्या वडिलांची होती अठरा विश्वे गरीबी. खायला धड मिळेना, नि घरीं पाच पोर होतीं—तुझी वडील भावड. तेव्हा ज्याच्या घरीं भिक्षुकी होती त्या तुझ्या वडिलाच्या यजमानानीं त्याना दिल बांधून एक कालीच देऊळ. त्याला वर्षासन लावून दिल, आणि आम्हा गरीबाच्या घरीं पैसे खेळू लागले.

“ पण ती सारी सुस्थिति रक्तांत कालवलेली होती. तुझ्या वडिलानी त्या यजमानाला कालीची शपथ घेऊन वचन दिल होतं, कीं कालीला नरबली देईन. आणि बळी कुणाला द्यायच त्याकडे यजमान बोट दाखवी ! त्याप्रमाण त्यानीं सहा नरबळी दिले !

“ मला प्रथम याचा पत्ताच नव्हता. पण एके दिवशीं खुद्द देवळातच एक माणूस मारला गेला. शिपाई येऊन चौकशी होऊ लागली. पण काय जाणे कस तें सार निभावल गेलं !

“ पुढं त्या यजमानाच काय झाल, कुठ गेला तो, कांहीं कळल नाहीं. पण देवळाच वर्षासन बद पडल. पाहिल्यासारखी गरिबी आली परत आमच्या घरीं, नि मग देवानच आमच्यावर शस्त्र धरलं. तुझीं पांची भावडं मेली ! तू झाल्यावरहि कित्ती वर्ष कसबस पोट भरत होतों आम्ही. तूं मोठी झाल्यावर ठरवल आम्ही, कीं तुला कसहि करून श्रीमतींत टाकायचं. आता आम्ही दरिद्री. त्यात तुझ रूपहि यथातथाच, कुठली सोयरीक जमायची श्रीमंताशी ? आम्हीं जन्मभर दारिद्य भोगून पाहिल आणि त्यावरनच ठरवल, कीं मुलीच लग्न श्रीमतीशी करू, पैशाशीं करू, मग नवरा कसाहि असो.— आणि तसाच हा नैनीबाबू जावई मिळाला !

“ तुझ्या लग्नानतर तुझे वडीलहि गेले, नि आमच्या घरच्याकडून झालेल्या सहा हत्यांचा बदला देऊन पुरेपूर भरपाई झाली ”

राणी अगदी दिङ्मूढ होऊन ऐकत होती. इतका हा सारा वृत्तान्त भयकर होता. आपल्या माहेराकडची ही सर्व जुनी घटना आज तिनं प्रथमच ऐकलीन्.

“ मला हें सगळ कशासाठीं ऐकवलस ? या गोष्टी न कळत्या तर माझं कांहीं मोठ अडल असत अस नाहीं ! ”

“ नसतच तुला मीं कळवल. पण दोनचार दिवसापूर्वी एक मुलगा देवळांत आला. त्यान सागितलन् कीं तुझ्या वडिलानीं यजमानापुढ बलिदानाची शपथ घेतली त्यानतर इतक्या वर्षांत देवीला बळी

दिला नाहीं. बळी दिलेल्या त्या घराण्यातील लोकांनीं पळून जाऊन मागमूस लागू दिला नव्हता आम्हाला इतके दिवस. पण इतक्या वर्षांनीं तो माग लागला. त्या हत्याकांडातून एक मुलगी वाचली तिची तसबीर ही पाहा! या बाईचीं दोन मुलं एका गलबतावर आहेत. त्या गलबताचं नाव आहे सायतारा नि त्या मुलाची नांवं आहेत हिंमत नि दौलत. तुमच्या देवीला त्याचे बळी द्या, आणि तुमच्या घराण्याची शपथ पुरी करा!"

सायतारा आणि हिंमत हीं नावं ऐकल्यावर क्षणभर राणीच्याहि मनाचं पाणी झालं. तलावाच्या काठीं उभें राहून बगीचा पाहणाऱ्या त्या उमद्या तरुणाची मूर्ति तिच्या डोळ्यापुढं उभी राहिली. म्हातारीनं ती तसबीर राणीच्या हातीं दिली आणि म्हातारी पुढं म्हणाली, "मीं त्याला सांगितलं, मी झालें आता मरतमढं. त्या मुलांना मारण्याऐवजी मलाच द्या देवीपुढं बळी. पण तो म्हणाला, तुमच्याच्यानं होत नाहीं तर तुमच्या मुलीला सांगा. आणि तसं नाहीं झालं तर शपथ मोडल्याबद्दल तुमच्या मुलीला मिळेल ते देहान्त प्रायश्चित्त तिला घेऊं द्या.

"मुली, तुझे वडील मरताना म्हणाले होते की, हें बळी द्यायचं बंधन घराण्यावर पडलं आहे, आणि माझ्यामागं तुम्हाला तें चालवावं लागेल. ते तोडलं तर दुसरं कुणी आपल्याला देहान्त प्रायश्चित्त देईल.

"मुली! मी सगळा जन्म काढला. आता अशी वेळ आली आहे कीं, माझा पुढचा पाय मृत्यूच्या दारात, तर मागचा पाय या जगांत. मला मृत्यूचं भय उरलं नाहीं, तर जगातल्या कुणाचंच उरलं नसेल हें ओघानंच येतं. मला भय उरलं असेल तर हेंच कीं, दुसऱ्यावर चुकून एखाद् वेळ माझ्या हातनं अन्याय घडायचा, तो सुद्धा घडूं नये इतकी इच्छा.

" मीं तुला हें येऊन सांगितलं सारं येवढ्यापुरतंच, कीं कुणी तुला जिवाची भीति दाखवू लागला तर स्वतःची काळजी घेऊन, स्वसंरक्षण करण्याची तयारी असावी. पण स्वतःचा जीव वाचावा म्हणून दमदाटीला भिऊन तिसऱ्याच निरपराध व्यक्तीची नाहक हत्या करण्याचं पाप करूं नकोस. दुसऱ्या कुणाचा जीव घेऊन तुला जीवदान मिळणं खरं शक्यच नसतं. माणूस जन्मला तो मरणारच, त्याला जीवदान देणं सृष्टीलाहि शक्य नाहीं तर माणसाची काय कथा! तुझ्या जागीं मी असतें, नि मला कुणी भीति दाखवली तर मी म्हणेन मला एकदाच का, तुला शक्य तर दहादासुद्धा मला मार, पण माझ्या हातनं माझ्या सदसद्विवेकबुद्धीला सोडून आणि दुसऱ्याला अन्यायकारक कृत्य काडीमात्र घडणार नाहीं!

" तू माझी मुलगी, मरताना माझ्या आयुष्यांत शिकलेला एवढा धडा मी तुला आयुष्याचं सार म्हणून देत आहे. त्याची किंमत तुझ्या साऱ्या धनदौलतीपेक्षाहि जास्तच भरेल."

इतकं म्हणून म्हातारी आली तितक्या झपाट्यानं परत निघून गेली. तिला थांबवलं असतं तरी ती एक तर थांबली नसती आणि राणीलाहि तिला थांबायला सांगण्याचं भान उरलं नव्हतं.

# १२

समुद्राच्या स्वच्छ पाण्यांत तरण्याची सवय असलेली सायतारा कलकत्त्यांत हुगळीच्या गढूळ कळकट्ट पाण्यात नागरून ठेवल्या-पासून हे बंदरातले दिवस कधीं एकदा संपतात ते मोठ्या औत्सुक्यानं मोजीत असावी. इतकं पाणी घाणेरडं दिसायचं कीं, स्नान करून पापमुक्त होणाऱ्या लक्षावधि भाविकांचीं पापं प्रत्यक्ष पार्थिवरूपानं या प्रवाहाबरोबर वाहत जात असावींत. पण पापं धुऊन टाकण्यासाठीं गंगेचा हा प्रवाह अनंत काल वाहत असल्यानं त्या सोयीनं सोकावलेले लोक नवीन पापं निर्माण करण्याचं व्रतहि अखंड चालू ठेवीत होते.

अशाच्यापैकीच एक पापात्मा सायतारेची शिडी उतरून बोटीच्या बाजूला उभ्या राहिलेल्या एका 'संपान'मधे जाऊन बसला.

संपानवाल्यानं पागार सोडलं, आणि मागचं अगडबंब सुकाणू चक्राकार फिरवीत त्यानंच संपान वल्हवीत नेण्यास सुरुवात केली.

सायतारेपासून हाकेच्या अंतराबाहेर गेल्यावर लखीराम चांचा—म्हणजेच संपानवाल्याच्या वेषात आलेला माणूस– म्हणाला, "काय बनबीर! काय खबरबात?"

" खबर आणली आहे मीं बरीच, पण बात करायला निवान्त जागा हवी."

" तिकडंच मी नेणार आहे तुला."

वर्षानुवर्ष कलकत्ता बंदरात जहाजांची ये-जा चाललेली असल्यानं कलकत्त्याच्या बंदरानजीकच्या विभागात दर्या व दर्यावर्दीच्या अनुषंगानं येणारी एक पेठ वसली होती. 'किदरपूर'च्या गोदीभागाजवळच ही असल्यान खलाशांना मोठी सोईची असे. कलकत्ता शहर विस्तृत असल्यान लांब-रुंद पसरल आहे. त्यातील इतर भाग या सब-गोलंकार पेठेपासून पुष्कळच अलिप्त राहिल्यान तिथल्या वाता वरणात वैशिष्ट्यपूर्ण बंगाली झाक मारते, तर त्या उलट या किदरपूर-जवळच्या विशिष्ट वस्तीवर बंदरोबंदरीं आढळणारा सतरा तऱ्हेच्या लोकांच्या मिश्रणान गिचमिड झालेला गढूळ छाप उठलेला दिसतो.

रस्त्यावर हिंडताना आपल बाकी सर्व शरीर अलिप्त आणि स्वच्छ राहिल, तरी आपलीं पावल जशीं रस्त्यावरच्या असंख्य पददलित धुळींत नि कचऱ्यात लडबडतात, तद्वत् या सर्व बंदरांचं होत असे. जगाला जोडणाऱ्या व्यापाराच्या समुद्रमहामार्गावर हीं बंदर उभीं असल्यामुळ त्या बंदरांचीं हीं पावल या बंदरविभागांत गोळा होणाऱ्या कचऱ्यात नि घाणींत बरबटत. या घाणेरड्या पेठा-कड पाहून त्या बंदरांची रम्यता किंवा वैभव याबद्दल कल्पना बांधण, धुळीन माखलेल्या पावलाकड पाहूनच माणसाच्या चेहऱ्याची कल्पना करण्याइतक चूक ठरेल. आता हेंहि खर, कीं विविधरंगाचीं ठिगळ लावून केलेल्या वाकळीसारख्या या अजब दुनियेंत साऱ्याच बऱ्या-वाईट गोष्टींना जागा असते. त्यामुळ चांगल्याप्रमाण वाईट, उजेडा-बरोबर अंधार, पवित्रपणाबरोबर भ्रष्टाकाराचा चिखल नि देवतुल्य साधुत्वाच्या जोडीस नरकातील किड्यांसारख्या अति नीच नि अत्यंत हलक्या माणसांचा बुजबुजाट, या साऱ्याच गोष्टी आवश्यक असतात; फरक अवलंबून असतो ज्याच्या त्याच्या पसंतीवर. आणि कमानें नि

वासनेन आपल्या सहधर्मीय गोष्टींकड जो तो आपोआप ओढला जाऊन संलग्न होतो.

लखीरामान सपान तीराच्या चिखलावर ओढून काढून पागार तीरावर खोल रोवलेल्या कळकाला बाधल. तो आणि बनबीर रस्त्यावर येऊन चालू लागले. मुख्य रस्ता सोडून एका अरुद बोळांत ते वळले. बोळात घाण म्हणजे मी म्हणत होती. बोळाच्या नि वळणाच्या चक्रव्यूहांतून लखीराम सराइताच्या सुलभतेन रस्ता काढीत होता. आणि बनबीर त्याच्या मागोमाग जातां जाता रस्त्याच्या खाणाखुणा पाहून ठेवीत होता.

शेवटीं एका उच भिंतीमधल्या बंद दरवाजापाशीं ते येऊन पोंचले. दरवाजाजवळ एक लगडा भिकारी अर्धवट वाटेंत आपलीं लक्तर घेऊन लोळत होता. हे दोघे आल्यावर त्यान निजल्यानिजल्याच डोळे किलकिले करून पाहिल. लखीरामाची ओळख पटल्यावर राखण करणाऱ्या त्या भिकाऱ्यान मान हलवली आणि ठीक आहे म्हणून खूण केली. त्याच्या घोगऱ्या खोल हाकेला ओ देऊन कुणी तरी दार उघडल.

घरात गेल्यावर सुद्धा कितीक अधारी दालन नि चौक ओलाडावे लागले. शेवटीं एका चागल्या सजवलेल्या उची दिवाणखान्यात ते आले.

“ बनबीर ! हा पाहिलास माझा कलकत्त्यातील अभेद्य किल्ला. इथं कुणा अनोळखी माणसाचा प्रवेश कधीं होण शक्य नाही. सुदरबनातील आमच्या ठिकाणाइतकं, इथं आमच निर्वेध राज्य आहे. कितीहि इथ ओरडल कुणी, तरी चुकून बाहेर कुठ ऐकू जाणार नाही. आता खुशाल साग मोकळेपणान सारी हकीगत.”

सायतारेवर बनबीर येण्याच्या अगोदर गगासागराजवळ जो चांचा त्याच्याशीं बोलत उभा होता तोच हा ‘लखीराम चाचा’. हा अतिशय धाडसी, पाताळयंत्री व शूर होता. अदमान ते कलकत्ता आणि रगून या

समुद्राच्या भागात चाचेगिरी मोठया प्रमाणावर सुरू करण्याची त्याची महत्त्वाकांक्षा होती. त्यासाठी त्यानं बदरोबदरीं आपले हस्तक नेमले होते. चाचेगिरी करण्यासाठी तशाच वृत्तीचे दर्यावर्दी त्यान निवडून ठिकठिकाणाहून जमविले होते, आणि खूप वेगान जाणारीं गलबत त्याला हवीं होतीं. इतर व्यापारी गलबताचा पाठलाग करावयाचा किंवा सरकारी गलबत कधी पारिपत्य करण्यासाठीं उद्युक्त झाली तर त्यांच्या हातावर तुरी द्यावयाच्या, यासाठीं जितक जास्त सुबक नि घाटदार बाधणीच चपळ गलबत मिळेल तितक लखीरामाला हव होतं. 'सायतारा' जणू आपल्या इच्छेनुरूप बाधवावी इतकी योग्य होती. आता फक्त मालकीचाच प्रश्न. तो सोडवायला लखीरामाजवळ चाचेगिरीचं कसब भरपूर होत.

बनबीरान आपण सायतारेवर कसा प्रवेश मिळविला इत्यादि वर्णन इत्थभूत सांगितल.

" माझा माणूस सायतारेवर शेवटीं भेटला कीं नाहीं ? "

" हो ! भेटला तर. तो कप्तानाला व त्याच्या मुलाना जेवणखाण आणीत असे, नि त्याचीं वरकड काम करी. त्याची नि माझी त्या खुणेबरहुकूम ओळख पटल्यावर आम्हीं दोघानीं मिळून जहाज कलकत्त्यास पोचेपर्यंत अगदीं बारीक लक्ष ठेवल होतं. मी खलाशी, सारग नि तांडेल याच्याबरोबर राहत नि काम करीत होतों. त्याच्या पोटात शिरून मी बातमी काढी, तर तो छोकरा कप्तानावर नि मुलावर आणि त्याच्या बरोबर असलेल्या तिघां पाव्हण्यावर नजर ठेवी."

" मग तुम्हीं दोघानी काय हेरल ! "

" तो कप्तान अतिशय पारगत आहे आपल्या कामात. त्याला आपल्या बोटीची खडान्‌खडा माहिती आहे. तो असेपर्यंत त्याचं गलबत पळवण अवघड आहे ! पण सार काम तो आपल्या मुलांवर सोपवतो, आणि त्या मुलात आहे फूट. दौलत म्हणून आहे त्याला

त्याच्या भावाच वाटत फार वैषम्य आणि सदा ते दोघ भाडत असतात. बोटीवर भेद करायचा तर हेच मर्मस्थान."

"छान! बनवीर, तुझ्यात चाचेगिरीच कसब जन्मतःच दिसतंय्; माझ्या हाताखालीं तयार व्हायला तुला वेळ लागणार नाही."

या शाबासकीन फुशारून बनवीर पुढ सागू लागला—

"पण या गोष्टीपेक्षाहि आणखी काहीं मौज आहे. त्या छोकऱ्यान हिंमत नावाचा कप्तानाचा मुलगा आहे त्याच्या खोलींतून एक तस बीर पळवली होती. ती का पळवली असं बोलण निघाल तेव्हा त्यान दाराआड उभ राहून त्याच्या पाहुण्याबाईन सागितलेली लाबलचक हकीगत ऐकिली ती मला सुनवली. तो आणखीन् म्हणाला, अशीं जुनीं काळींबेरीं प्रकरण नेहमी ऐकून ठेवीत जा, नि मला कळवीत जा अस तुम्ही त्या सर्वांना बजावलेल आहे."

"बरोबर सागितलन् त्यान. मी आहे चाचा, कुणाची लांडी-लबाडी मला ठाऊक असली म्हणजे सोईच पडत. मी त्याचा मला योग्य तो उपयोग करून घेतो."

"आता त्या हकीगतीच्या आधारान इथ गांवात चौकशी करावी म्हणजे काहीं जास्ती माहिती उपलब्ध होईल अस मला वाटतं. माझी सूचना अशी आहे की— "

लखीरामन त्याला अर्ध्या वाक्यातच थाबवून म्हटल.

"तू सूचना करण्यापूर्वीच मला ती गोष्ट सुचली आहे. इतकच नव्हे तर, त्या बाबतींत माझ्या हुकमाची अमलबजावणीहि झाली आहे. बनबीर, सूचनाच नाव काढू नको. तुम्ही कोणीहि सुचविलेल्या गोष्टीत, माझ्या नजरेतून अगोदर सुटलेल्या असतील अशा गोष्टी सापडण विरळा."

बनबीर जरा खट्टू झाला. "मी सहज सुचवीत होतों."

"छे. मला सूचनाची गरज नाहीं. बनबीर! हेंहि लक्षात घे, कीं हुकमत माझी आहे. तुझं काम हुकमाची तामिली करण्याच आहे."

लखीराम एकदम उसळून म्हणाला. आपल्यापेक्षा जास्त हुशारी कोणी दाखवू लागला तर त्याचा जळफळाट होई. आणि आपल्या वर्चस्वास धक्का लागू नये म्हणून कुणाचीहि पत्रास न ठेवता तो लागलीच कानउघाडणी करी. पण फिरून तो शात होऊन बनबीरला म्हणतो, "तुला चाचा व्हायच आहे ना ? मग हुकमत बिनबोभाट पाळण्याच शीक अगोदर, हुकमत गाजवायची कशी ते मग तुला आपोआप समजेल !"

लखीरामान पुकारल्यावर एक बुढ्ढा आत आला.

"या बनबीरला घेऊन जा. त्याला जेवणखाण दे आणि त्याला जरा दारूचीहि लज्जत चाखव. डोक फिरण्याइतकी नको देऊ. आणि तूं बुढ्ढा असलास तरी बनबीर तरणाताठा आहे हे विसरू नको. त्याला काय हव नको पाहा. जिवाची चैन करूं दे त्याला दोन दिवस. मग पुन्हा काम आहेत त्याला पुढ फार."

बनबीर गेल्यावर लखीराम कोचावर लवडला. काहीं वेळ आढ्या कड पाहत विचार करीत तो पडला. त्यान त्याच्या हेराचं एक मोठ जाळं पसरल होत. त्याच्याकडून ठिकठिकाणची बातमी तो गोळा करी. आपल्या जाळ्याच्या मध्यावर बसून लाबवर पसरलेल्या त्या तंतूंन कुठ कोणत भक्ष्य गुरफटत त्याची वाट पाहणाऱ्या कोळ्यासारखा हा लखीराम चाचा दिसत होता.

लखीरामाच्या तोडावर स्मित दिसू लागल. त्यान संपानवाल्याचा वेष उतरून दुसरा साधा असा एखाद्या खलाशाचा वेष चढवला. सपानवाल्याच्या वेषान त्यान जाऊन सायंतारेची जवळून बारकाईन टेहळणी केली होती. आता त्याला निराळं काम करायचं होत.

या घराचा विस्तार फारच वाकडातिकडा नि मोठा असल्यामुळ त्याला चार निरनिराळ्या रस्त्यावर तोंड होतीं. त्यापैकीं एका रस्त्यावरच्या बाजूला दारूचा गुत्ता होता. त्यात दर्यावर्दी लोकाची नेहमीं गर्दी असे. तिथ येणाऱ्या खलाशाच्या जिभा मदिरेन सैल सुटल्यावर त्यांच्या

तोंडून त्याच्या जहाजांबद्दल अघळपघळ माहिती बाहेर पडे. कोणतं जहाज कुठून आलं, त्याचा कप्तान कोण व अधिकारी कसे आहेत, कोणता माल त्यांनीं आणला, कोणता नेणार, जहाज केव्हां निघणार नि कुठं कुठं जाणार, त्यावर उतारू कोण आहेत अशी सारी चर्चा चाले. गुत्ता जरी खरा लखीरामाचा असला तरी त्याची माहिती कुणालाच नसे. त्याचा एक हस्तकच मालक म्हणून तो चालवी. त्याचे आणि तिथं काम करणाऱ्या नौकराचे कान मोठे तिखट असत. सगळं ऐकून हर-एक बातमी ते लखीरामाला कळवीत.

लखीराम एका खोलींत गेला. त्यानं कोपऱ्यात जाऊन एक लाकडाची सरकती फळी बाजूला सारली आणि त्यामधून दिसणाऱ्या गुत्त्यामधें त्यान नीट न्याहाळून पाहिलं.

गुत्ता एका प्रशस्त दालनात होता. त्यामधें जागजागीं बसायला बाकं नि त्यासमोर टेबलं ठेवलीं होतीं. टेबलं कळकट झालीं होतीं. त्यांवर मदिरापात्राच्या बुडाची गोल वर्तुळं नि ओघळलेल्या मदिरेचीं वाळून एकावर एक पुटं बसलेलीं होतीं. खालची फरशीसुद्धां कधीं धुतलेली दिसत नव्हती, तिच्यावर वारंवार दारू सांडे किंवा दारू अति प्यालेला एखादा खलाशी ओके. झिंगून खुर्चीवर बसण्याइतका किंवा उभें राहण्याइतका तोल संभाळता येईनासा झाल्यावर खालच्या फरशीवरच तो बहुतेक लोळण घेई. ओढलेल्या तंबाखूचा धूर तिथं सावकाश रेंगाळत राही, त्यानं हवा कुंद झाली होती. दारूचा नि धुराचा वास इतर अनेक तऱ्हेच्या वासांबरोबर मिसळून तिथं एक एक चमत्कारिक घाण येत होती—घाण सवय नसलेल्याला—सराइताला बहुतेक सुगंधहि वाटत असेल. टेबलाभोंवतीं चार-पाच ठिकाणीं विभागून देशी, परदेशी दर्यावर्दी मदिरापान करीत गप्पा छाटीत बसलेले होते. गुत्त्याच्या एका भिंतीजवळ कपाटांची नि शेल्फांची मांडणी करून त्यावर अनेक तऱ्हेच्या दारूच्या बाटल्यांची आरासच केली होती. त्याशिवाय एक आडवं पीपहि तोटी बसवून हाताशीं

ठेवलेल होतं. या कपाटांच्या पुढ नि पुढच्या छातीभर उच्च कठडे-वजा अर्धचद्राकृति टेबलाच्या मधल्या बोळकडींत त्या गुत्त्याचा मालक म्हणून ओळखला जाणारा माणूस वावरत होता. नर्मदेंत राहून कोरड्या राहणाऱ्या गोट्याप्रमाण त्या मदिरेच्या पाणपोईत झिंगलेल्या गिऱ्हाइकाच्या गर्दीत हा आणि त्याचा मदतनीस मात्र परिपूर्ण शुद्धीवर होते.

गुत्त्याच्या दरवाजात एक रिक्शा येऊन उभी राहिली आणि तींतून दौलत खालीं उतरला. रिक्शावालासुद्धा लखीरामाच्या टोळी-पैकीं असल्यानं तो धक्क्याजवळ रेंगाळतच होता. दौलत किनाऱ्यावर उतरल्याबरोबर ही रिक्शा जवळ मिळत असल्यानं तींत बसण ओघानच येत होत. दौलत अपेक्षेप्रमाण बसल्यावर 'दारूचं दुकान' म्हटल्या-बरोबर रिक्शावाल्यान सरळ या लखीरामाच्या गुत्त्यावर त्याला आणलं.

दौलत येऊन बसून थोडा वेळ होतो न होतो तों, लखीराम एखाद्या तिऱ्हाइताप्रमाणं रस्त्यावरच्या दारान गुत्त्यात शिरला नि एका मेजाशीं बसून त्यान दारू मागवली.

मधल्या एका टेबलापाशीं एक आडदांड खलाशी बसला होता. त्यानं पुष्कळच झोकली असावी. त्याचे डोळे तारवटले होते आणि त्यानं भाडकुदळपणा सुरू केला होता. तो दौलतच्या टेबलापाशीं जाऊन म्हणतो, "काय रे! माझ्या टेबलावर कसा बसलास येऊन तूं? ऊठ-ऊठ. दुसऱ्या टेबलाशीं जाऊन बस. इथ मला बसायच आहे."

दौलतनं त्याच्याकड दुर्लक्ष केल.

"ए गद्धा! तुला ऐकू येतंय् का नाहीं? मी तुझ्याशीं बोलतों आहे—मी तुझा काका तुला सागतोंय् ना ऊठ म्हणून? लहान कार्ट्यांनीं मोठ्याचं ऐकावं." तो टेबलावर रेलून दौलत समोर उभा राहिला.

"का रे! फार झाली का दारू? सोसत नाहीं तर प्यावी

कशाला इतकी ? जा परत जाऊन झोप तुझ्या बोटीवर." दौलतन सरळपणान सांगितल.

पण त्या धटिंगणाला भांडण उकरायची हुक्कीच आलेली होती. त्यानं दौलतच्या पुढचा मद्याचा पेला उचलून त्यांतल मद्य दौलतच्या चेहऱ्यावर फेकल.

गुत्त्यातील इतर लोक वळून या सुरू होणाऱ्या झोंबीकडं पाहूं लागले. अशी मारामारी पाहायला कुणाला नाहीं आवडत ? त्यांनीं दोघांना प्रोत्साहन देण्यास सुरुवात केली. "काय रे ! तू सारा अपमान सोसणार का ? हात दाखव त्या दारुड्याला ! लोळव त्याला !" काहींनीं दौलतला म्हटल, तर दुसऱ्यांनीं त्या धटिंगणाला, "का राव ! तुम्हाला भीक नाहीं ना घालीत तें येवढसं पोर ! थूः, थूः लेका तुझ्यावर, बांगड्या तरी भर हातात !"

दौलतची इच्छा नव्हती तरी त्याची त्या धटिंगणाशी झोंबी जुंपली. त्या धटिंगणान दौलतला उचलून मेजावर आडवा घातला, त्याला ठोसे लगावले आणि दौलतची कचत्ती भरण्याची वेळ आली. बाकीचे लोक भोंवतालीं कोंडाळ करून गमत पाहत होते, त्यांना बाजूला ढकलून लखीराम आत शिरला. त्यान त्या धटिंगणाच्या खांद्याला धरून त्याला आपल्याकडे खेंचल आणि मुठीन त्याच्या नाकावर ठस्सदिशीं ठोसा मारला. आश्चर्यचकित झालेल्या त्या धटिंगणाला त्यान लागलीच पाठीवर उचलून त्याचा मोधळा धप्प-दिशीं फरशीवर आपटला. आणि नंतर लाथेन त्याच्या चेहऱ्यावर, पोटांत, कुशींत इतक्या ठोकरा मारल्या, कीं बैल मरून पडावा तद्वत् तो धटिंगण बेशुद्ध होऊन निश्चेष्ट खालीं पडला.

"चांगल्या अधिकारी लोकांच्या वाटे गेल्यानं काय होतं त्याचा धडा शिकूं दे या बैलाला !" लखीराम म्हणाला, आणि त्याच टेबलाशीं बसून ओरडला, "थोड्या व्यायामानं माझी तहान वाढलीच आहे जास्त. आण रे आणखी थोडी दारू,"–आणि भोंवतालच्या

स्तभित होऊन चूप बसलेल्या लोकांना उद्देशून खेकसून ओरडला, "काय? आणखी कुणाची इच्छा आहे का कुस्ती करायची?—नसली तर मुकाट्यान बसा कीं जरा!"

दौलतला मोठं हायसं झाल होतं. नाही तर आज सुरुवातीसच मार खाऊन पडायची वेळ आली होती. ती या माणसामुळ टळल्यानं उपकृत, आणखी त्याखेरीज ज्या सफाईन त्यान त्या धटिंगणाला जमीनदोस्त केल त्या डावपेचान दौलत चाकित झाला होता. तोहि तिथच्च खालीं बसला नि म्हणाला, "खूपच मदत केलीत तुम्हीं. दारू तुम्ही नका मागवू, तें काम माझ्याकड लागल."

"अंः! त्यांत काय विशेष केल मीं! मीहि दर्यावर्दी अधिकारीच आहे पेशानं. आपल्या एखाद्या भाईला मदत नाहीं करायची अड-चणींत तर मग काय उपयोग? या गुंडांना मी पक्का ओळखून आहे. यांना उठता लाथ नि बसतां बुक्की हवी." इतक्यांत पुढ आणून ठेविलेला दारूचा ग्लास डाव्या हातान उचलून लखीराम उद्गारला, "लेकिन यार! अब वो बात छोड दो. चलो, हाथ मिलाव यहा." आणि दौलतन उत्सुकतेन पुढं केलेला हात पकडून त्याशीं हस्तांदोलन करून आपली गट्टी जमल्याची खात्री पटाविली. त्यानतर तास कसे गेले हें कळल सुद्धा नाहीं. लखीरामासारखा बलिष्ठ दोस्त मिळाल्यान दौलतला जणू काहीं आतां कुठ भय उरलं नाहीं अस वाटत होत, आणि त्यानीं दोघानीं अगदीं चादरात साजरी केली.

शेवटीं मदिरापान थांबल तेव्हा शिंदीच्या उघड्या पिपात पडून भिजलेल्या गोणपाटाच्या तुकड्याप्रमाणं दौलत दारून ओथबल्या-सारखा झाला होता; तरी त्याला आधार देत त्याला गाडींत घालून सायतारेच्या शिडीपर्यंत पोंचवायला गेलेला नि त्याचा जानीदोस्त बनलेला लखीराम दौलतच्या बरोबरीनं दारू पिऊन सुद्धा जणू काहीं नुसत पाणीच प्याव इतक्या पूर्ण शुद्धींत नि इतक्या मजबूत सरळ चालीन चालत होता.

दुसऱ्या व तिसऱ्या दिवशीं संध्याकाळीं दौलत आपण होऊन लखीरामला भेटायला आला. थोड्या वेळांत नि दाट जानपछान करून देणार मद्यासारख दुसर माध्यम काहींच नसेल!

"दोस्त! आता आज दुसरा बेत. आज दारूची सुरुवात इतक्यात नाहीं. माझ्या मागच्या बोटीवरनं निघाल्यापासून मीं तीन आठवडे कशी चैन केली त्याचा मासला तुला दाखवणार आहे." लखीराम म्हणाला, आणि दौलतला घेऊन तो गुत्त्यांतून निघून दुसऱ्या एका घरात शिरला.

घरातल्या एका दालनात गेल्यावर एका मध्यम वयाच्या स्त्रीनं त्यांच आगतस्वागत केल. हे दालन अतिशय विलासी पद्धतीन सजविलेल होत. खालीं उंची गालिचे आणि त्यावर कोच ठेवलेलीं होतीं. उजेड मंद नि भिंतींवर परावर्तित होऊन आल्यान त्यात एक प्रकारचा मादकपणा उत्पन्न होत होता. भिंतींवर मोठमोठाले पुरुषभर उंचीचे बिलोरी आरसे होते, त्यात या दिवाणखान्यातील व्यक्तींचीं अनेक बाजून प्रतिबिंब नि पुनः प्रतिबिंबांचीं आणखी प्रतिबिंबं दिसत. दारावर नि खिडक्यावर किनखापाचे भरगच्च नि पायघोळ पडदे लोंबत होते. भिंतीच्या अगदीं वर नि छताला लागून चोहों बाजूंनीं एक हातभर रुंदीची पट्टी होती. तिच्यावर एका विलासी राजपुत्राचे रंगढंग लज्जेचा यत्किंचितहि आडपडदा न ठेवता पण कौशल्यपूर्ण कुंचल्यान एका दीर्घ चित्रमालिकेन रंगविलेले होते.

दौलत बंदरोबंदरीं हिंडला होता, पण रंगाढंगांची इतकी बेफाम सोय त्यान कुठंच पाहिली नव्हती.

"आम्हांला अगदीं सुंदर जेवण नि त्याबरोबर थोडं मद्यहि हवं आहे." लखीराम त्या स्त्रीला म्हणाला, "येवढंच नव्हे तर आमच्या सोबतीसाठींहि कुणी पाहा मिळतय् का!" नंतर खिशांतून बचक भरून नाणीं काढून त्या स्त्रीच्या हातावर ठेवून तो म्हणाला, "हां, आता जास्त मागू नको अं. शंभराच्या आसपास आहे त्याचा आंकडा;

थोडा जास्त किंवा कमी. सावकाश मग मोज. मी फसवीत नसतों कधीं. पण माझ्याजवळ त्यापेक्षा जास्त कपर्दिकहि नाहीं. तेव्हा मागितलस तरी मिळणार नाहीं आणखी. आज विलासी बादशहा नि उद्याला भणग भिकारी!"

ती स्त्री लखीरामाला ओळखीत असावी. तिन मोजण्याच्या भरीस न पडता नाणीं स्वीकारलीं आणि ती तेथून गेली.

दौलतन राजपुत्राच्या विलासाच्या चित्रमालिकेची अधाशी दृष्टीन पाहणी सुरू केली, आणि ती पाहून सपते न संपते तों त्याच्या कानावर मधुर हास्याचा खळखळाट, नूपुर नि पैजणाची रुमझुम व गोड आवाजाचा किलबिलाट ऐकू आला. उंची आणि मद पण अतिशय मनोहर सुगध दरवळल्याचा वास आला. पण जेव्हा दौलत त्या बाजूला वळला तेव्हा त्याला आपण स्वप्नात आहों कीं जागे आहो याची भ्रात पडली असावी.: पाच-सहा सुदर नि नग्न गौरागना हातांत मद्याचे कलश, वाद्यें, नि खाद्यपदार्थ घेऊन आत आल्या!

जन्मून या जगात येताना त्याच्या अगावर असतील तितकींच वस्त्रे आणि मनाला वाटत असेल तितपतच लाज आतासुद्धा इतक्या तरुणपणात त्याना वाटत असावी. त्यानीं दौलतभोवतीं गराडा घातला. दौलत क्षणभरच बावरला आणि मग जणूं काहीं फार जुन्या परिचयाची संगत भेटावी अशा मोकळेपणान तो बोलू लागला.

एकीन विचारल, "तुम्ही काल-परवा कां नाहीं आला?"

"माझ्याजवळ पुरेशी माया नव्हती." लखीराम मधेच म्हणाला. "आज होती नव्हती ती सारी फुकून टाकली, नि या माझ्या मित्रालाहि आणला ओळख करून देण्यासाठीं."

"मग उद्याला?"

"उद्याच उद्या पाहू! मिळेल कुठल्या तरी जहाजावर मला काम–" लखीराम, उद्गारला.

" वा: यार! असा आपपरभाव का ठेवतोस? माझ्या 'सायं-तारे'वरच तुला मी घेईन. मी जाईन तिथच तू!" दौलतनं मोठेपणानं वचन दिल.

" मग माझा प्रश्नच मिटला. आतां कसलीच फिकीर नाहीं." लखीराम समाधानपूर्वक म्हणाला.

तें चमचमीत जेवण, नसातून सळसळत डोक्याशीं जाऊन भिड-णाऱ्या जुन्या मद्याचे घोट, धुद होत जाणाऱ्या दृष्टीपुढं मोहक आविर्भाव नि अंगविक्षेप करीत नाचणाऱ्या सुगात्री, त्याच्या चेष्टेचा नि हास्याचा उत्तेजक ध्वनि, आणि बेहोष करणारा स्पर्श याच्या उसळणाऱ्या लाटावर तरगत दौलत इतका उंच हवेंत फेकला गेला होता, की तिथून मूर्खांचा स्वर्ग सारा दोन बोट, तर सुविचाराची मनोभूमि फार खालीं दूरवर राहिली होती. लखीरामान आपलं सावज पुरं जाळयात अडकल अस पाहून काढता पाय घेतला, नि दौलत—!

जगात अचबा वाटणारे अनेक प्रकार चालतात, पण आपल्याला त्या बाजूला जायचच नाहीं तर कशाला तिकडे लक्ष द्या? वाचक! निलाजऱ्यानीं लाज सोडली, तरी आपल्या डोळयांवर कातडं ओढणं आपल्याच हातीं असत, नाहीं का? तेंच आपण करू.

# १३

राणीच्या अत्याग्रहाच्या निमत्रणाला मान देण्यासाठीं म्हणून जिजी आणि मुकुल दोघींहि राणीच्या घरीं राहण्यास आल्या. आपल्या व्यापार-व्यवहाराच्या सबधांखेरीज, आपल्या घरच्या बायका-माणसाचा राणीसारख्या श्रीमत व्यक्तीशीं जास्त परिचय वाढला तर बरच, त्याचा केव्हां ना केव्हा उपयोग होईल असं दूरदर्शी धोरण चंद्रदत्तानीं अगीकारल होत.

राणीच्या घरची सघनता, धान्यधुन्याची विपुलता, गाडीघोडा, गाईम्हशींचा मोठा गोठा, नि दूधदुभत्याची रेलचेल, जमीनजुमला, वस्त्राभरण नि दागिने, नोकरचाकर व कुळबिणी इत्यादि ऐश्वर्यान जिजीचे डोळे पार दिपून गेले. पाहुण्याची बरदास्त राणीन मोठी ऐटबाज ठेवली होती, आणि दिमतीला चाकरमाणस दिलीं होतीं. बहुतेक जन्म दुसऱ्याच्या खस्ता खात काढलेल्या, नि सर्वसाधारण मध्यम स्थितीच्या कुटुंबात राहिल्यान ऐषआरामाची चव कधीं पाहावयास न मिळालेल्या जिजीला या पाहुणचाराच्या ओझ्यान अगदीं पार मिंध केलं. तिला राणीबद्दल मोठ कौतुक वाटू लागल, तिच्याबद्दल फारच छान मत झाल्याचं जिजी असदिग्ध भाषेंत बोलून दाखवूं लागली. अगोदर ऐश्वर्याचा मोह पडत नाहीं अशा स्त्रिया

फार फारच विरळा! आणि त्यांत जिजीसारख्या गरीबींत जन्म काढलेल्या म्हाताऱ्या स्त्रियांना तर, असं ऐश्वर्य डोळयान जवळून पाहण्यांत फारच धन्यता वाटते. ऐश्वर्यवन्ताच्या ठिकाणीं जणू आपणच आहों अशी बुद्धि धरून त्या मोहमय ऐश्वर्याचा उपभोग दृष्टीनं नि कल्पनेनं घेऊन दुधाची तहान ताकावर, येवढंच नव्हे तर पाण्यात कालवलेल्या पिठावरसुद्धा, भागवण्याची त्याची प्रवृत्ति असते.

तरी पण तरुणींच्या उमलणाऱ्या मनांत एक मात्र अमोलिक वेळ अशी येऊन जाते, कीं त्या वेळीं जगरहाटीच्या विषगर्भ संसर्गापासून अलिप्त, नि अप्रबुद्ध पण पूर्ण निष्पाप असलेल्या त्यांच्या मनाची ओढ निसर्गसुलभतेनं प्रेम आणि गुण याच्याचकडे फक्त असते. त्या वेळीं प्रेम हेंच ध्येय, भावनाचं माहेर आणि जीविताचं सारसर्वस्व त्याना वाटत असतं. या आणीबाणीच्या कालांत तरुणी त्या प्रेमगुणाच्या पूर्णतेसाठीं सार यच्चयावत् विश्व फुकून टाकण्याला तयार असते. भल्या पहाटे फुलं उमलतात तेव्हां त्याची पहिली ओढ स्वर्गातून अवतरणाऱ्या दीप्तिमान् सहस्रकराकडं असते. पण ती वेळ टळून गेल्यावर मग त्या दिवसभराच्या उरलेल्या आयुष्यात शेवटीं कोमेजून जाण्यापूर्वीं ती फुल देवपण नसलेल्या मूर्तीवर, माणुसकी नसलेल्या माणसावर, स्त्रीच्या स्वर्गीय गुणाची विटंबना करणाऱ्या वेश्येवर, किंवा मनुष्यजन्माचा बुडबुडा आपल्या निश्चेष्टपणानंच फोडणाऱ्या मढ्यावर वाहिलीं जातात ना?

त्या देवतापदाला शोभणाऱ्या प्रेमाभिमुख, निर्व्याज मनःस्थितींत या वेळीं मुकुल होती. हिंमतच्या सद्गुणांवर लुब्ध झाल्यान तिला जगांतल्या इतर कशाचाहि मोह पडत नव्हता. राणीच्या ऐश्वर्याकडं पाहायला तिच्या चित्ताला अवसर नव्हता. तिच सारं मन प्रेममय झाल होत; आणि होकायंत्राची दिग्दर्शिका जितक्या अगतिकतेनं नि निश्चयान उत्तर ध्रुवाकड खेचली जाते, तितक्याच आवेगान मुकुल हिंमतकडे आकर्षिली जात होती.

अशा तिच्या मनःस्थितींत जिजी तिला एकीकड म्हणाली,

"मुकुल! तुझ्यासाठीं अगदीं स्थळ पण स्थळ मिळाल आहे. चद्रदत्ताच्या इतक्या ओळखीपाळखी आहेत त्यामुळ चद्दिशीं त्यानीं तुझ्यासाठी सुदर नवरा शोधून काढला देखील. या राणीच्यासारखा थाट होईल आमच्या मुकुलच्या सासरीं, आणि त्याशिवाय नवरा तरणाबाड आहे ती गोष्ट वेगळीच!"

जिजीचा सारा उत्साह पालथ्या घागरीवर पडला.

"अग, मी लग्नाबद्दलच्या गोष्टी बोलत आहे. इतका सुतकी चेहरा का तुझा?"

"कुणाच्या लग्नाबद्दलच्या?"

"कुणाच्या—? कान्होजीरावाच्या नाहीं, चद्रदत्ताच्या नाहीं, नि माझ्याहि नाहीं. लग्न दुसऱ्या कुणाचं?"

"हिंमतच कीं काय मग?"

"छेः, तो चांगला मुलगा आहे स्वतत्र. त्याचं पाहील तो."

"मी सुद्धां मुलासारखीच वाढलें आहे आजवर."

"पण तू मुलगी आहेस बाई! तुला स्वतत्रता नाहीं."

"नसली तर आजपासून मी ती घेईन."

"मुकुल! तुझ्या म्हणण्याचा अर्थ काय, मला नाहीं समजत."

"हें बघ, सरळच सागतें तुला जिजी! मला दुसऱ्या कुणाशीं लग्न करायचं नाहीं. मी हिंमतशींच लग्न करणार आहे."

या स्पष्टवक्तेपणान जिजी क्षणभर स्तिमित झाली. मग पुन्हा ती म्हणते, "हें चद्रदत्ताना सागशील का?"

"हो. त्यानाच काय पण साऱ्या जगाला शक्य तितक्या लवकर मोठ्यानं ओरडून सांगावंसं वाटतंय् मला!"

"शाब्बास! म्हणजे अगदीं नलदमयतीचा प्रकार वाटतं?" जिजी कुत्सितपणानं म्हणते, "मला वाटतं त्या गोष्टी फक्त पुराणांतच असत."

कुत्सितपणाचा तो वाग्बाण मुकुलला मुळींच लागला नाहीं. क्षणभरान जिजी फिरून बोलू लागली, "काय ग मुकुल! हें सगळ केव्हां ठरल? सफरीमधे का? मोकळीक मिळाली तिचा छान फायदा घेतलास!"

"तस कांहीं ठरल नाहीं."

"तें कस काय? हिंमत का दौलत असा प्रश्न उभा राहिला वाटतं?"

"दौलत! उः! त्याच्याशीं प्राण गेला तरी नाहीं लग्न करायची मी."

त्याच्या बोलण्याच्या भरात दौलत तिथ येऊन उभा राहिलेला त्याना कळला सुद्धा नाहीं. तो सगळ बोलण ऐकत होता. तो आता एकदम उद्गारला, "छे, छे मुकुल! लग्नासारख्या क्षुल्लक गोष्टी-साठीं येवढी प्राण देण्याची भाषा कशाला ग? आणि माझ्याबद्दल विचारशील तर तुझ्यासारख्या मूर्ख मुलीशीं लग्न करण्यासाठीं प्राण तर राहू देत, पण चार छदाम सुद्धा मी देणार नाहीं. अग, त्याच चार छदामात मला कितीक गोष्टी विकत मिळतात. हव कुणाला तें लग्न. दूध विकत मिळत असताना म्हैस बाळगायची ब्याद हवी कशाला माग!" इतक म्हणून आपल्याशींच खदखदून हसत दौलत तिथून निसटला.

राणीच्या बोलावण्यावरून सध्याकाळीं जेवायला म्हणून चद्रदत्त, कान्होजीराव, हिंमत नि दौलत असे सर्वच राणीकडे यायचे होते. दौलतचा ओढा लखीराम चांच्यान दाखवलेल्या चैनबाजीकड लागला होता. या घरच्या वातावरणाच्या मिळमिळीत साधेपणाची त्याला शिक्षाच वाटत होती. केव्हा एकदा हें जेवण संपत नि आपली येथून सुटका होऊन, केव्हां आपल्या नवपरिचित मित्राकडं आपल्याला जायला मिळत अस दौलतला झाल होत.

जिजीला समुद्रावरच आयुष्य कसं असत याची चांगली कल्पना होती. मेघनेबरोबर ती सायतारेवर बरीच हिंडली होती. तिला त्या आयुष्याची चव पुन्हा पाहण्याची मुळींच उत्सुकता नव्हती. येवढच नव्हे तर, मुकुलनहि या दर्यावर्दी लोकांशी जन्माची गाठ बाधून घेण्याचा मूर्खपणा करूं नये अस तिला वाटू लागल होत. 'हिमत किंवा दौलतशीं तुझं लग्न झाल तर काय झाल?' अस आपणच पूर्वी जहाजावर मुकुलला म्हटल्याच तिला आठवलं, पण ते बोलण आपल तोंडदेखल होतं अशी तिची समजुत आणि आतां—विशेषतः कलकत्त्याला येवढ श्रीमंत जमीनदाराचं स्थळ मिळत असतांना हिंमत-दौलतमधे घोटाळायची बुद्धि म्हणजे तिला मूर्खपणाची परमावधि वाटली.

जिजी एकदा कशाबद्दलहि बोलू लागली म्हणजे काय, कुठें, किती नि कुणासमोर बोलावं या सुभाषणी-पणाच्या चतुःसीमेंतून ती तेव्हांच बाहेर भरकटे. हिंमतशीं लग्न करण्याची मुकुलची इच्छा आणि त्याची युक्तायुक्तता याबद्दल जिजीन मोठ्या विश्वासान राणीजवळहि खूप भाष्य केल. आणि राणीनं तर मोठ्या औत्सुक्यानं कान टवकारले. हिंमतबद्दलची मुकुलची दृष्टि राणीला खुपू लागली. आपल्या मनांत उत्पन्न होणाऱ्या भावनेला मुकुल प्रतिस्पर्धी होणार या गोष्टीनं राणी-च्या मनात मोठ शल्य डाचूं लागल. आपण मुकुलपेक्षा नक्कीच जास्त श्रेष्ठ आहों, आपल्यामाग सपत्तीचा जोर आहे. अशा स्थितींत आपल्या मनांत भरलेली व्यक्ति मुकुलसारख्या मिरमुटल्या पोरीन आपल्या डोळ्यादेखत पळवावी म्हणजे काय! राणीला जणूं काहीं हें एक आव्हानच होतं. राणीचा स्वभावच असा होता, कीं आव्हान म्हटलं कीं तिनं स्वीकारल नाहीं तरच नवल! तिन तें लागलीच स्वीकारलं, इतकच नाहीं, तर तिन आपल्या कारस्थानांना त्याच क्षणी सुरु-वात केली.

*　　　*　　　*

चंद्रदत्त कान्होजीरावाना म्हणाले, "या मुकुलनं हिंमतशीं लग्न करायच वेड घेतल आहे डोक्यात."

"वेड! शहाणपण म्हणण जास्त सयुक्तिक. मी माझ्या मुलाची कशाला स्तुति करू; पण तिन हिंमतची निवड केलीन् यातच मुकुलच्या शहाणपणाची खरी परीक्षा झाली असं मला वाटत."

चद्रदत्ताना वाटल, आपण नि कान्होजीराव केवढेहि स्नेही असलों तरी, आपल्या अपत्याच्या प्रेमान नि अभिमानान वाद घालू लागलों तर तो काहीं चटकन् सपणार नाहीं. ते जरा समजावणीच्या स्वरानं म्हणाले, "हिंमत आहेच तसा लाख मुलगा. पण हें समुद्रावरचं भटकण आहे ना! हा भटकणार बोटीबरोबर वर्षानुवर्ष, नि मुकुलनं काय एकट घरीं आकाशातले तारे मोजीत बसायच!"

"तिनं राहाव समुद्रावर. माझी बायको नव्हती का राहिली?"

"छेः! भलतच! समुद्रावरच हें भटक आयुष्य बायकाना मानवणार नाहीं. स्त्रियाच्या आयुष्यातला घर हा शब्द काढून घेतलात तर त्यात जगण्यासारख फारच थोड बाकी उरेल."

"ही झाली घरकोंबड्याची व्याख्या!" कान्होजीराव आवेशान म्हणाले, "समुद्रसचाराच्या बाबतींत पहिल्यापासूनच तुमच्यासारख्या भूचरानीं स्त्रियाना माग ठेवल, नि त्यामुळच खलाशाच्या जन्माच भरसमुद्रावर राहून वाळवट झाल. खलाशाच्या समुद्रावरच्या जीवनात स्त्रियाचा अणुमात्रहि सबध येईनासा झाल्यानच, बंदरात आल्यावर दुष्काळातून उठून आलेल्या, वखवखलेल्या क्षुधार्तांप्रमाण तो बेजबाबदार नि बेफाम बनूं लागतो. दौलत कसा बेफाम झाला आहे इथ कलकत्त्यात तें मी जाणून आहे, पण मी इतकीं वर्षे जहाजाचा कप्तान आहे त्यामुळ दर्यावर्द्यांच्यावर शिस्तीचा बडगा नि अधिकाराचं दडपण बदरातल्या त्याच्या शिमग्याच्या सणांत आणण्याचा वेडेपणा मी करणार नाहीं. समुद्रावरची शिस्त वेगळी, नि इथली, किनाऱ्यावरची वेगळी."

चद्रदत्तानीं मधें बोलण्याचा केलेला प्रयत्न निष्फळ झाला. कान्होजीराव तसेच पुढ बोलत राहिले. "दर्यावर्द्यांच्या सुखसोईची जगानं कधीं केली आहे पर्वा ? आम्ही तुमच्यासाठीं दूरदूरच्या देशातून तुमच्या जरूरीच्या, तशाच ऐषआरामाच्या वस्तु आणतों इतक्या हाल-अपेष्टा सोसून, पण आमच्या समुद्रावरच्या हालअपेष्टा जगाला काय ठाऊक ? तुम्ही तेवढे जिन्नस घेता कीं झाल; मग त्या खलाशाचं तुम्हाला काय सोयर-सुतक ! तुमच्या दृष्टीआड त्याची सृष्टि राहते, नि तुम्ही त्याना विसरता. तुमच्यासारख्या भूचरानीं जवळजवळ वाळींत टाकल्यावर मग त्या खलाशानी बदरात अल्पकाल मिळेल त्या भल्याबुऱ्या सुखानं जिवाला विरगुळा उत्पन्न केला, नि तुमचे सारे नीतिनियम व रीतभात आपल्या कपड्याबरोबर गुडाळून खुटीवर अडकवली तर मग तुम्हासारख्या जमिनीवरच्या लोकाच्या नाकाला मिरच्या कां झोंबाव्या ?"

या दिशेन कान्होजीरावाशीं वाद घालण्यात कांहीं फायदा नव्हता. तेव्हा चद्रदत्तानीं हलकेच पवित्रा बदलून म्हटल, "वा: अगदीं रास्त. बरोबर बाजू मांडलीत. माझं येवढच म्हणण, की ही उतावळी—मुकुल मारे तयार असेल गुडघ्याला बाशिंग बाधून, पण त्या हिंमत-ची इच्छा नसली तर त्याच्या गळ्यात कशाला धोंड ?

"छे, हिंमतची इच्छा नसली तर प्रश्नच नाहीं. माझा मुलाना काहीं आग्रह नाहीं. मीं त्याना तयार केल आहे दर्यावर्दी म्हणून, त्याचं पहिलं कर्तव्य तें. त्याचा धर्म दर्यावर्दीपणा. मग त्याच्या लग्नाच्या बाबतींत मला चकारशब्द नाहीं काढायचा. ते एक लग्न करोत, बदरोबदरीं एकएक बिऱ्हाड थाटोत किंवा काहींच न करोत, त्यांचं ते पाहायला पूर्ण मुखत्यार आहेत !"

शेवटीं चद्रदत्तानीं हिंमतलाच गाठला. "हिमत, तुझ्यावर मुकुलचा जीव लागलाय् म्हणे. तू तिला तुझ्याशीं लग्न करायची सूचना केलीस वाटत ?"

" छे, छे! उलट तिला इथच कुठ कलकत्त्यात चांगल स्थळ पाहून द्या म्हणून मी तुम्हाला सांगणार होतों, आणि तिलाहि तेंच सांगत आहे."

" तें का म्हणून?"

" कारण माझं तिच्यावर खरच प्रेम आहे, अन् त्यामुळच तिला जन्मभर सुख लागाव, तिच चांगल व्हाव अशी फार इच्छा आहे म्हणून."

" हिमत! तोंडान प्रेम नाहीं म्हणत, तुझ्या कृतींत नि भावांत तें आहे अस दिसल तर मुकुलचा समज तुझ तिच्यावर प्रेम आहे असा झाला तर त्यात नवल नाहीं. अरे! मुली प्रेम अजमावतात तें प्रियकराच्या शब्दावरून नव्हे, तर कृतीवरनं नि दृष्टीवरनं. तुमच्या हृदयाचा ठाव दृष्टींतून त्याना घेता येत असताना नुसत्या शब्दजालानं का त्याची फसवणूक होईल?"

हिंमत ऐकतच होता. चंद्रदत्तासारखा म्हातारा स्त्रीमनाचे भाव इतक्या कुशलपणानं विशद करितो याच आश्चर्य वाटलं त्याला.

" हिमत! मी तर मुकुलचा पिता, माझ तिच्यावर फार प्रेम असणार हें तर खासच. माझ्या प्रेमाइतक मोठ तुझ प्रेम आहे का तिच्याबद्दल?"

" हो!"

" त्याची कसोटी लावली तर टिकेल?"

" हो. खासच!"

" मग, तुझ प्रेम तिच्यावर मुळींच नाहीं असं शब्दान, कृतीनं, दृष्टीन तिला तू दाखव. तिचा तसाच समज झाला पाहिजे. त्यातच तिचं हित आहे, तिच कल्याण आहे. तरच ती तुझा नाद सोडून दुसऱ्या एखाद्या स्थळाचा विचार करील. तिच कल्याणं माझ्याप्रमाणं तुझ्याहि मनात असेल आणि तुझ प्रेम तिच्यावर खरोखरच असेल

तर तें जणू काहीं नाहींच अशी मुकुलची खात्री करून तू देणं हीच तुझ्या प्रेमाची कसोटी!"

थोडा वेळ विचार करून हिंमत उद्गारला, "ठीक आहे चद्रदत्त. माझी तयारी आहे. तिच सुस्थळीं लग्न झालं कुठ, तर तुमच्या-सारखाच मला आनंद होईल."

चद्रदत्ताचा आवाज कृतज्ञतेनं थोडा गहिंवरला.

* * *

संध्याकाळच्या सुमारास राणीन 'सायंतारा' पाहून यायच ठरवलंन् आणि तिन हिंमतला आपल्याला दाखवण्यास चलण्याबद्दल विचारल. हिंमत अर्थात्च एकटा गेला. तीं दोघ परत आलीं तों जेवणाचा बेत तळ्याजवळच्या चौथऱ्यावर राणीच्या सागण्याबरहुकूम तयार होता. तिथं सर्वजण गप्पा मारीत बसलीं होतीं. गाडींतून खालीं उतरायला-हि हिंमतनं राणीला मदत केली. हिंमत नि राणी दोघहि मोठ्यानं बोलत, मोठ्या खुषीत चौथऱ्याकड आलीं.

राणीची हिंमतशीं वाढती सलगी मुकुलला आवडत नव्हती. हिंमतच्या बाजूनं तसं चालण्या बोलण्याचा हक्क आपला आहे; या राणीचा तर नव्हेच नव्हे, असं तिला वाटत होत. तिनं कित्तीदा हिंमतच्याकड पाहिल. पण त्याची नजर तिच्या नजरेला मिळतच नव्हती. प्रत्येक वेळीं हिंमत राणीकडच पाहताना तिला दिसे. आणि राणीच्या दृष्टिक्षेपात मुकुलला, 'का ग! तुझं सावज मीं तुझ्या हातचं पळवलं ना?' असा कुत्सित गर्भितार्थ आहे असं वाटे. इतर सर्व बोलत होते; पण मुकुलच त्याकड लक्ष नव्हतं. हिंमत नि राणी यांच्यावरच तिच ध्यान केंद्रित झाल होत.

जेवताना राणी म्हणाली, "कान्होजीराव! परवा मीं मला सफरी-वर नेण्याबद्दल तुमची कबुली मिळवली होती. आज मीं तुमची 'सायंतारा' पाहिली, आणि ती मला कित्ती कित्ती आवडली म्हणून सांगूं!"

'सायतारे'च्या स्तुतीइतक गोड कान्होजीरावांच्या कानाला दुसरं कांहींच नव्हत. त्याची कळी खुलली. मग राणी पुढं म्हणते, "ती पाहिल्यावर मी हिंमतला म्हटल, मला सफरभरच काय, पण वारंवार त्या जहाजावर राहायला आवडेल. आता माझी सूचना अशी आहे, कीं मला तुमची सायतारा भाड्यानं द्या. तुम्हीच पूर्वीप्रमाण कप्तान नि तुमचींच सारीं नेहमींची माणसं तुमच्या हाताखालीं. फक्त मी आमच्या पेढीमार्फत माल जुळवीन, कुठ, केव्हा न्यायचा आणायचा तें ठरवीन. त्याबद्दल तुम्ही योग्य सागाल तें भाड मी उचलून देत जाईन. त्याशिवाय शेंकडा पचवीस इतका नफ्यात हिस्सा तुम्हाला मी कबूल करतें. विलायतेला नेण्यासाठी साग, चहा, रबर, तादूळ—सारा माल आता माझ्या पेढीमार्फत तयार आहे. काय आहे तुमचा विचार ?"

कान्होजीरावानीं गेल्या काहीं दिवसात केलेल्या चौकशीवरून व्यापाराला जरा सध्या मदाई आली होती, आणि पुरेसा माल मिळायला बरच थाबाव लागेल हें त्याना ठाऊक होत. अशा स्थितींत राणीनं सायंतारा भाड्यान घेण्याची केलेली सूचना फायदेशीर होती. कान्होजीरावानीं भर्रदिशी विचार करून उत्तर दिल, "ठीक आहे. केव्हांपासून सायतारा भाड्यान घ्यायची तुमची इच्छा आहे ?"।

राणी म्हणाली, "या क्षणापासून !"

कान्होजीरावाना राणीची ही एकघाव दोन तुकडे काम उरकायची पद्धत मोठी पसत पडली. दर्यावर्दीलाहि असेच चटपट निश्चय करावे लागतात.

"ठीक. मग राणीबाई ! या क्षणापासून सायंतारा भाड्यानं घेतलेल्या मुदतीपर्यंत तुमच्या जवळजवळ मालकीची झाली. बर का रे हिंमत, दौलत, सायतारेची हालचाल आतां राणीबाईच्या हुकमानं करायची. त्याचा मान मालकिणीचा आहे आतांपासून."

राणीन मालकिणीच्या नात्यान हुकूम सोडण्यास त्याच क्षणीं सुरुवात खरोखरीच केली. "उद्यां सकाळपासून सायतारेवर माल लादायची व्यवस्था मी करवीत आहे. सात दिवसात लादण पुर होईल. आज आठादिवसा पहाटेच्या वेळीं ओहोटी सुरू झाल्याबरोबर सायंतारा मार्गस्थ व्हायला पाहिजे कप्तानसाहेब! निघण्याची तजवीज कलकत्त्याच्या बदराच्या अधिकाऱ्याकरवीं तुम्ही करवून ठेवा." इतक भराभर सागून मग थोड्या विनोदान ती म्हणते, "सायतारेवर माल लादणं उद्याला सुरू होईल, पण आता हे सार अन्न आपआपल्या पोटात लादण्याचा विसर बोलण्याच्या नादांत आपल्याला पडून उपयोगी नाहीं!"

जेवणानतर चद्रदत्त म्हणतात, "खरच राणीबाई! या कान्होजी-रावांनीं आम्हाला चितगावकडन आपल्याबरोबर कलकत्त्याला आणल नि आता यांनीं सायतारा भाड्यान देऊन टाकली. आम्ही आता परत कस जायचं? आता आम्हाला परत आमच्या कर्णफुलीजवळ पोंचवून मग आपण सायतारा हवी तिकड न्या अस तुमच्याजवळ आता मला सागितल पाहिजे."

राणी म्हणाली, "होय चद्रदत्त, तुम्हाला पोंचवूं परत." नि मग मुकुलजवळ चालत जाऊन तिच्या खाद्याभोंवतीं हात टाकून आपुल-कीचं प्रदर्शन करीत ती म्हणते, "पण एका अटीवर, कीं या तुमच्या सुंदर मुलीच लग्न उरकून आम्हाला निघण्यापूर्वी लाडू खाऊ घातलेत तर! या आमच्या कलकत्त्यांतला कोणता भाग्यवान् जमीनदार तुमचा जावई होणार याचा मी विचार करते आहे!"

सगळे हसले, पण मुकुल हसली नाहीं. विशेषतः त्या तसल्या मूर्खपणाच्या विनोदाला हसण्यांत हिंमतन सुद्धा सामील व्हावं हें तिला झोंबल.

जेवण झाल्यावर चद्रदत्त नि कान्होजीराव निघून गेले. राणीन हिंमतशीं गप्पा मारीत तळ्याच्या कांठीं फिरायला सुरुवात केली.

जिजी घरांत उठून आली आणि मुकुल बिचारी एकटी चौथऱ्यापाशीं उभी होती. तिच्याशीं बोलायची कुणालाच जरूर वाटत नव्हती. सगळया मोठ्या माणसांत तीच काय ती जणू कांहीं फारच लहान पोर! तिच्या मनात दौलतन जातां जाता मारलेला टोमणा खुपत होता. दौलत तिला म्हणाला होता, "अग मुकुल! मला वाटल, तुझ लग्न व्हायच होत हिंमतशीं म्हणून, पण त्या आमच्या ढोंगी बंधुराजाच चित्त तुझ्यावरन उडून त्या नखरेल राणीच्या कच्छपीं लागलेल दिसतय्, आणि माझ्याशी तर प्राण गेला तरी तू लग्न करायची नाहींस म्हणालीस? म्हणजे हिंमतहि नाहीं नि दौलतहि नाहीं. आता लवकरच एखादा वृद्ध जमीनदार गाठ त्या राणीच्या सूचनेप्रमाण."

मुकुलन पुनः एकवार दौलतच्या गालावर पाच बोटं उठवलीं असतीं, पण तिला धीरच होईना. हिंमतला त्या अमावास्येसारख्या राणीन काबीज केल्यापासून मुकुलचा सारा आवेश कुठच्या कुठच लोपून गेला. हो, खरोखरीच तिची कुणाला जरूर नव्हती तर!

सायतारेवरच्या त्या रात्री तिला आठवल्या, ते सारे रोमांचकारी प्रसग तिला आठवले. हिंमत त्या वेळीं आपल्याला फसवत होता का? छे! त्याच्या ओठांच्या स्पर्शात किती अनन्यता होती. त्याच्या बाहूच्या विळख्यांत कपटाचा लवलेश नव्हता. त्याची नजर तिच्या नजेरला म्हणाली होती, "अग, बावनकशी सोन म्हणतात ना, तेंच हें! लवकर लूट ते! समुद्रमथनातनं अमृत निघाल; देवदानवाच्या झटापटींत त्यातले थोडेसे थेंब पृथ्वीवर ओघळले. मर्त्य मानवांच्या शरीराना अमर करण्याची शक्ति त्या थेंबात नसली तरी, निदान त्यांच्या आत्म्याना अमरपद देण्याची शक्ति अमृताच्या थेंबानीं मानवाना दिली! त्यालाच प्रेम म्हणतात!! वेडे मुली! पी! लवकर प्राशन कर तें! तिन तें प्राशन केल होत. तिचा हिंमतवरचा विश्वासहि अमर झाला होता. तो माझा आहे. त्याचं माझ्यावरच प्रेम आहे. अगदीं अव्यभिचारी प्रेम आहे. मी या पैजेसाठीं प्राणसुद्धां

पणाला लावीन.–पण–पण मग माझ्या डोळ्यांपुढं दिसतं त्या दृश्याची नि माझ्या मनोमन साक्षीची सागड कशी घालूं? माझ्या अधरातून माझ्या हृदयात उतरलेला त्या रात्रीचा हिंमत खरा, कीं या अमा-वास्येबरोबर तळ्याच्या काठी हिंडताना दिसणारा हिंमत खरा!"

मुकुलन तळ्यातल्या चद्राबिंबाकडं पाहिलं. निशिगधाचा मद वास जवळूनच कुठून तरी येत होता. रातकिड्यानीं झाडांच्या गर्दीत आपली किरकिर सुरू केली होती.

तिच्या मनांत एकदम गंगासागराजवळ भेटलेल्या त्या महापुरुषाचे शब्द उमटले. त्याची अशी एकदम का आठवण झाली मला?

जड पावलानीं आणि त्याहिपेक्षा जड अतःकरणान ती घरांत आली. तिच्या खोलीकडं निजायला जाताना राणीच्या खोलीवरन तिला जायचं होत. राणीच्या खोलीच्या दारांत उबरठ्यावर दाराजवळच्या छोट्या टेबलावरन वाऱ्याच्या झोतान उडून एक तसबीर खालीं पडली होती ती मुकुलच्या पायाला लागली. तसबिरीवरच्या काचेला तडे गेले होते, पण ती फुटली नव्हती. मुकुलनं ती उचलून पाहिली. तिन ती पूर्वी पाहिली नव्हती, पण त्यांतील स्त्रीची चेहरेपट्टी तिला परिचित वाटली. छे! हिंमतच्यासारखाच होता तो तोडवळा.

निजायच्या खोलींत येऊन मुकुलन अर्धवट गुगींत गेलेल्या जिजीला हलवून विचारल, "जिजी! ही कुणाची तसबीर ग?"

डोळे कसेबसे उघडून पाहत जिजी म्हणाली, "अऽऽ? अग ही तर मेघनेची तसबीर! हिंमत दौलतच्या आईची! तुला कुठ सापडली?"

"कुठ नाहीं सापडली! सायतारेवरन हिंमतच्या खोलींतन मीं ती उचलून आणली होती मला जरा कुतूहल वाटत होत म्हणून!"

जिजीच समाधान झाल. ती निजली. मुकुलनं ती तसबीर सापडली तिथ परत नेऊन ठेवली. मग परत अथरुणावर पडल्यावर प्रहरभर ती विचारांत गढली होती. पण शेवटीं तिचा कांहीं निश्चय ठरलेला असावा. कारण त्यानतर अगदीं स्वस्थ चित्तान ती झोपीं गेली.

## १४

सायतारा कलकत्त्याहून निघाली त्या वेळीं तिच्यावर अनेकाच्या निमित्तमात्र कारवाईन म्हटलं तरी, खरोखरी अटळ भवितव्यतेनच अतिशय वैचित्र्यपूर्ण लोकाची गाठ पडली होती. त्यांचे भिन्न स्वभाव, विरोधी आकाक्षा नि वासना यामुळ गुतागुत झाली होती. जमिनीवर मोठ्या शहर गावात त्याची गाठ पडती तर इतका भडका उडाला नसता. पण या जहाजाच्या अतिशय मर्यादित नि लहानशा जगात ही वर उल्लेखिलेली दारू ठासून भरल्यामुळ होणाऱ्या स्फोटाची तीव्रता नि भयानकता हीं अमर्याद झालीं होतीं.

आगामी संकटाची चाहूल सगळयानाच लागत नाही. पण हळुवार आणि भावनाप्रधान लोकाना त्याच्या सूक्ष्म सवेदनाग्राहक स्वभावान हें ज्ञान चटकन् होत. मुकुलला असच काहीं तरी भयंकर भवितव्य सायतारेवर नि सर्वावर लटकत आहे अस वाटू लागल होतं.

चितगावाहून कलकत्त्याला जाताना त्या छोट्या सफरीत आपण किती आनदात नि औत्सुक्यात होतों, नि आता कशा निराशापूर्ण मनःस्थितीत आहोंत याच तिला नवल वाटत होत. पण त्याशिवाय दारुण संकटांची सूक्ष्म चाहूल तिला लागत होती. अधारातून जातांना

काहीं दिसत तर नसाव, पण काहीं तरी धोका आहे अशी मनात हुरहुर वाटावी तसच मुकुलला झाल होत.

कलकत्त्याला जास्त थाबावं नि मग दुसऱ्या एखाद्या जहाजानं चितगावला जावं असाहि एकदा चद्रदत्ताचा विचार ठरत होता. पण मुकुलनं कलकत्त्याला आपण अगदीं कटाळल्यानं व कर्णफुलीकडं परत लवकर घरीं जाण्याच्या धरलेल्या हट्टान चंद्रदत्त, जिजी नि मुकुल सायतारेवरच चितगावला जाण्यासाठी आली होती.

राणीवर प्रीति जडल्याच हिंमतनं केलेल प्रदर्शन तिन पाहिल, पण विचारातीं त्यावर तिचा विश्वास बसत नव्हता. हिंमतच्या खऱ्या स्वभावाच दर्शन नि त्याच्या खऱ्या प्रेमाची ओळख तिला हिंमतच्या करपाशात असताना त्याच्या ओठानीं करून दिली होती. आणि नंतर हिंमतन कलकत्त्याला राणीच्या घरीं कितीहि नाटकी आविर्भाव केला तरी तें नाटक होत. आणि तें सुद्धा आपल्याचबद्दलच्या प्रेमान नि हितबुद्धीन प्रेरित होऊन केलेल होत, याची खूणगाठ तिन मनात बाधली होती. सायतारा आणि त्याबरोबर हिंमत सकटात पडणार तेव्हा आपण सन्निध असाव आणि आपल्याकडून शक्य तितकी मदत करावी, अशी तिची मनीषा. या साऱ्या गोष्टी तिच्या मनात विचारापेक्षा अतःप्रेरणेनच ठरल्या होत्या.

सायतारा कलकत्त्याहून हुगळी नदींतून बाहेर जाताना राणी आपल्या आढ्यतेखोर स्वभावाला अनुसरून बेधडक मागच्या क्वार्टर डेक्वर जाऊन उभी होती. सायतारा तिन भाड्यान घेतल्यामुळं सर्वजण तिला फार आदरान वागवीत होते, तरी पण खुद्द नौकानयनात जेव्हा तिचा व्यत्यय येऊं लागला तेव्हा कुणी तरी तिला तशी सूचना करण भाग होत. नुसत्या डेक्वर ती उभी राहून शोभा पाहत किंवा काम कस चालत ते पाहत राहती, तर काहींच हरकत येण्याचा प्रश्न नव्हता, पण तिन कामांत लुडबुड करण्यास प्रारंभ केला. चार्ट रूममधेंच जाऊन उभं राहाव, तिथल्या सामानाला, नकाशाना हात

लावावा, कामांत गुतलेल्या अधिकाऱ्याशीं भलत्या वेळींच संभाषण सुरू करावं, या त्रासान पायलटन विचारलं, "कप्तानसाहेब! या बाईना खालीं बसण्यास चागलीशी खोली नाहीं वाटत, म्हणून इथं कामाच्या जागीं त्या हिंडत आहेत?"

"दुर्लक्ष करा त्याच्याकड थोड तुम्ही—त्यानींच हें जहाज भाड्यान घेतल आहे, तेव्हा त्याना मोकळेपणान हिंडण्याफिरण्यास मना करणं अवघड आहे."

"त्याना स्पष्ट सागण अवघड वाटत म्हणून तुम्हाला तुमच जहाज धोक्यांत घालण तर नाहीं ना परवडणार?"

"तें माझ मी पाहायला समर्थ आहे." कान्होजीराव उद्गारले.

"मर्जी तुमची! पण जोपर्यंत हुगळींतून बोट नेण्याच काम माझ्या-वर तुम्ही सोपवता, तोंपर्यंत माझ्या कामात विनाकारण व्यत्यय आणलेला मला खपणार नाहीं." पायलट म्हणाला.

"ठीक आहे. अरे हिंमत! राणीबाईना तेवढी सूचना कर पाहू." कान्होजीराव म्हणाले. अनेकदा असल अप्रिय काम स्वतः करण्यापेक्षा हाताखालच्यांकडून करवून घेण कप्तानाला सोयीच पडत. म्हणजे काम झालं तर बरच; नच झालं तर फिरून चुचकारून सारवासारव करायला त्याला मोठेपणान पुढ होता येत.

राणीला हिंमत म्हणाला, "चला आपण खालच्या डेकवर गप्पा मारीत हिंडू या. तिथं जास्त मोकळढाकळ आहे." आणि राणीहि लागलीच गेली त्याच्याबरोबर. नाहीं तरी हिंमतचा सहवास जास्त मिळावा, त्याला शक्य तर आपल्या वश करवून घ्याव हा तर तिचा मूळ उद्देश!

"तुम्हाला एकट्याला अस जहाज चालविता येईल का?" दूर धोरणान राणी विचारते.

"हो. शिडान चालणाऱ्या गलबताच्या कप्तानपदाची "Square Rigged Master's" परीक्षा मी दिलेली आहे. आणि त्याच्याहि

पुढची नौकानयनात विशेष पारगतता दर्शविणारी परीक्षाहि मीं लवकरच देईन. आमचं जहाज लंडनला जर केव्हा गेल तर तिथ परीक्षा देणार आहे."

"लंडनलाच फक्त परीक्षा होतात का?"

"इतरहि ठिकाणी होतात. इतर देशाच्याहि तत्सम परीक्षा आहेत, पण इंग्लंडची नाविकपरंपरा फार जुनी नि ख्यातनाम असल्यानं लंडनमधली परीक्षा दिली कीं त्याला जगभर मोठा मान असतो."

"मग ती परीक्षा दिल्यावर तुम्ही निराळ्या गलबतावर नाहीं का जाणार? स्वतःच्या एकस्याच्या मालकिचि अस गलबत तुम्हाला असण नाही का आवडायच? मला आवडेल बाई फार."

"हें सायतारा आहेच कीं आमच."

"पण तें कान्होजीरावाचं."

"म्हणजे माझच ना?"

"छेः! दौलत नि तुम्ही दोघानाहि काही कप्तान नाहीं होता येणार सायतारेचे एकाच वेळीं. तुम्ही कप्तान होऊन दौलतना तुमच्या हाताखालीं काम करण कस आवडेल? तसच दौलत कप्तान झाले तर तुम्हाला वाटणार."

"नाहीं राणीबाई! मला त्यात काहीसुद्धा वाईट वाटणार नाही. दौलतच्या हाताखालीं मी आनंदान काम करीन. अशा सुदर जहाजावर दर्यावर हिंडण्यात, आनदान काम करण्यात मला मोठी मौज वाटते. कोणत्या हुद्द्यावर, ही मला फार गौण गोष्ट वाटते."

"भारीच अल्पसतुष्ट दिसता तुम्ही हिंमत!" राणी जवळ सरकत म्हणाली. भावाबद्दल हिंमतच्या मनात असूया नसल्यान चचुप्रवेश करायला त्याच्या स्वभावातील दुसर एखादं छिद्र शोधलं पाहिजे हे राणीनं तात्काळ ताडल.

सर्वसाधारण सृष्टिनियमान पुरुषाला स्त्रीच आकर्षण वाटाव हा ठोकळ सिद्धान्त झाला. आणि त्यावरच राणीची मदार असेल कदाचित्.

पण स्त्रीजातींतहि असे काहीं नमुने असतात, की हिंमतसारख्या उमद्या नि फार मोठ्या मनाच्या तरुणाला त्याच्याबद्दल आकर्षण तर दूरच राहो, पण तिटकारा आणि त्याहि पुढची पायरी म्हणजे किळस वाटावी.

राणीनं हिंमतच्या जवळून चालताना सायतारेच्या कलण्यानं आपला तोल गेला अशा आविर्भावानं हिंमतच्या अंगावर आपण पडल्यासारखं केलं. त्या स्पर्शानं राणीच्या आतुरतेंत काय भर पडली असेल ती पडो, पण हिंमतच्या अंगावर रोमांचाचा औषधालाहि मागमूस तिला आढळला नाहीं. एखादं पडलेलं पीप उचलून फिरून सरळ उभं करून ठेवावं, तशा पूर्ण विकाररहित औदासीन्यानं हिंमतनं राणीला सावरून उभी केली. आणि राणीला त्याची जाणीव झाली. प्रेमाचा पडसाद उठला की नाहीं, प्रत्युत्तर मिळालं कीं नाहीं याची ओळख एखाद्या हस्तस्पर्शानं किंवा दृष्टिक्षेपानंहि पटू शकते, नि अवघड अप्रिय भाषणानं तें सांगत बसण्याचे वाचेचे श्रमहि अनायासें वाचतात.

" हिंमत ! मला समुद्रावर हिंडायची फार हौस वाटू लागली आहे. मी परत गेल्यानंतर एखादं सुंदर जहाज किंवा कदाचित् ही सायताराच विकत घेईन."

" सायतारा विकत घेता येणार नाहीं तुम्हाला, राणीबाई ! "

" हिंमत ! मला अहो-जाहो म्हणू नका. त्यापेक्षा सुटसुटीत एकेरी नांव बरं. एवढ्या सफरीवर आपण एकत्र असणार, अहो-जाहोचा काय उपयोग ? "

" राणीबाई ! " हिंमत पुन्हा जास्त खोचून म्हणतो, " अहो-जाहोची मर्यादा प्रथमच पाळली म्हणजे पुढे एकेरीवर येण्याचा कटु प्रसंग उद्भवत नाहीं."

" तें असो. पण सायतारा मला कां विकत घेता येणार नाहीं ? अशी किती किंमत पडेल या जहाजाला ? "

" तुम्हाला देता येणार नाहीं एवढी किंमत पडेल."

"माझ्या सपत्तीची तुम्हाला कल्पना असती तर, हिंमत तुम्हीं अस म्हणण्याच धाडस केल नसत. सायतारेची किमत केवढीहि वाढविलीत तरी त्याच्या चौपट मी देऊ शकेन!"

"हेच तर चुकत आहे. राणीबाई, पैशाच्या मोलान ज्याची किंमत होत नाहीं अशा अनेक गोष्टी जगात असू शकतात."

"हें मला खर नाही वाटत. पै किंवा परार्ध याच्या मधें कुठ ना कुठ तरी बसणारी किंमत देऊन विकत घेतां येणार नाहीं अशी व्यक्ति किंवा वस्तु जगात कोणतीच सापडणार नाहीं अशी माझीहि खात्री आहे."

यावर हिंमत खदखदून उपहासान इतका हसला, की राणीन जरा चिडून विचारल, "मला यात विनोद फारसा आढळत नाहीं."

"अस पाहा राणीबाई! तुमच्या जमिनीवरच्या सपत्ति म्हणून गणल्या जाणाऱ्या दगड, धोंडे, धातूच्या असख्य खाणी या समुद्राजवळ आहेत. रत्न रत्न म्हणतात त्या अमोल गोष्टीसुद्धा समुद्रमथनानच उपलब्ध झाल्या. पण अशा या प्रचड संपत्तीचा धनी—हा रत्नाकर चुकून तरी त्याबद्दल बढाई मारतो का? त्याच पाणी उथळ नसल्यान त्याला खळखळाटहि कमी आहे. समुद्रावर त्या सपत्तीची काय किंमत! म्हणूनच समुद्रान ती सपात्ति वर न ठेवता कचरा, अडगळ, कुचकामी म्हणून तळाशीं टाकून दिली आहे! आता या कचऱ्याची केवढी रास ओतली म्हणजे सायतारा नि अशा अनेक गोष्टी मिळतील म्हणून तुम्हीं विचारल. –तर मग हसू नको तर काय करू?"

"हिंमत!" राणी रागान म्हणाली, "तुमच भाषण उपमर्दकारक वाटत मला. माझी मैत्री तुम्हाला वाढवू दिली त्याचा अर्थ तुम्हीं आपली पायरी सोडावी असा नाहीं. मी या बोटीची मालकीण आहें."

"राणीबाई! बोट भाडयान तुम्हांला सफरभर दिली आहे इतकच! —मालकीहक्काचा प्रश्न कशाला?"

“ प्रश्न कशाला ! मला त्याची शहानिशा एकदा करून घेतलीच पाहिजे कान्होजीरावाकडून. आणि गोष्ट निघालीच तेव्हा आत्ताच मी कान्होजीरावाना जाऊन विचारतें.” अस म्हणून राणी परत क्वार्टर डेक्कडे जाऊ लागली.

“ राणीबाई ! ” हिंमत म्हणाला, “ आत्ता क्वार्टर डेक्वर जाण्यात अर्थ नाही. क्वार्टर डेक्वर आत्ता कुणाला येऊ देऊ नका म्हणून कप्तान-साहेबाचा हुकूम आहे. हुगळीचा पायलट त्याच काम सपल्यान परत जाण्याची वेळ आहे, त्यामुळ कप्तानसाहेब पायलटचा निरोप घेण्यात नि बोटीचा पुढचा मार्ग ठरवण्यात व्यग्र असणार. तेव्हा त्याना आत्ता मुळींच फुरसत असणार नाहीं.”

“ हिंमत ! तुम्ही प्रथम आमच्या घरी आला त्या वेळीं तुमच्यांत जास्त स्त्रीदाक्षिण्य असेल अशी माझी कल्पना होती. त्या वेळच्या नि नतरच्या बोलण्या-चालण्यावरून तुम्हाला इतकं फटकून नि माणूसघाणेपणान वागता येत अस मुळींच वाटल नाही. केवळ मैत्री-खातर नि आपुलकीच्या भावनेसाठीं मी इथवर गप्प होतें. पण आता मी सागते तें लक्षात ठेवा, की त्या भावनाना थारा नसला तर मला हुकमत कशी गाजवावी, नि पायातील वहाण पायात कशी ठेवावी हे छान कळत. ही सायतारा मी पैसे मोजून कान्होजीरावाकडून एका सफरीसाठी भाड्यान घेतली आहे. ती कोणत्या मार्गान, केव्हा, कुठं जाणार हे सागणारी मी आहे. जहाजाचे कप्तान या नात्यान कान्होजी-रावाची हुक्मत असली, तरी त्याच्या हाताखालचे सटरफटर अधि-कारी माझ्या खिजगणतींत ठेवण्याची मला जरूर दिसत नाहीं. कान्होजीराव हे कप्तान म्हणून मला जबाबदार आहेत, आणि काहीं थोड्या शिस्तीपुरती मी फक्त त्यानाच जबाबदार आहे. या जहाजावर माझा प्रवेश आहे कुठ नि कुठ नाहीं हे, आणि मला अडवण्याची कुणाची प्राज्ञा लागून गेली आहे तें, माझ मी पाहीन.” इतक बोलून फणकाऱ्यान राणी सरळ क्वार्टर डेक्वर जाऊन हजर झाली.

राणीला सडेतोडपणें आपण बोललों खरे, पण तिला खिजवण्यात सुज्ञपणा नाहीं अशा विचारान हिंमत गप्प राहिला.

हुगळीचा पायलट परत जाण्यासाठीं सायतारा थाबली त्या वेळीं तिन्हीसांजा झाल्या होत्या. 'पायलट कटर' सायतारेजवळ येऊन पायलट होडीत बसून पायलट ब्रिगकडे परत रवाना होईपर्यंत आजूबाजूच्या मच्छीमाराच्या होडग्यानी सायतारेजवळ येऊन जाता जाता थोडी विक्री केली. सफरीच्या सुरुवातीच्या रात्री जेवणाला ताजे ताजे मासे घेण्याचा मोह अनिवार होता. पायलटन कान्होजीरावाना ' शुभास्ते पथानः सन्तु ' किंवा ' पुनरागमनाय च ' या अर्थी इग्रजीमधे शुभेच्छा प्रदर्शित करून त्याशीं हस्तादोलन करून त्याचा निरोप घेतला. मच्छीमाऱ्याच्या जवळ आलेल्या होडग्यानी आपली छोटीं त्रिकोनी शिड झराझरा उभवून सायतारेचा मार्ग मोकळा केला. याच वेळी सूर्यास्त झाल्यान कसाबान उजव्याडाव्या बाजूचे हिरवे ताबडे दिवे लावले. वर फडकणारीं सारी निशाण उतरवून गुडाळून टेवलीं.

सर्व शिड उभारून ठीकठाक केल्यावर आणि सायतारा योग्य दिशेवर लावल्यावर रात्रपाळीचे लोक आपापल्या कामावर रुजू झाले, आणि बाकीच्यानी स्वयपाकघराकडे आपला मोर्चा वळवला.

अधार झराझर पडला. अगोदर जेवण करून दौलतला हिंमतन डेकवरच्या ड्यूटीवरून मोकळ केल. त्याच वेळीं राणी मागच्या कठड्यावर रेलून बेफिकीरपणान आणि तिच्या नेहमीच्या ऐटीन उभी होती. हिंमत वर आल्यावर दौलत त्याला म्हणतो, " काय रे हिमत, राणीबाईना क्वार्टर डेक्वर न येण्याची सूचना तू कशी काय केलीस ?"

" कामाच्या वेळी क्वार्टर डेक शक्य तेवढ मोकळ असाव, एवढाच माझ्या सागण्याचा उद्देश होता." इतक्यात राणी तावातावान पुढ येऊन म्हणते, " पण क्वार्टर डेक् नेहमींच इतक मनुष्यरहित ठेवण्याची खबरदारी हिंमत, तुम्ही स्वतः घेतां अस लोकाच्या सागण्यावरून दिसत नाहीं."

" म्हणजे काय ? "

" म्हणजे असं कीं, मुकुलसारख्या मुलीच्या रात्रीं अपरात्रीं क्वार्टर डेक्वर असण्यानं जर तुमच्या नौकानयनाला व्यत्यय येऊ शकत नाही तर माझ्या येण्यानं तरी तो कसा संभवेल ? का तुमच्या मतें मुकुलला आणि मला निरनिराळे नियम लागू आहेत ?

हा पूर्वीचा उल्लेख राणीनं केल्याबरोबर हिंमत संतापला. दौलत-खेरीज दुसऱ्या कुणाचाच हा चहाडखोरपणा नव्हता. " कुणी सांगितलं तुम्हाला हे ? " हिंमत चिडून म्हणाला.

" त्याच्याशीं तुम्हाला काय करायचं आहे ? कुणीहि भुतानं ती बातमी सांगितली असेल. मुद्दा एवढाच कीं, ती खरी आहे कीं नाहीं. आणि तुमच्या चिडलेल्या मुद्रेवरून त्याबद्दल माझ्या मनात शंका असली तरी आता ती उरली नाहीं."

हें सगळं भाषण होईतों दौलत तेथून केव्हाच पसार झाला होता. इतक्यांत संध्याकाळच्या भोजनाची वर्दी मिळाली, आणि शिडी उतरून खालीं जाता जाता मागें वळून राणीनं हिंमतला म्हटलं, " हिंमत ! तुम्ही मघाशीं मला बरंच उपदेशामृत पाजण्याचा आव आणला होतात. आता मींहि तुम्हाला एखादी सूचना केली तर तुम्ही नाक मुरडण्याचं कारण नाही. ती सूचना हीच कीं, मीं भाड्यानं घेतलेल्या या सायतारेवर शिस्तीचा करडा अमल कप्तानसाहेबाच्याकडून चालविला जातो कीं नाहीं हें पाहण्यासाठीं आता मीच खुद्द इथं आहे. तुमच्या प्रेमलीलांना नौकानयनात वाव मिळणार नाहीं. हलगर्जीपणा किंवा कामात कुचराई करणाऱ्या कुणालाहि त्याच्या लहानथोर अधिकारपदाची पत्रास न बाळगता कडक शासन केलं जाईल. तसंच तुमच्या अति वळवळणाऱ्या जिभेला तुम्हीं लगाम घातला तर बरं, नाहीं तर माझा अपमान करणाऱ्याच्या धडावर त्याचं शिर फार दिवस राहू शकत नाहीं हें मी तुम्हांला निक्षून बजावतें."

हे सारे उद्गार आणि धमक्या त्या तरुण स्त्रीच्या तोंडून बाहेर पडताना ऐकून हिमतला भय नाहीं, तरी अत्यंत अचंबा वाटल्याशिवाय राहिला नाहीं.

भंडाऱ्यान सैपाकघरातली आवरासावर करून ड्यूटीवर असलेल्या सुकाण्याच जेवण ताटात बाजूला काढून झाकून ठेवल होत, आणि तो बाहेर डेकवर बसून हुक्का पीत होता. त्याच दिवसाच काम संपल होतं, थोड्या वेळान थंड हवा खाऊन मग झोपण्यास जाण्याचा त्याचा इरादा होता.

त्याच्या हुक्का पिण्याच्या तंद्रीत कोणी तरी दुसऱ्या दारान सैपाकघरात शिरल्याचं त्याला समजल नाही. थोड्या वेळानं भांडीं खळखळत खालीं आपटल्याचा ध्वनि आला तेव्हा तो उठला. "काय शिंचा माजराचा उपद्रव आहे! जरा स्वस्थ बसाव म्हटल तर याच्या उंदराच्या शिकारीन उच्छाद मांडतात." त्यान शुकशुक करीत सैपाकघरात डोकावून पाहिल. माजर तिथं नव्हत. बहुतेक पळाल असाव, त्यान विचार केला.

सावळ्यानं सुकाण धरण्याची पाळी संपल्यावर सैपाकघरात येऊन मोठ्या अधीरपणे आपली झाकलेली थाळी उचलली आणि डेकवर येऊन सैपाक्याच्याजवळ ती ठेवली. हात धुता धुता त्यान विचारलं, "का भंडारी! काय आहे आज खायला?"

"राजाचा बेत आहे आज. ताज्या माशाची आमटी नि जिरासाल तांदळाचा मोकळा भात आहे."

"छान!" सावळ्या मांड ठोकून, जिभल्या चाटीत म्हणाला. पुढ्यांत आढलेल अन्नाचं ताट, आणि चरचरून लागलेली भूक अशा स्थितींत केवढ्या अपेक्षेन त्यान ताटावरचं झाकण काढल, आणि त्याच्या तोंडून जवळजवळ दुःखोद्गारच निघाला. ताटात काहींच नसून तें कुणी तरी चाटूनपुसून साफ केल होतं. हा भंडाऱ्याचाच कांहीं तरी फाजीलपणा आहे असं वाटून, त्याला तडाखा द्यायला

सावळ्या उठला आणि म्हणतो, "अन्न कुठ आहे? असली कसली चेष्टा करतोस?"

भडारी बसल्या जागेवरूनच म्हणतो, "अस कस होईल? मीं माझ्याच हातान ताट भरून ठेवल होत."

"मग कोणी ते तुझ्या बापान खाल्ल?"

"माझा किंवा तुझा दोघाचाहि बाप खायला आलेला मीं पाहिला नाहीं, पण मीं हातान अन्न ठेवल एवढ मात्र खर."

इतक्यात सावळ्यान एकदम बिचकल्यासारख करून भडाऱ्याचा हात घट्ट धरला आणि आपल्या हातान खूण करीत त्यान भडाऱ्याच चित्त बोटीच्या पुढच्या भागाकड वेधलं. त्या दोघाचे बाचाबाचीचे शब्द त्याच्या तोडातच विरले होते.

त्या अतिशय अधुक उजेडात काही तरी काळी आकृति ढागा टाकीत नाळेजवळच्या कठडयाजवळ गेली आणि कठडयावरून पाय टाकून पलीकडे जहाजाच्या बाहेरच्या बाजूकडे उतरत एकदम दिसेनाशी झाली. सावळ्या आणि भडारी उभे होते तिथून तर ती आकृति बोटी-वरून निघून समुद्रातच गेल्याप्रमाण दिसली. अस बोटीवरच कोणीच माणूस चालत्या सायतारेवरून बाहेरच्या समुद्रात जाण शक्य नव्हत.

त्या दोघानींहि एकदमच सहजपणे 'रामनाम' घेतल. ते कोण असावं याबद्दल चर्चा त्यानीं उघडपणे केली नाही. पण त्यानीं एक-मेकाकड पाहिल त्यात एकच भयसूचक अर्थ होता.

शिडान चालणाऱ्या गलबताच्या या काळात अधश्रद्धा, भुताखेता-बद्दलच्या दृढ समजुती खलाशात फार मोठ्या प्रमाणावर रुजलेल्या होत्या. आणि या सायतारेच्या सफरीच्या पहिल्याच सध्याकाळीं दिसलेल्या त्या पिशाचाकृतीनं त्याच्या तोंडच पाणीच पळाल. आणखी पाच-दहा मिनिटाच्या आत साऱ्या खलाशी मडळींत—त्यातच लखीराम नि बनबीर जमा होते—या भूतचेष्टेची बातमी प्रसृत झाली आणि

कितीकानीं तोंड वाकडीं करून, 'शेण खाल्ल नि या बोटीवर आलों' असे उद्गार काढले.

मध्यरात्री घटेच्या ठोक्यावर हिंमत डेक्‌वर हजर झाला; आणि विशेष न बोलता दौलत काम त्याच्या हवालीं करून खालीं गेला. हिंमतन दौलतच्या चहाडखोरपणाबद्दल अवाक्षर काढलं नाहीं.

हिंमत येऊन इकडे तिकडे पाहतो न पाहतो तोंच चद्रदत्त चट्टोपाध्याय वर डेकवर घाबऱ्या घाबऱ्या आले, आणि हिंमतला म्हणतात, "हिमत! कुणी तरी माझ्या खोलींत येऊन आत्ता गेल नि मला अचानक जाग आली. कोण आल तें मला ओळखल नाहीं, पण माझ्या मनात चलबिचल झाल्याखेरीज राहिली नाहीं. मी इथ वर क्षणभर उभा राहतों. तू चटकन् खालीं डेकवर हिंडून एकदा खात्री करून घे म्हणजे माझ्या जिवाला जरा स्वस्थ वाटेल. नाही तर अगोदरच या बोट लागण्यान मला अस्वस्थ वाटत आहे नि त्यात मनावर हें दडपण राहिल तर मला झोपच यायची नाही."

"बर आहे." म्हणून हिमत लागलीच शोध घ्यायला गेला. चद्रदत्त हिंमतच्या जागीं कठड्यावर रेलून उभे होते. त्याच्या तोंडून एक किंकाळी ऐकू आली, आणि दुसऱ्या क्षणी ते कपाळ फुटून डेकवर आपटले.

"अरे फसल! हा तर त्या सुंदर पोरीचा थेरडा बाप, नि तो हिंमत वाचला." इतक म्हणत त्या व्यक्तीनं चद्रदत्ताचा देह कठड्यावरून समुद्रात टाकला. थोडा आवाज झाला तो जहाजाच्या करकरींत नि पाण्याच्या खळखळाटात विरून गेला. सायतारा वेगान मार्ग आक्रमीतच होती.

हिंमत परत आला व त्यान चद्रदत्ताना खूप हाका मारल्या. पण चंद्रदत्त केव्हाच समुद्राच्या तळाशी पोचले होते!

# १५

कांही तरी दगाफटका झाला असावा अशा समजुतीन हिंमतन खुद्द कान्होजीरावाना बोलावून आणविल होते. कान्होजीरावानी शात-पणान जितका शोध करण शक्य होता तितका करविला. खुद्द सायताराच परत फिरवून ज्या सुमारास हा प्रसग घडला त्या वेळच्या तिच्या जागेच्या आसपास त्यांनीं नेववली. छोट होडग उतरवून आसपासच्या पाण्यात वल्हवत धुडून पाहिल. इतकच नव्हे तर, दिवस उगवल्यावर सर्व उजेडात पाहता याव म्हणून दुसरे दिवशीं सकाळपर्यंत पुढ जाण तहकूब केल. पण त्या सगळयात काहींसुद्धा निष्पन्न झाल नाही. सायतारेवरन चंद्रदत्त किंचित्‌सुद्धा मागमूस मार्गे न राहता नाहींसे झाले होते. पुराव्याच्या अभावी चौकशी तरी काय करायची नि कुणाला गुन्हेगार ठरवायचं. त्याखेरीज असाहि एक सभव कुणी सुचवला तर त्याला अगदीं बिनतोड उत्तर देता येणं शक्य नव्हतं. तो हा कीं, चंद्रदत्तांनीं आपण होऊनच आत्महत्या कशावरून केली नाहीं? त्यांची तशीच काहीं खासगी कारणं असलीं तर तीं लोकांना कशी कळणार? शिवाय हें सर्व डोळ्यानीं पाहणारा कुणीच नव्हता. मग दुसऱ्या कुणी चद्रदत्ताना पाण्यात ढकललं—टाकल किंवा तोल

जाऊन ते अपघातान पडले—का त्यांनीं जाणूनबुजून उडी मारून देहत्याग केला हे कळण्याला मार्ग काय होता !

या मृत्यून, अगोदरच पिशाचाच्या अस्तित्वानं गोंधळलेली खलाशी मडळी जास्तच बिचकली. कुणीहि मन मोकळेपणान हसेना, बोलेना. चद्रदत्ताच्या अदृश्य होण्यान सर्वांच्या मनात भीतीची अढी बसलेली. विशेषतः रात्र पडल्यावर जो तो अतिशय सावधगिरीन नि अगदीं जरूरच पडली तर हिंडू लागला. नाहीं तर सर्वांच्या सोबतींत गपचूप का होईना बसलेल बर !

इकड सायतारेच्या मागच्या भागी राहणाऱ्या वरिष्ठ मडळींत तर जास्तच परिणाम झाला होता. जिजी आपल्याकडून मुकुलचं खूप सात्वन करीत होती; आणि त्याला राणीन तोंडान खूपच जोराची साथ चालवली होती. तिन हिंमतला दिलेली धमकी आणि त्याच्या लगोलग हिंमतच्यावर झालेला पण योगायोगान चुकून चद्रदत्ताच्या गळ्याशीं आलेला हा प्रसग याचा अन्योन्यसबध, तें धमकीवजा भाषण ऐकणाऱ्याच्या मनात आल्याशिवाय राहणार नाही ही गोष्ट राणीच्या मनात डाचत होती. त्यावर पाघरूण घालण्यासाठीं मुकुलच्या-बद्दल सहानुभूति दाखवण, तिच्या सात्वनपर एकाऐवजीं चार वाक्य सारखीं बोलण; तिला विचारपूस करून हव-नको तें विचारण इत्यादि गोष्टींनी आपल्याला मुकुलबद्दल केवढा प्रेमाचा कळवळा आहे त्याच राणी बेमालूम प्रदर्शन करी. आणि त्या सोगाला जिजी व बहुतेकजण फसलींसुद्धा. मुकुल फसली नव्हती, पण तिच तोंडच दुःखान मिटल होत, नि राणीचा हा पूतनामावशीचा पान्हा मुद्दाम उघड करण्या-इतकी उत्सुकता आणि जरूर तिला वाटत नव्हती. ती उदासपणें बसून राही. तिच्या डोळ्याला अजून पाणीच आल नव्हतं, इतकं तिच मन अतिदुःखान कोंदल होत.

हिमत मुकुलच्या खोलीत आला नि तिच्या शेजारीं बसला. त्यान तोंडातन चकारशब्द काढला नाहीं, की मुकुलहि काहीं म्हणाली नाहीं.

हिंमतन तिच्या पाठीवर ठेवलेला हात, तिचा आपल्या दुसऱ्या हातान धरलेला हात आणि पूर्ण मौन, येवढ्याच गोष्टींनीं तो तिच सात्वन करीत होता. तिच्याबद्दलच गाढ प्रेम नि सहानुभूति व्यक्त करण्याची ही अति साधी रीत होती, पण तीच शेवटी प्रभावी ठरली. दुःखाच्या पहिल्या आघातासरशीं हृदयाच पाणी पाणी होतं. मग त्याच्या अतीव-तेची आणि दुर्निवारतेची जाणीव होऊन अनेकदा हृदय गोठत-थिजत. अशा वेळी शब्दजजाळान किंवा वेदान्ताच्या गोष्टी सागूनहि जें काम होण अशक्य तें प्रेमाच्या मद आचेन होत. अगदी मूकपणान तीं दोघ बसून राहिलीं होतीं. शेवटी हळूहळू मुकुलच्या दृष्टींतील शून्यता जात जात तीमध्ये स्निग्धता दिसू लागली. हळूच तिच्या डोळयात पाणी जमू लागल. तिन शेजारी बसलेल्या हिंमतच्या माडीवर डोक टेकल आणि इतका वेळ गोठलेली दुःखगगा वितळून तिच्या डोळ्या-वाटे वाहू लागून तिच्या अतःकरणाला हलक होण्यास वाव मिळाला.

त्या दोघाच्यामधें गेल्या काहीं दिवसात पडलेलं अंतर या प्रसगान एकदम नाहींस झाल. खऱ्या प्रीतीची हीच तऱ्हा असते. सुस्थितीमधें आपल्या प्रिय व्यक्तीशी कलहाची वरपागी चाललेली आधळीकोशिबीर नि पाठशिवणी, सकटाच्या आगमनाच्या चाहुली-बरोबर बद पडून, प्रेम करणाऱ्या व्यक्ति एकदम एकत्र येऊन एक-जुटीन पुढ सरसावतात, नि दुसऱ्याकरिता स्वार्थत्यागाची कुरवडी जास्ती कोण करत यामधेंच त्याची अहमहमिका लागते. मग वाटत मनाला, कीं दोन मनाना प्रीतीच्या प्रयोगशाळेंत विरघळवून एकजीव करायला दुःखाच्या जालीम तेजाबाची योजना त्या मोठ्या शास्त्रज्ञान केली असावी !

तिच मन हलक झाल्यावर तिन डोक वर उचललं नि ती म्हणाली, “ कान्होजीरावांना माझ्याकरिता येवढ सागाल का तुम्ही, — कीं मला सध्याच कर्णफुलीकड जाववत नाही. घरीं गेल्यान तर वडिलाची पदोपदीं फार आठवण होईल—त्यापेक्षा सायतारा चितगावला

नेण्याऐवजीं तिच्या सफरीवरच्या पुढच्या ठिकाणीं जाऊ लागाव. त्यांनीं परवानगी दिली तर एवढी सफर मी सायतारेवरच राहीन."

हिंमत उठला. बसलेल्या मुकुलच वर उभवलेल करुणमुख त्यान आपल्या छातीशीं क्षणभर धरल, तिच्या केसावरून कुरवाळीत आपला हात फिरविला, नि "हु" म्हणून तो तिथून गेला.

मुकुलची मागणी इतकी साधी होती, की कान्होजीरावानीं तात्काळ हो म्हटल. हिमतन सायतारा चितगावच्या दिशेकडून बाजूला वळवून नव्या बदललेल्या मार्गावर आणवली.

राणीच्या मनात तिच्या बापाच्या क्रूर नि मुर्दाड स्वभावाची झाक पूर्णांशान उतरली असली पाहिजे. कारण चद्रदत्ताच्या मृत्यून तिच्या मनात यत्किंचितहि चलविचल झाली नव्हती. तिचे बेत, तिच्या महत्त्वाकाक्षा तिच्या मनात अगदीं निर्वेधपणे शिजत होत्या.

दौलतला दारूची आवड आहे हे कळल्यावर त्याला गप्पा मारण्यास आपल्या खोलींत आणून त्याच्यापुढ मद्य ठेवण्यास तिन प्रारभ केला. जहाजावर असताना मद्याला कोणीहि स्पर्श करावयाचा नाही या कान्होजीरावाच्या दडकाला हलके हलके बगल मिळाली. दौलतची मद्यासक्ति नि विषयासक्ति या दोन वाद्याच्या लगामान राणीन दौलतला हा-हा म्हणता काबूत आणला.

हिमतची अभिलाषा राणीन मनांत बाळगली होती. तिच्या निरकुश स्वभावाला इच्छा मनात उत्पन्न होण नि त्या इच्छेची लागलीच पूर्ति होण यामधें आजवर अतरच उरल नव्हत. तिचा उतावळा तडकाफडकी स्वभाव नि पैशाच अमूप पाठबळ यामुळ, तिला अतृप्त इच्छा म्हणजे काय तेंच कळेनास झाल होत. ती चढाई नेटान करी; आणि मार्गातून अडचणी बाजूला सरत. पण आता प्रथमच तिच्या सर्वग्राहीपणाला बाध पडला होता. हिमतन केलेल्या उपहासान नि धिक्कारानं तिच्या अगाची लाही लाही झाली होती. आणि प्रत्येक दिवसादिवसान हा भडका वाढतच होता.

हिंमतन माझा धिक्कार करावा. त्या अक्कलदाढ न फुटलेल्या पोरान माझी हेटाळणी करावी. सायतारा नि आपली प्रीत या पैशानं विकत मिळणाऱ्या वस्तु नव्हेत अस ध्वनित करून माझा पाणउतारा करावा !

समजा, ही संपत्ति मला न मिळती—माझं नैनीबाबूशी लग्न झालं नसत— तर आमच्या दरिद्री कुळातल्या देवळाची झाडलोट करीत मी बसलें असते. सायतारा मी भाड्यान घेऊ शकले नसते— पण मग आमच्या कुलधर्माच्या शपथेबरहुकूम याच हिंमत नि दौलतला यमसदनाची वाट दाखवण्याच काम माझ्यावर पडल असत. खरोखरी आईच्या त्या दिवशीच्या सांगण्यावरून तर, ती माझी जबाबदारी अजूनहि आहे, असा तिला निरोप कळल्याच ती म्हणाली. वास्तविक ती प्रतिज्ञा पुरी न करण्यान मी माझाच जीव धोक्यात घालीत आहे. त्यात आणखी भर म्हणून माझ्या भाड्याच्या पैशावर याची सायतारा चालणार नि या कार्ट्यांची पोट भरणार, आणि या गोष्टीची–माझ्या त्याच्यासाठीं केलेल्या आत्मवचनेची परतफेड होते कशी ? तर हा बोलघेवडा हिंमत मला उटावरून शहाणपण शिकवण्याच्या भरीस पडतो.

आई म्हणाली नाहक हत्या करू नको. बोलून चालून ती दुसऱ्या घरची ! तिच्यात माझ्या वडिलाच्या कुलातला पीळ कसा असणार ? पण मला तर त्या कल्पनेन किंचित्सुद्धा अस्वस्थ वाटत नाहीं. हत्या करण्यातहि मौज आहे. कोंबडी, बकरीं केकाटताना एका घावात त्याची ती हास्यास्पद धडपड संपविण्यात मला काहीच विचित्र वाटल नाही–दुर्गापूजेच्या शेवटीं गेल्या वर्षी तर मी स्वहस्तान तो भरभक्कम रेडा मारला. त्याच धडावेगळ झालेल शिर, वाहणार रक्त, सफाईनं घाव घालतांना पात्याच्या तीक्ष्ण धारेपुढ थोडीशी नाखुषी नि अल्प प्रतिकार करीत कापल जाणार तें मृदु मास—महिषासुरमर्दिनीच नररुंडमालाधारी, खड्गधारी रौद्र स्वरूप—कोण म्हणतं

हत्येंत आनद नाहीं! माझ्या तर अगावर त्या कल्पनेनं रोमांच उभे राहत आहेत. निर्बुद्ध रेडा मारण्यात काहींच नव्हत, पण हा गर्विष्ठ व चतुर हिंमत—त्याच्याशीं बुद्धीनं झटापट करीत, त्याच्या बुद्धीची नि शक्तीची परिसीमा झाली—त्या क्षुद्र सरडयाची धाव सारी कुपणा-पर्यंतच हें त्याला दाखवीत व मग त्याला आपल्या चिमटींत धरण्यात केवढी शर्थ आहे!

मीच तर हिंमतचा काळपुरुष अशी अवतरलें आहे. माझ्या तळ-हातावर तो आहे. चाहेल तितका वेळ त्याचा खेळ करीन—चाहेल तेव्हा त्याला नष्ट करीन. त्याचा मी बळी घेईन. माझ्या वासनेला तरी त्याचा बळी पडेल. बळी पडणारच, पण कोणत्या तऱ्हेन, इतकच ठरवण्याची मी त्याला औदार्यान परवानगी देईन.

आणि मला धिक्कारून त्याची ओढ त्या मुकुलकड. ती रूपान जरा उजवी आहे म्हणून. थाबा, जरा थाबा. येवढ्यातच काय झाल आहे! तुम्हाला मेलेल्या उदरासारख जमिनीवर लोळवीन. तुमची मन हतवीर्य करीन—तुमचीं शरीर निर्माल्यवत् लाथाडीन. तुमची कुतरओढ करीन, तरच मी नांवाची 'राणी'!'

दौलतनं नाही नाहीं म्हणत राणीच्या आग्रहान मद्याचे काहीं प्याले तर पोटात ढकललेच. त्यान त्याची वृत्ति उल्हसित, उन्मादकारक नि बेदरकार होऊ लागली होती. मद्याची मौज हीच. मनाचे उच्च विचार नि सद्गुण याना गवसणी घालून वासना, वाच्छा, विषय याना एक एका घुटक्यागणिक एक एक जास्त अवतरणचिन्हाकित करणार पेय म्हणजे हें मद्य. त्याच्या उपयोगाची राणीला यथार्थ कल्पना होती.

दौलतच्या धुद डोळ्याना राणी सुदर दिसू लागली होती. तिच्या चिथावणीच्या भाषणात फार सत्य आहे अस कानाना वाटू लागल होतं.

" ही सायतारा चालवायला तुमच्याइतक योग्य कोण आहे दुसर दौलत! त्या तुमच्या मूर्ख भावाला कान्होजीरावामाग आपणच मालक

अशी का खाली वाटते कुणास ठाऊक. खरं पाहिल तर कुठ तुमचा उमदा दिलदारपणा नि कुठ त्या हिंमतच माणुसघाणेपणाच नि निःस्वार्थीपणाच ढोंग! मला तर बाई किळस येते त्याच्या मानभावीपणाची. आणि काल तर कमाल झाली. तिला म्हटल, "अग रडतेस तरी आता किती? या दौलतसारख्या उमद्या नि आनंदी जीवाबरोबर लग्न कर म्हणजे विसर पडेल तुला दुःखाचा." तर म्हणते काय, "दौलतशी लग्न करायला मी काय रस्त्यावर पडलें आहे!"

"ती पोरटी–अ–अस म्-म् म्हणाली? खर–ब-ब–बोलतीस तू?"

"खर तर काय खोट सागेन मी तुम्हाला? तुमच्याजवळ कस बोलवेल मला खोटं? दौलत! तुमच्या हितासाठीं मी तळमळत असते. हो खरच, ही सायंतारा नाही मिळाली तरी मी याच्यापेक्षा केवढ तरी सुदर जहाज बाधवून घेणार आहे. नि मला तुमच्याशिवाय कुणीसुद्धा कप्तान करायची इच्छा नाही. पण मग मीं म्हटल, तें तर हव तेव्हा करू. हातचीच गोष्ट आहे. पण तुमच्या चागुलपणाचा फायदा घेऊन त्या हिमतलाच सायतारा का देऊन टाकावी, आणि त्या उद्दाम मुकुलन तुमचा अपमान का करावा? मला तर वाटत की दौलत, तुमच्याशीं हे लोक असे वागतात ना तर मग त्याचीच खोड मोड्ड, दौलत तुझ्याशीं लग्न करायला योग्य नाहीं का? बर तर मग, त्याच्याच पायाशीं तुला जन्मभर बाधीन! सायतारा हिंमतला मिळणार का? नाहींच तर मग. दौलताशिवाय कुणालाहि तिच कप्तानपद मिळणार नाही. दौलत! नाक दाबल्याशिवाय याची नाही हो तोंड उघडणार! का मला इतक तुमच्याबद्दल वाटत काय जण—वेडीच आहे मी." इतक म्हणून राणीन दौलतच्या गळामिठी पडून धाय धाय रडण्यास सुरुवात केली.

दारूच्या धुंदींत थोडं प्रेम किंवा त्याची नक्कल शतपट खरी वाटते. तर छोट्या अपमानाला सहस्रपट जास्त मानहानीच स्वरूप येतं. आणि या अतिशयोक्तीच्या प्रतिक्रियेंत हातून घडणाऱ्या क्रिया इतक्या

विकृत होतात कीं, शुद्धीवर असताना माणूस अशा विचाराना मनात चुकूनसुद्धा थारा देणार नाहीं.

दौलत राणीच्या इतका कच्छपीं गेला होता कीं तिच म्हणण त्यान वेदवाक्याप्रमाण ऐकून घेतल! त्याला मध्यरात्रीं कामावर जायचं होत; आणि अजून चागले तीन तास अवकाश असल्यान गर्दी नव्हती.

सगळीकड निजानीज झाली होती. पण मुकुलला झोप येत नव्हती, ती डेक्वर आली होती. राणीन तिला जाता जाता म्हटल, "मुकुल! मीं थोडी कॉफी केली आहे. घेतेस का थोडी?"

"हू" मुकुल म्हणाली. काहीं तरी करायच. चला. घ्यावी थोडी कॉफी. राणी प्रथम कॉफी पीतच होती बहुतेक. तिन दुसरा कप ओतून मुकुलपुढ ठेवला.

कॉफी प्याल्यावर झोप उडण्याऐवजीं मुकुलवर झोपेचा अमल चढू लागला. चद्रदत्त गेल्यानतर तिला स्वतत्र खोली मिळाली होती. तिथवर जाऊन बिछान्यावर टेकण्याचाच अवकाश तों मुकुल निश्चेष्ट पडली होती. ही झोप होती का औषधान आलेली गुगी?

मध्यरात्र टळून पधरा मिनिट लोटलीं तरी दौलतचा कामावर पत्ता नव्हता. शेवटीं कटाळून हिंमत मोकळ्या खलाशाला लक्ष ठेवण्यास सागून स्वतःच खाली दौलतला उठवण्यासाठीं गेला.

हिंमत खालीं आला आणि त्याच्या दृष्टीला आणखी एक धक्का बसला. दौलत चद्रदत्ताच्या खोलीच्या दारात उबरठ्यावरच बेशुद्ध होऊन अस्ताव्यस्त पडला होता. हिंमत खालीं वाकला तो दारूची घाण त्याला आली!—आणि त्यान आत नजर टाकली तेव्हा त्याला काय दिसल? — त्या दृश्यापेक्षा डोक्यावर हातोडीन मारलेला घाव त्याला जास्त सहन झाला असता!

# १६

हिमतन काय पाहिल ?--"हा हन्त हन्त नलिनीं गज उज्जहार!"
पाढरं शुभ्र, सकुमार, अर्धोन्मीलित नि चैतन्यान टवटवलेल, भरगच्च पाकळयाच कमलपुष्प तुम्ही पाहिल आहेत ?; तुम्हीं त्या सौदर्यानं दिङ्मूढ होऊन उभे आहात. तोडून घेण्यापेक्षा, त्याच्या सृष्टिनिर्मित परिस्थितीतच तें जास्त रम्य दिसत आहे, तिथच त्याचं सौदर्य जास्त खुलून आणि उठून दिसत म्हणून तुम्हीं रसिकतेन तें पाहत आहा. अशा वेळीं कुणी रानटी माणसान याव, ते कमलपुष्प देठासकट खस्दिशी उपटाव नि मग त्याच्या पाकळया उपटून त्याची नासधूस करून तें जलपृष्ठावर इतस्ततः उधळून द्याव!

देवकीच्या पोटीं जन्मून पृथ्वीवरच्या मोकळया हवेचा पहिला श्वास घेतला न घेतला तों कसान ते कोमल तान्हुल हवेत गरगर भिरकावून धरणीवर आपटाव हे पुराणातल दृश्य तुम्हाला मनःश्चक्षूनीं पाहता येत का ?

अभिजात कलावत शिल्पकारान शुभ्र स्फटिकाची मूर्ति घडवावी—इतकी स्फूर्तिदायक, कीं पाहणारांच्या सवेदनाना क्षणकाल स्वर्गीय निरपेक्ष आनदाच्या उच्चतम शिखराची प्रचीति यावी--आणि एखाद्या चेंगीझखानान विध्वसबुद्धीन प्रेरित होऊन त्या मूर्तीच्या ठिकऱ्या

कराव्या. मग तुम्हीं दुःखान विवळत ते तुकडे एकत्र जुळवीत मनानं तिच्या अभग पूर्वस्थितीची आठवण काढीत हळहळतां ना ?

तसच हिमतला वाटत होत, जिच्यावर त्याच प्रेम बसल होत-- त्याच्या मनाला जिच्या उत्कट प्रेमाची ओळख पटली होती त्या मुकुलचा देह निश्चेष्ट, गलितगात्र, विकलित, कुस्करलेल्या स्थितींत पडला होता. अगावरच वस्त्र विस्कळीत झाल्यान--केवड्याच्या कणसाचीं वरची हिरवीं पान सोलल्यावर आतील पीत निर्मल पानाची जुडी उघडी पडावी तद्वत दिसत होत.

हिमतन हलक्या हातानी मुकुलच्या देहावर पाघरूण घातल. त्या दुःखान--आपल्या पवित्र देवतेला भ्रष्ट केल्यान झालेल्या हाननि त्याच हृदय तिळतिळ तुटत होत, तर क्रोधान डोळे लालबुद झाले होते. हाताच्या मुठी त्वेषान वखवखल्या होत्या, नि त्या सतापाच्या आवेगान त्याच शरीर थरथरत होत

हिमतन एखाद घाण पोतेर उचलाव तशा तिरस्कारान दौलतच्या अंगरख्याला मानेशीं मागं पकडून त्याला वर उचलल आणि अर्धवट फरफटत, अर्धवट ढकलीत त्याला बाहेर मोकळ्या डेकवर नेऊन कठड्याशीं टेकवून बसवल. हिमतन बादलीभर पाणी समुद्रातून वर उपसल, नी दौलतच्या तोंडावर गार पाण्याचे हबके जोरान मारले. त्यानी आणि रात्रीच्या गार वाऱ्यान लौकरच दौलतची धुंदी उतरली.

“ आलास का तू शुद्धीवर ? ”

“ शुद्धीवर नव्हतो कधीं ? जरा झोप लागली जास्त इतकच.”

“ ऊठ. पायावर उभा राहा पवित्र्यात.”

“ छे. मला कामावर जायच आहे मध्यरात्री.”

“ कामाचा विचार करायला अवधि नाही. सायतारेच काय हव ते होऊ दे. माझ्या हातून तू जिवत सुटलास तर पुढचे विचार. मी तुझ्याशी मुष्टियुद्ध करणार आहें.” हिमतने बाह्या गुडाळल्या नि तो पवित्र्यात उभा राहिला.

दौलत पूर्ण शुद्धीवर आला होता. दारूच्या धुंदींत काय काय घडल याची त्याला फारशी स्वच्छ आठवण नव्हती. पण मुष्टियुद्ध केल्याशिवाय सुटका नाही, अस पाहून त्यानहि मुठी वळल्या.

दौलत लेचापेचा मुष्टियोद्धा नव्हता, आघात निमूटपणें सहन कसे करावे, नि त्याला प्रत्युत्तर म्हणून सर्व शक्ति एकवटून मार कसा द्यावा हें त्याला उत्तम अवगत होत. नेहमीच्या भाडकुदळ नि तामसी स्वभावामुळ मारामाऱ्याचे अनेक प्रसग त्यान पाहिले होते, तो अनुभवी मुष्टियोद्धा होता. उलट हिमतला मारामाऱ्याचा अनुभव फारच कमी. पण इतक्या त्वेषान मुष्टिप्रहार करणारा नि स्वतःच्या तोंडावर, नाकावर, कानशिलावर, डोळ्यावर, हनुवटीवर नि बरगड्यावर होणारे दौलतचे मुष्टिप्रहार जणू आपल्याला समजतहि नाहींत अशा निगरगट्टपणान त्यावेळी लढणारा हिमतसारखा योद्धा दौलतच्या आठवणींत नव्हता. हिमतच्या अगी जणू भूतच सचारल होत.

लौकरच दौलतचा ओठ फुटला, त्याच्या डाव्या डोळ्यावरची कातडी फुटून काळी निळी झाली, त्याच्या नाकातून भळभळां रक्त गळू लागून त्याचे ठिपके दौलत डेकवर पवित्र्यात नाचे तेव्हा डेकवर ठिपकू लागले. दौलत पायावर उभा होता अजून, पण क्षणाक्षणान ते अवघड व्हायला लागल. हिमतचे मुष्टिप्रहार घणाच्या घावाप्रमाण अचूकपणान न् प्रचड शक्तीन दौलतच्या मर्मावर लागत होते. त्या माऱ्याच्यापुढ निभाव लागण अशक्य अस दौलतलाहि वाटू लागलं.

दमछाक झालेल्या तुटक आवाजात त्यान विचारल, " तू मुष्टियुद्धाचं आव्हान दिलस म्हणून तें मीं स्वीकारल खर—पण कशासाठीं तू इतका अटीतटीन माझ्याशीं लढतोस हिमत ? "

आपल्या शब्दावर एकीकडे मुष्टिप्रहारानीं ताल देतच हिमत म्हणतो, " नीचा ! कुठल पाप केल मी पूर्वजन्मी म्हणून माझा तू सहोदर झालास ? मी कशासाठीं मारीत आहे तुला ? थाब, तुझ्या या पाशवी शक्तीची रग अगोदर जिरू दे. ज्याच्या जोरावर तू उन्मत्त-

पणान सार तुडवीत हिंडतोस ते हें तुझ शरीर हतवीर्य होऊन, पराभूत होऊन पदतली लोळूं दे. मग तुझ्या मनात शौर्य केवढ आहे याची प्रचीति तुला येईल. तुझ मन कस कमकुवत, निर्बल आणि भित्र आहे याची खात्री पटेल. तुझी मी चामडी लोळवणार आहे, आणि तुझ्या मरत्या डोळ्याना तूं भ्रष्ट केलेल्या त्या निष्पाप मुकुलचा देह दाखवणार आहे. मृत्यूच्या पूर्वक्षणीं तुझ्या कानाना तुझ्या पापाचा पाढा ऐकविणार आहे मी. म्हणजे मरताना तुझ्या नीचत्वाची तुला यथार्थ कल्पना येईल. तुझ हें शरीर सोडून जाताना, तुझ्या आत्म्याला तुझ्या पापस्मृतीच्या अवजड लोखडी शृखलाच्या खळखळाटात पुढचा मार्ग चालावा लागू दे." दौलतची सहनशक्ति सपुष्टात आली होती.

"आता फार वेळ नाहीं उरला. हा घे एक ठोसा! आणखी हा! नि हा!!" हिमतच्या त्या त्या प्रहारानं दौलतची मृत्युघटका खरीच जवळ येत असावी, अशा त्वेशान हिंमत मारीत होता, आणि त्याला आणखी थोडा वेळ मिळता तर हिमतन आपले शब्द खरे केलेहि असते, पण--

दौलतच्या सुदैवान राणी स्वस्थ बसली नव्हती. आरण सुरू केलेलं चक्र कुठवर फिरल आहे, हें पाहण्याचा मोह तिला आवरला नव्हता. मुकुलचा घात तिच्या इच्छेप्रमाणेंच पार पडला होता. हिंमत आणि दौलतच मुष्टियुद्ध ती आडून पाहत होती. त्याचा उघड परिणाम म्हणजे हिमतच्याकरवीं होणारा दौलतचा मृत्यु तिला सोयीचा नव्हता. अधाऱ्या रात्री एकान्तात दोन भावाची होणारी लढत आणि मुकुलचा घात या गोष्टी न साधलेल्या सधीप्रमाणें वाया जात्या. पण या प्रकाराची, आपण नामानिराळे राहून, बोंबाबोंब करविली, वरच्या घटना जगजाहीर करून कान्होजीची नाचक्की आणि मुकुलची बेअब्रू परस्पर कान्होजीच्या मुलाकरवीच झाली, तर खर कौशल्य असा राणीचा विचार.

तिन जिजीकड जाऊन तिला उठवल आणि ती म्हणते, "अहो

जिजी ! माझा कसा तो डोळा आज लागत नाहीं. त्या भूतचेष्टेचे प्रकार ऐकल्यापासून तर माझ्या मनान धास्ती घेतली आहे. झोप अगोदरच लागत नाहीं, नि त्यात जागेपणी एकट खोलीत राहायच म्हणजे तर मला अशक्य वाटत. जरा कुठ खुट् झाल कीं वाटत, चंद्रदत्ताच्या खोलीत त्याना दिसल तसं तर काहीं दिसणार नाही ना भूत ? त्यात खोलींत उकडनयूहि अतोनात नि डेकवरहि एकट जायचा धीर होत नाहीं मला. म्हणून तुम्हाला उठवल. जिजी, तुमचा प्रेमळ, आपुलकीचा स्वभाव म्हणून अस मोकळेपणान तुमच्याशी बोलायचा धीर होतो—खरच माझ्या आईची आठवण होते बाई तुम्हाला पाहून, खर म्हणजे तुमच्यात दुसऱ्यासाठी खस्ता खायचा हा गुण जास्तच आहे माझ्या आईपेक्षा."

एक ना दोन, सतरा तऱ्हेन राणीन साखर पेरली. जिजी झोपेतन उठल्यान प्रथम जरी त्रासली होती, तरी तो त्रास तोंडावर दाखवण आपल्या झालेल्या गुणवर्णनाला धरून नाहीं असें पाहताच तिन त्रासिक मुद्रा बदलून तोंडावर स्मित नि वात्सल्य आणण्याचा प्रयत्न केलाच. ती म्हणाली, " तुला बर वाटत नाहीं ना ? चल तर मी येते तुझ्याबरोबर डेकवर मोकळ्या वाऱ्यात."

" नको जिजी ! मला फार भय वाटत बाई ! "

" अग भय कसल ? मी आहे ना तुझ्याबरोबर ? या जहाजावर मी खूप राहिलेली आहे. मला काहीं भीति वाटत नाही. डेकवर जाऊ, तुला अमळ बर वाटल, म्हणजे मग माझ्याच खोलींत तूं येऊन नीज म्हणजे झाल."

जवळ जवळ जिजीचाच जणू काहीं हट्ट म्हणून राणी डेकवर आली ! आणि— मुष्टियुद्धात गुतलेल्या हिंमत-दौलतच्या जवळ आल्याबरोबर तिन इतक्या भयानक किंचाळ्या मारण्यास सुरुवात केली, की त्या ऐकून रक्तच गोठाव. त्या किंचाळ्या ऐकून सार जहाज जाग होऊन डेकवर धावलं. दिवे आणि मशाली लावून खलाशी जमले. कान्होजीराव

आले. आलं नाहीं अस कुणीच उरल नाहीं, येवढ पाहून राणीनं धाड्दिशीं अग टाकून दिल. जणू काही भयान तिला मूर्च्छा आली होती! आलेल्या खलाशानीं दौलत-हिमतला आवरून धरून बाजूला केल आणि दौलतचा मृत्यु टळला. चद्रदत्ताची खोली सर्वात जवळची असल्यान व ती मुकुलकडे असल्याच माहीत असल्यान मूर्च्छेना आलेल्या राणीला उचलून दोघांनी त्याच खोलीत साहाजिक नेल, त्यामुळ मुकुलची झालेली बेइज्जत चुकून सर्वाच्या दृष्टीआड राहायची असा सभव होता तोसुद्धा नाहीसा झाला. आणि झालेल्या प्रसगाचा पूर्ण बभ्रा नि वाच्यता सुरू करण्याच श्रेय सुद्धा अतिशय नामानिराळं राहून राणीन स्वत:कड घेतल.

कान्होजीरावानी तोडावर खळबळ दिसू न दिली तरी त्याच्या मनात काय झाल असेल त्याची कल्पनाच केलेली बरी. ही गोधळून जाण्याची किंवा रागाच्या भरात वाहवून जाण्याची वेळ नव्हती. राणी-ला तिच्या खोलींत नि मुकुलला जिजीच्या खोलीत त्यानीं पोंचविल. हिंमतला खोलीबाहेर न पडण्याचा हुकूम सुनावला. दौलत तर आणखी चार दिवस हालचाल न करू शकणाऱ्या स्थितींत होता. कान्होजीरावानीं मागच्या नि पुढच्या डेक्‌वर पहारेकरी नेमले आणि स्वतः सायतारेच्या क्वार्टर डेक्‌वर 'ड्यूटी' देण्यास सुरुवात केली. सगळ्या लोकाना आपआपल्या ठिकाणी परत जाण्यास हुकूम करून "दिवस उजाडल्यावर मला काय करायच ते मी करीन" म्हणून त्यानीं सर्वांना डेक्‌वरून आपआपल्या जागी पिटाळल.

कान्होजीरावाच्या हुकुमाप्रमाण जरी सगळे लोक परतले तरी वरचा अनपेक्षित आणि विपरीत प्रकार पाहिल्यावर रात्रीचे उरलेले चारपाच तास स्वस्थ झोपेतच काढण्याच कुणालाच शक्य नव्हत. खलाशी मडळींत तर यावर सारखी चर्चा चालू होती.

सर्वसाधारणतः जहाजावर कडक शिस्त पाळली जाते ती जहाजाचा सर्व कारभार निर्वेध चालावा म्हणून. अर्थात्च सत्ता एक हातीं ठेवण

भाग असत. शिस्तीच्या अमलबजावणीत हुकुमतीच जोखड मानेवर वागवणाऱ्या खलाशाना जरी ते जाचक वाटल तरी त्यातून सुटका नसते. आणि ही हुकमत गाजवणाराला आपला आब राखण्यासाठीं खालच्या कुणाशीहि न मिसळता जवळ जवळ एकलकोंडेपणान राहाव लागत. या अत्यल्प परिचयान त्याच्याबद्दल अवज्ञा होण्याचा सभव कमी होतो, आणि त्या अधिकारी व्यक्तीबद्दल मनात एक प्रकारें धाक उत्पन्न होतो. म्हणूनच कप्तानाला सर्वांसमोर तोलून मापून बोलाव चालाव लागत, आणि नाटकीपणान आपल्या मोठेपणाला शोभेस वर्तणुकीच मखर भोवती निर्माण कराव लागत.

अशा शिस्तीच्या लगामात धरलेल्या अवखळ नि आडदांड खलाशासमोर जर कप्तानाची शोभा झाली तर त्यान जहाजाच्या शिस्तीला केवढा बाध येत असेल! खुद्द कप्तानाच्या पोरानीं एका मुलीची बेअब्रू करून, तिच्यावरून सुदोपसुदी करावी, नि अशा उच्छृखल मूर्खांना सायतारेवर अधिकारी म्हणून राहू द्यायच, येवढच नव्हे तर त्याच्या दरडावणीला भीक घालीत त्याच्या हुकमतीखाली राबायच! कडक शिस्तीचा बडगा खलाशाच्या डोक्यावर धरणाऱ्या कप्तानसाहेबाच्या हातून अधिकारपदावर असलेल्या नि खुद्द त्याच्या मुलाच्या गैर वर्तणुकीच्या बाबतींत आता काय फैसला होतो हें पाहण्यास खलाशी टपले होते.

खलाशीमडळात अक्कल बेताबाताचीच होती. त्यामधेंच लखीराम नि बनबीर कलकत्त्याहून आलेले. दौलतन त्या दोघाना खलाशी सफरीसाठीं निवडून घेताना, नेमून घेतल होत. बदरात ओळख झालेला मौजा गडी व चागला खलाशी अधिकारी इतकीच माहिती लखीरामाबद्दल त्याला होती, आणि बनबीर तर गयावया करून "मला परत होडग नको, खलाशी म्हणून अन्नाला लावा" म्हणू लागल्यान दाखल करून घेतला गेलेला.

लखीरामान आपल्या गोडव्या वाणीन, कामांतल्या हुशारीन, आणि

सर्वांना सदा हसतमुखानं मदतीसाठी हात पुढं करण्याच्या युक्तीनं साऱ्या खलाशी मंडळीचं मन केव्हाच काबीज केलं होतं. खुद्द सारंगाला नि तांडेलाला स्तुतीनं खूष ठेवून त्याचीहि मर्जी त्यानं संपादन केली होती. नावापुरता सारंग जरी खलाशांवरचा मुकादम होता तरीसुद्धा खरा म्होरक्या लखीरामच झाला होता. त्याच्याच कलानं खलाशीमंडळ चाले. येवढा जुना, विश्वासू झिलमिट आणि सावळ्या, आतापर्यंतच्या लखीरामाच्या वागणुकींत कांहीं सुद्धा छक्केपंजे न दिसल्यानं, त्याच्याशी दोस्तीनं वागत होते.

राणी कारस्थानीपणात गुरु असली तरी लखीराम हा परात्परगुरु होता! कलकत्त्याला राणीकडे तिच्या आईकरवी अप्रत्यक्षपणानं निरोप पाठविण्यात त्याचंच अंग होतं. अनायासे उपलब्ध झालेल्या राणीच्या आणि हिंमत-दौलतच्या जुन्या कुलकलहाचा बरोबर फायदा स्वतःच्या कार्यसाधनात करून घेण्याची शक्कल लखीरामाचीच. एखाद्या निष्णात खेळाडूपणानं बुद्धिबळाच्या पटावरच्या या अनेक प्याद्याच्या हालचाली तो बाजूला राहून करीत होता. फक्त राजाला शह लागला की मग सारा डाव उधळून, सगळ्यांना स्वतःच्या खिशात घालावं आणि सायंतारेचा कबजा घ्यावा हें त्याचं साध्य!

राणी परस्पर सायंतारेवरील शिस्त पोखरून टाकीत आहे तें तो समाधानानं पाहत होता.

लखीराम पाळीपाळीनं मागच्या भागी पहारा करण्यासाठीं आला; त्यानं लक्ष ठेवून आजूबाजूस कुणी नाहीं हें पाहून झाल्यावर राणीच्या खोलीच्या खिडकीवर टिचक्या मारल्या. राणी बाहेर आली, आणि उपड्या करून ठेवलेल्या डेकवरच्या होडग्याच्या आडोशाला तिनं लखीरामाची गांठ घेतली.

राणी म्हणाली, "लखीराम! परवा एकदा बोलताना दौलत म्हणाला कीं तू जरी खलाशी म्हणून काम स्वीकारलं आहेस तरी जहाजावर तूं अधिकाराचीं कामं केलेलीं आहेस; खरं का हें?"

" खर आहे राणीबाई ! "

" मी तुला अशाकरिता बोलावल होत कीं, जर या जहाजावर अधिकाऱ्याची नड पडली आणि मी तुझी नेमणूक करायची व्यवस्था केली तर तुला जमेल का तें ? "

" मेहेरबानी होईल फार आपली गरिबावर, पण या जहाजावरच्या जागा साऱ्या भरल्या आहेत."

" भरल्या असल्या तरी त्या रिकाम्या होतील. सध्याच्या अधिकाऱ्यानी कसा गोंधळ केला तो पाहिलात तुम्हीं सर्वांनी. या जहाजावर माझा इतका माल आहे, मीं भाड दिल आहे या जहाजासाठीं ते सर्व अधिकाऱ्याच्या नालायकीन वाया घालवायची माझी इच्छा नाहीं."

" राणीबाई ! आपणच विषय काढला म्हणून बोलतो, नाही तर माझी गरिबाची कशाला लुडबुड ! या अधिकाऱ्याच्या वर्तनान सार खलाशीमडळ फारच बिथरल आहे. ते म्हणतात या साऱ्या प्रकरणाचा नीट न्याय करा, नाहीं तर या बेबंदशाहींत काम करायला आम्ही तयार नाहीं. त्यानीं मलाच कप्तानसाहेबाना त्याच सर्वांच म्हणण जाऊन सागायचा आग्रह धरला होता. पण मी बिचकत होतों. मीं म्हटल आपणच या जहाजाच्या वास्तविकपणें मालकिणी-सारख्या. तुम्हालाच आमच गाऱ्हाण सांगू."

" आणि मी कप्तानाना सागून त्यानी ऐकलं नाहीं तर ? "

" तर मी आणि सार खलाशीमडळ राणीजी, तुमच्या पाठीशीं आहों. तितकीच वेळ पडली तर तुमच जहाज मी हाकारीन. माझी परीक्षा उतरलेली आहे."

" कशावरून ? "

लखीरामान खिशातून एक कागदाची घडी काढून दाखविली.

ती पाहून राणीच समाधान झाल. राणीनं लखमीरामाकडून आपला शब्द पाळीन म्हणून आणभाक घेवाविली.

तो जाण्यापूर्वी राणीला म्हणतो, " राणीजी ! या माझ्या शपथेवरनं आठवण झाली. एक विचारू का ? "

" काय ? "

" एक अर्धवट खलाशी बोटीवर आहे. तो सागू लागला की आपण जहाजावर आलात तें आपली काही कुलदेवतेची शपथ पुरी करावयाची होती म्हणून आला आहांत–सफरीसाठीं नाहीं."

" कोण म्हणत ? "

" मी नाहीं म्हणत राणीजी, तो खलाशी सागत होता मला सहज. तो म्हणाला, राणीजींच्या कुलातल्या माणसानी शपथ पुरी न केल्यास देहदडाच शासन असत म्हणे."

" कसली शपथ ? "

" ते मी कशाला विचारू त्याला ? मला कशाला नसत्या चौकशा ! मीं म्हटल, असेल काहीं तरी, रामेश्वरची यात्रा करून तिथला सेतु आणून गगेंत टाकायची शपथ, नाहीं तर द्वारकेच्या यात्रेची. असतात अनेक कुलात अशा शपथा."

" तो आणखी काही म्हणाला का ? "

" इतकच म्हणाला कीं राणीजी इतक्या तरुण, चागल्या आहेत, त्याना शपथ मोडल्यासाठी देहदड देण्यासारखे प्रसग येणारच नाहींत. त्या शपथा पाळणार नाहींत, तर पाळील तरी कोण दुसरं ? "

" हे बघ लखीराम ! मीं तुला जहाजाचा अधिकारी करीन म्हटल आहे तेव्हा तूहि त्या उपकाराला जागल पाहिजेस. त्या खलाशावर नीट लक्ष ठेविल पाहिजे. कोणता खलाशी हें म्हणत होता तें मला एकदा दाखीव. माझ्या गुप्त यात्रेचा बभ्रा त्यान करण मला आवडत नाहीं."

" दाखवीन एखादे वेळीं, पण आपण काळजी करू नका. मी त्याला चागला जरबेंत वागवतों, आणि तो माझ ऐकतो सुद्धा." इतक्यात कुणाची तरी चाहूल लागली. राणी परत गेली. लखीराम

“ खर आहे राणीबाई!”

“ मी तुला अशाकरिता बोलावल होत की, जर या जहाजावर अधिकाऱ्याची नड पडली आणि मी तुझी नेमणूक करायची व्यवस्था केली तर तुला जमेल का तें ?”

“ मेहेरबानी होईल फार आपली गरिबावर, पण या जहाजावरच्या जागा साऱ्या भरल्या आहेत.”

“ भरल्या असल्या तरी त्या रिकाम्या होतील. सध्याच्या अधिकाऱ्यानी कसा गोंधळ केला तो पाहिलात तुम्हीं सर्वांनी. या जहाजावर माझा इतका माल आहे, मीं भाड दिल आहे या जहाजासाठीं ते सर्व अधिकाऱ्याच्या नालायकीन वाया घालवायची माझी इच्छा नाहीं.”

“ राणीबाई! आपणच विषय काढला म्हणून बोलतो, नाही तर माझी गरिबाची कशाला लुडबुड! या अधिकाऱ्याच्या वर्तनान सार खलाशीमंडळ फारच बिथरल आहे. ते म्हणतात या साऱ्या प्रकरणाचा नीट न्याय करा, नाहीं तर या बेबंदशाहींत काम करायला आम्ही तयार नाहीं. त्यानीं मलाच कप्तानसाहेबाना त्याच सर्वांच म्हणण जाऊन सागायचा आग्रह धरला होता. पण मी बिचकत होतों. मीं म्हटल आपणच या जहाजाच्या वास्तविकपणें मालकिणी-सारख्या. तुम्हालाच आमच गाऱ्हाण सागू.”

“ आणि मी कप्तानाना सांगून त्यानीं ऐकल नाहीं तर ?”

“ तर मी आणि सारं खलाशीमडळ राणीजी, तुमच्या पाठीशीं आहों. तितकीच वेळ पडली तर तुमच जहाज मी हाकारीन. माझी परीक्षा उतरलेली आहे.”

“ कशावरून ?”

लखीरामान खिशातून एक कागदाची घडी काढून दाखविली.

ती पाहून राणीच समाधान झाल. राणीनं लखमीरामाकडून आपला शब्द पाळीन म्हणून आणभाक घेवाविली.

तो जाण्यापूर्वी राणीला म्हणतो, “ राणीजी ! या माझ्या शपथेवरनं आठवण झाली. एक विचारू का ? ”

“ काय ? ”

“ एक अर्धवट खलाशी बोटीवर आहे. तो सागू लागला की आपण जहाजावर आलात तें आपली काहीं कुलदेवतेची शपथ पुरी करावयाची होती म्हणून आला आहात–सफरीसाठीं नाहीं.”

“ कोण म्हणत ? ”

“ मी नाहीं म्हणत राणीजी, तो खलाशी सागत होता मला सहज. तो म्हणाला, राणीजिच्या कुलातल्या माणसानी शपथ पुरी न केल्यास देहदडाच शासन असत म्हणे.”

“ कसली शपथ ? ”

“ ते मी कशाला विचारू त्याला ? मला कशाला नसत्या चौकशा ! मीं म्हटल, असेल काहीं तरी, रामेश्वरची यात्रा करून तिथला सेतु आणून गगेंत टाकायची शपथ, नाहीं तर द्वारकेच्या यात्रेची. असतात अनेक कुलात अशा शपथा.”

“ तो आणखी कांही म्हणाला का ? ”

“ इतकच म्हणाला की राणीजी इतक्या तरुण, चागल्या आहेत, त्याना शपथ मोडल्यासाठी देहदड देण्यासारखे प्रसग येणारच नाहींत. त्या शपथा पाळणार नाहींत, तर पाळील तरी कोण दुसरं ? ”

“ हे बघ लखीराम ! मीं तुला जहाजाचा अधिकारी करीन म्हटल आहे तेव्हा तूहि त्या उपकाराला जागल पाहिजेस. त्या खलाशावर नीट लक्ष ठेविल पाहिजे. कोणता खलाशी हे म्हणत होता तें मला एकदा दाखीव. माझ्या गुप्त यात्रेचा बभ्रा त्यान करण मला आवडत नाहीं.”

“ दाखवीन एखादे वेळीं, पण आपण काळजी करू नका. मी त्याला चागला जरबेंत वागवतों, आणि तो माझ ऐकतो सुद्धा.” इतक्यांत कुणाची तरी चाहूल लागली. राणी परत गेली. लखीराम

पहारा करण्याच्या कामात गढल्याप्रमाणें येरझारा घालू लागला. पालथ्या होडग्यात कुणी तरी सुस्कारा टाकल्यासारखा आवाज झाला; पण तो लक्षात येण्यास कुणीच जवळपास नव्हत !

या वरच्या संभाषणान राणीच्या मनाला थोड अस्वस्थ वाटलं, पण अल्पकाळच. आपल्या बुद्धिमत्तेवर तिचा विश्वास होता आणि संकट गुदरल तरी त्याला आपण पुरे पडून उरू अशी तिला धमक होती.

राणीन जाऊन कान्होजीराजाची भेट घेतली आणि त्याच्या- पुढं असा कागावा केला कीं बस्स! सायतारा जहाजावर शिस्तच नाहीं, पहिल्याच दिवशी एक वृद्ध गृहस्थ नापत्ता झाला. मग त्या बिचाऱ्या अजाण पोरीवर कुणी अनान्वित प्रकार केला. ड्यूटीवर राहण्याचं सोडून अधिकारपदावर असलेले कप्तानाचे दोन्ही मुलगे डेकवर आपसात प्राणांतिक लढत करीत आहेत. काय हा गोंधळ! अगोदर कल्पना असती तर सायतारा आरण भाड्यान घेतलीच नसती, किंवा कान्होजीरावाशीं मोत्याच्या व्यापाराच्या वाढीसबंधानं कोणताच व्यवहार केला नसता. आपल्या भोळ्या नि चांगल्या स्वभावाचा कान्होजीराव गैरफायदा घेत आहेत. या जहाजावर काहींच सुरक्षितता नाहीं. या साऱ्या प्रसंगाची कान्होजीरावानीं पुरी चौकशी केली पाहिजे, आणि ती सुद्धा सर्वांसमक्ष. मुकुलला अन्याय करणाऱ्याशींच तिचं लग्न करवून दिलं पाहिजे म्हणजे त्याला अद्दल घडेल, आणि केल्या गुन्ह्याचं परिमार्जन त्याला कराव लागेल. कामांत दुर्लक्ष करून सर्वांना धोक्यात आणणाऱ्या हिंमतला अधिकारपदावरून बडतर्फ करून खलाशात त्याची नेमणूक शिक्षेखातर काहीं दिवस झाली पाहिजे. अशा कडकपणान शिस्तीची अमलबजावणी झाल्याशिवाय आपलाच काय पण कुणाचाच विश्वास कान्होजीरावावर उरणार नाहीं, इत्यादि गोष्टी राणीन बोलावून दाखविल्या.

एकंदर जहाजावरच्या सर्वांचा नूर पाहून कान्होजीरावानीं डेकवर

सर्वांना बोलावून आणल होत. फारसा गोधळ न होऊ देता चद्रदिशीं उघड चौकशी करून टाकावी; आणि शिक्षा ठरविताना मात्र जरा काळजी घेऊन कौशल्यान वागाव अस त्यांनीं ठरविल होत.

क्वार्टर डेकवर कान्होजीराव उभे होते. त्याच्यापुढ खालच्या बाजूस सार खलाशीमडळ जमा झालेल होत. क्वार्टर डेकवर कान्होजीरावाच्या बाजूला जिजी, मुकुल नि राणी, हिंमत वगैरे उभीं होती. दौलतला बसण्यास खुर्ची दिली होती--त्याच्यान अजून चालवत सुद्धा नव्हत. माग सुकाणाशीं लखीराम उभा होता. तो मात्र सर्वांच्या दृष्टीआड होता.

"या जहाजाचा कप्तान म्हणून ही चौकशी मी तुम्हा सर्वांसमक्ष करीत आहे, निःपक्षपातीपणान शिस्तभगाला योग्य तें शासन मी करीन, आणि त्या अमलबजावणीत तुम्ही सर्व मला योग्य ती मदत कराल हीहि माझी खात्री आहे." कान्होजीराव म्हणाले.

"मुकुलवर ज्या कोणी अत्याचार केला, त्याच्याकड मुकुलन बोट दाखवाव." राणीन मधेच तोंड घालून सुचविल.

आता मुकुल कात्रींत सापडली! तिला दौलतच नाव घ्याव लाग-णार, आणि ते तिच्या तोडून निघाल की दौलतला मुकुलशी लग्न करण भाग पडेल. परस्पर दौलतकडून मुकुलचा काटा निघून, हिमतला आपल्यापुढ नमविण्यास मार्ग जास्त सुकर झाला अशा खात्रीन राणी आनदली. आपल्या बुद्धिकौशल्यान या सगळ्याचे कसे धिडवडे करून आपण त्याना पकडीत धरल आहे याबद्दल तिला अभिमान वाटत होता.

मुकुल त्या दिवशी बेशुद्ध झाली होती. तिला कुणी हात टाकला तें ठाऊक नव्हत; माल त्या दिवशी कॉफी पाजणारी राणी; आणि आताचे तिचे उद्गार याची सागड तिला बरोबर घालता आली.

तिन यात राणीचा काहीं तरी डाव आहे हे ओळखल; क्षणभरच विचार केला आणि ती म्हणाली, "माझ्यावर कुणीच अत्याचार केला

नाहीं. माझ हिंमतवर प्रेम होत, आणि त्याना मी मनान वरल होत. त्यांना मीं स्वखुषीन शरीर अर्पण केल. त्यात गुन्हा कुणाचाच नाहीं, मग ही चौकशीच कशाला!"

साऱ्या जहाजावरच्या लोकाना या उद्‌गारानी स्तभित केल. ज्यानीं त्यानीं आपआपल्या बुद्धीन तर्कवितर्क केले होते. राणीनं तर आपला सारा व्यूह त्यावर आधारला होता. पण कुणालाच या प्रकाराला मुकुलकडून अशी कलाटणी मिळेल अशी कल्पना नव्हती.

"हिमतचं काय म्हणण आहे?" राणी उद्‌गारली. चार लोकात आपल्या तोडान आपली नाहक नाचक्की करून घेण्याइतका हिमत मूर्ख असणार नाहीं अस तिला वाटल.

सगळ्याचे कान नि डोळे हिमतकडे लागले, पण विशेषतः मुकुलचे! आपल्याला अतिशय प्रिय अशा हिमतवर चार लोकादेखत तो निष्पाप असताना आपणच आळ घालावा ही प्रेमाची तऱ्हा न्यारीच होती! त्याच्या "हो" किवा "नाहीं" म्हणण्यावर तिच्या अब्रूचे धिडवडे निघण अवलबून होत. डोळ्यात प्राण आणून ती हिमतच्या शब्दा-कडे कान लावून बसली होती—कारण डोळे पाण्यान डबडबल्यान तिच्या दृष्टीला काहींच नीट दिसत नव्हत.

"होय! मुकुलच म्हणण खर आहे. मीच तो!" हिमत शातपणे म्हणाला. "आपल नाव सागण जर मुकुलला योग्य वाटल, तर बस् झाल. तिचा शब्द मी खोटा ठरू देणार नाही."

सगळ्या खलाशात या शब्दानी कुजबूज सुरू झाली. मुकुलचा जीव भाड्यात पडला—पण आणखी एका व्यक्तीच्या मनात या खऱ्या निःस्वार्थी प्रेमाच्या कसोटीन स्वभावपरिवर्तनचक्र फिरू लागल. ती व्यक्ति म्हणजे दौलत! वास्तविक त्याच्यामुळ ओढवलेल्या सकटात मुकुलन विश्वासान हिंमतला मारलेली हाक नि त्या हाकेला निःस्वार्थी-पणान हिंमतन दिलेल प्रत्युत्तर या गोष्टी दौलतच्या मनात खोल रुजल्या.

ही नामी संधि पाहून कान्होजीराव म्हणाले, “ चौकशीच तर कारणच आतां नाहींसं झालं आहे; माझं तर समाधान झालं ! आता सर्वजण आपआपल्या कामावर परत जा.”

“ तुमचं झालं असेल, पण माझं झालं नाहीं. छे ! कुणाचंच समाधान असल्या चौकशीच्या या खोट्या नाटकानं होणार नाहीं.” राणी चिडून म्हणाली. खलाशांच्याकडे तोंड करून ती ओरडली, “ थांबा ! कुणी जागचे हलू नका. अशा आपसातल्या समजुतीनं चौकशी संपत नाहीं. मुकुलचा न् हिंमतचा हवा तो सावळागोंधळ असेल, त्यानीं हवा तो धुडगूस प्रेमाच्या नावाखालीं घालावा. पण त्यावरून दौलतचा खून करायला हा हिंमत का उठला ? ड्यूटी सोडून बेजबाबदारपणानं हा हवा तसा वागतो याचा अर्थ काय ? ”

कान्होजीराव आता गरम झाले होते. राणीला त्यानीं आत्तापर्यंत आदर दाखवण्याची व तिच्या उद्दामपणाकडे कानाडोळा करण्याची शिकस्त केली होती. पण आता राणीनं मर्यादा ओलांडली होती. ते संतापानं खवळून उद्गारले, “ चूप बसा राणीबाई ! तुम्हाला तुमच्या पायरीचा विसर पडलेला दिसतो. या जहाजाचा मालक नि कप्तान मी आहे. काय चौकशा करायच्या, काय हुकूम सोडायचे असतील ते मी सोडीन. अलबत्या गलबत्या उतारूचं ते काम नाहीं. केवळ जहाज भाड्यानं तुम्हीं घेतलं व तुम्ही बाई माणूस म्हणून तुमची गय केली. पण यापुढं एक शब्दहि बोलाल तर खबरदार ! मी साऱ्याना चौकशी संपली——परत जा म्हणून हुकूम दिला तोच खरा. माझ्या हुकुमावर उलट हुकूम ऐकण्याची या जहाजावर मला सवय नाहीं !

“ नसली तर मी करीन——मी या जहाजाची मालकीण आहे ! ”

“ या बाईचं तर डोकं फिरलेलं दिसतं ! माझ्या हुकमतीचं अतिक्रमण करणाराला दर्यावर काय शिक्षा असते तें पाहा. सारंग ! या मूर्ख नि उद्दाम बाईला पकड, नि तिच्या खोलींत तूर्त तिला बंदिस्त करून ठेव——”

पण सारंग हलला नाहीं. कुणीच हलल नाहीं. कुणाचीच हलण्याची प्राज्ञा झाली नाहीं. राणीनं केलेल्या खुणेबरोबर लखीराम पुढे आला. सुकाणाचं चाक त्यानं रस्सीन एका जागी बाधून ठेवल होत. सर्वांच्या मागं असल्यान तो पुढे येईपर्यंत कुणाला कळलहि नाही. त्याच्या दोन्ही हातात पिस्तुल होती. एक त्यान कान्होजीच्या बरगडींत खुपसल होत आणि दुसऱ्यान क्वार्टर डेकवरच्या सगळ्याची अडवणूक केली होती. लखीरामान फितवलेल्या तिघा खलाशाच्या साहाय्यान बनबीरनं खालच्या डेकवरच्या साऱ्या खलाशाना कोंडीत धरल. त्या सर्वांच्या जवळ लखीरामान पुरवलेली पिस्तुल होतीं. झिलमिटन प्रतिकार करायला सुरुवात केली, पण लखीरामाची गोळी त्याच्या हाताच्या पंजातून अचूक आरपार गेली—त्यामुळे तर सर्वांना जास्तच जरब बसली. आड आले तर लखीराम कापल्याशिवाय राहायचा नाही हें सर्वांना कळून चुकल

"हे बड आहे तर!" कान्होजीराव उद्‌गारले.

# १७

कान्होजीला हातकड्या घालण्यात आल्या, तेव्हा राणी खदखदून हसत होती. "का कान्होजीराव! कोण आहे या जहाजाचं मालक आता? तुम्ही का मी? कोण कुणाला गिरफदार करणार? माझं डोकं फिरलं नव्हतंच पण आता तुमचं फिरू नये याची काळजी घ्या."

राणीनं बंद झालेली चौकशी पुन्हा सुरू केली, त्यापेक्षा खुनशीपणानं आपल्या रागालोभाचं उट्टं काढण्याची सुरुवात केली.

"हिंमत!" ती म्हणते, "मी तुला मघाशी तुझे गुन्हे ऐकविले, पण त्यात तुझा एक मुख्य गुन्हा उच्चारला नाहीं. तो म्हणजे चंद्रदत्त चट्टोपाध्यायाचा खून! अपरात्रीं तो म्हातारा भिऊन म्हणे उठला नि इतर कुणाला न सांगता फक्त तुझ्याचकडे मदतीला आला. त्याला डेक्‌वर सोडून तू म्हणे भूत शोधायला खालीं गेलास, नि इतक्यांत चंद्रदत्त बेपत्ता झाला! वाः! काय पण बेमालुम कारस्थान. चंद्रदत्ताला तूच समुद्रात ढकललं नाहींस, त्याच्या खोलींतून तूच त्याला हुसकून काढलं नाहींस बाहेर, याला काहीं पुरावा? तिसरं कुणीच हे पाहिलं नाही– चंद्रदत्त खरं सांगायला परत येत नाहीं, तेव्हा भुताखेताच्या चेष्टा मदतीला घेऊन तू हवं ते बनवून सांगितलंस तरी कुणाला

कळणार? दौलतला परवा मध्यरात्रीं डेकवर हुसकून आणून तू जिवे मारायचा घाट घातला नाहींस का? तसाच चद्रदत्ताचा प्रकार. फक्त दौलत जवान असल्यान तुला आवरला नाहीं, आणि चद्रदत्त अशक्त म्हातारा, तो काय प्रतिकार करणार!"

"चद्रदत्ताना मी कशाकरिता सुखासुखी मारीन, राणी!" हिंमतन विचारल.

"कशाकरिता? अरे मुकुलशी स्वैराचार करता यावा म्हणून! तिच लग्न करून द्यायची चद्रदत्ताची खरी इच्छा. पण तू तिला फितवून लग्न होऊ दिल नाहींस. आता चद्रदत्ताबरोबर ती चितगावला परत जाऊन काय फायदा तुला, नि चद्रदत्ताची आडकाठी कशाला मधे? दिली म्हाताऱ्याची गुपचूप विल्हेवाट लावून! मग तुला दौलतबद्दल मत्सर वाटू लागला म्हणून त्याच्याहि जिवावर तू उठलास परवा, हीं तुझीं कारस्थान कुणाला खरी सुद्धां न वाटतीं; पण बर झाल, तुमच्या गाढ नाही पण गाढवी प्रेमाची कबुली तुम्हींच दोघानी आपल्या तोडानीं थोड्या वेळापूर्वी सर्वांसमक्ष दिलीत."

सर्वजण राणीन सांगितलेली हीं नवी बनावट ऐकत होते. खुद्द हिंमत नि मुकुल यानाहि आपल्या वागणुकींतून असा अर्थ लावला तर आपली बाजू किती लगडी पडते याची जाणीव झाली, पण राणीचं डोक याहूनहि सुपीक होत!

"हा सगळा प्रकार, कान्होजीराव तुमच्या मदतीन, समतीन चालला होता. आपल्या खुनी मुलाची बाजू सावरण्यासाठी, केवळ मी खरी गोष्ट—माझे सशय बोलून दाखवीत होतें म्हणून—मला या ना त्या कारणान बदी करून भेवडावयाचा तुमचा बेत! नाहीं तर मी उघड चौकशी करा म्हणत असतां तुमचा इतका विरोध का? 'बड केल' म्हणून माझ्यावर तोहमत घेत तुम्ही मला परिणामाचा धाक दाखवितां! पण मी परत गेल्यावर योग्य अधिकाऱ्यांकडे स्वतःच तक्रार गुदरणार आहे. एक निरुपद्रवी, श्रीमत विधवा, की जिला एका फतरुड दरिद्री

कप्तानाच भिकारड जहाज बंड करून हस्तगत करण्याची यत्किंचितहि जरूरी नाहीं--कारण सरळपणान तिला तसलीं दहा जहाज विकत घ्यायची ऐपत आहे! ती बंड उभारील आणि तुमच्यासारखे अनुभवी, कुशल कर्णधार तोवर चुरमुरे खात स्वस्थ बसतील हें कुणाला तरी खर वाटेल? उलट अनायासे सफरीवर आलेल्या या भोळसट विधवेला धमकावण्या दाखवून भिववाव, तिला वश करून घ्याव म्हणजे तुमच्या धनलोभाची नि विषयवासनेची एकाच ठिकाणी सुदर सोय साधली असा तुमचा बेत! माझ्या जिवावर नि अब्रूवर प्रसंग बेतला म्हणून स्वसरक्षणार्थ तुम्हाला नि तुमच्या खुनी मुलाला मीं गिरफदार केल, आणि जहाज सुरक्षित परत नेऊन कलकत्त्याला सरकारी अधिकाऱ्याच्या हातीं--हवाली केल, तर कुणाच म्हणण त्याना खर वाटेल? मी बडखोर असते तर आपण होऊन सरकारात जाऊन कशी सादर झाले असते असाहि नाही का ते विचार करणार? मला शिक्षा तर नव्हेच नव्हे पण साऱ्या लोकाकडून आणि सरकार-दरबारातून शाबासकीच मिळेल! आणि कान्होजीराव, तुम्ही म्हातारपणी ही दगदग करीत कशाला बसता दर्यावर? त्यापेक्षा जमिनीवर उन्हात बसून खडी फोडून दोन वेळ फुकट जेवायच काम फार योग्य. त्याला मेंदूहि फार लागत नाही! नि हा हिमत तर फासावरच लटकेल! ॲहॅ रे दर्यावर्दी! काय कौशल्य, काय नौकानयन, काय सामर्थ्य, नि काय मगज! मेलेल्या उदरालाहि जास्त मगज असेल तुमच्यापेक्षा!"

इतक बोलून राणी खदखदा, पोट धरून हसली. तिच्या वकिली बोलण्यान त्या खलाशांचीसुद्धा मन फिरलीं. तिच्या बोलण्यात सत्यच आहे अस त्याना वाटू लागल, आणि ते तिच्या हुकमतीखाली बिन-बोभाट काम करण्यास तयार झाले. बंड केलं तरी जहाज हाकारायला खलाशी हवेतच. मारून मुटकून त्याच्याकडून काम करवून घेण्यापेक्षा त्याची समजूत घालून त्याच्याकडून खुषीन काम करवून घेण साधल तर जास्तच बरं होत. नि राणीन आपल्या वाक्चातुर्यान तेंच नेमक

साधलं. खलाशी परत आपआपल्या कामावर रुजू झाले. कान्होजी आणि हिमत या दोघानाहि गिरफदार करून वेगळया वेगळया ठिकाणीं जहाजातील माल ठेवण्याच्या गोदामातील खालच्या मोकळया जागी अडकवून टाकल होत. दौलत निकामी झाल्यासारखा असल्यान तात्पुरता त्याच्याच खोलींत पडून होता. मुकुल आपल्या दुर्धर प्रारब्धाच्या ओझ्याखाली वाकली होती, तर राणीचा खरा स्वभाव इतक्या उशिरा कळल्यान जिजी मनात राणीविषयीं जळत, मुकुलची जिवाभावान काळजी घेत होती.

लखीरामान कप्तानाच काम बिनबोभाट हुशारीन अंगावर घेऊन चालविल होत, आणि त्याच्या दुय्यम अधिकाऱ्याच काम मिळाल्यान बनबीरला कृतकृत्य वाटत होत.

राणी तर स्वतःच्या बुद्धिमत्तेच्या अभिमानात आणि इच्छापूर्तीच्या समाधानांत गुग होती. केवळ कुलाची शपथ म्हणून कुणाला मारण्यासाठीं काही राणी जिवाचा आटापिटा न करती; पण तिचा अव्हेर करणाऱ्या हिंमतला हालहाल करून मारण्यात जर तिची कुलशपथ आपोआप पाळली जात असती, तर एका दगडात दोन पक्षी मारल्याचं श्रेय ती घेण्यात कसूर करणार नव्हती. विशेषतः आता इतक्या कौशल्यानं हिमतला कात्रीत धरण्यात—त्या सर्वांचा पाठपुरावा करण्यात राणीला शिकारीत लाडगेतोड करतात त्या ईर्ष्येचा आनद प्राप्त झाला होता. आता तर केवळ मौजेखातर हिमतला छळून मारण्यास ती उद्युक्त झाली होती. आणि नतर दौलतचाहि निकाल लावू अशी तिची मनीषा. लखीरामान सांगितलेल्या त्या खलाशाच्या राणीबद्दलच्या धमकीवजा आठवणीच शल्य, नाही म्हटल तरी, राणीच्या मनात खुपत होतच.

एका अगदीं अंधाऱ्या, कुबट घाण येणाऱ्या अरुद कोपऱ्यात हिमत जहाजाच्या एका लाकडी खांबाला जखडून बांधलेला होता. राणी तिथं आली नि म्हणाली, " हिंमत, तुझ्या आडमुठेपणानं तूं हें सार दुःख

तुझ्यावर ओढवून घेतलं आहेस. मी तुला सामोपचाराच्या नि तुझ्या हिताच्या दोन गोष्टी सांगायला आलें आहे."

"माझं तू आत्तापर्यंत केलंस तेवढं 'हित' पुरें नाहीं का झालं?"

"हिंमत! तू माझ्याशीं तुच्छतेनं, उपहासानं वागूं लागलास म्हणून तुला या गोत्यात आणलं, पण मला हवं तर तुला फिरून अधिकाराच्या शिखरावर चढविणंहि तितकंच शक्य आहे. मी फक्त तुझ्याशी म्हणून खरं बोलतें. त्या मुकुलवर तू फार निरपेक्ष प्रेम करतोस तसंच माझ्यावर प्रेम कर. तुझ्यांत नेकी आहे, नौकानयनाचं कौशल्य आहे, तारुण्य आहे. मी श्रीमंत आहे, तरुण आहे आणि बुद्धीनंहि काहीं टाकाऊ नाहीं, हें तूसुद्धा कबूल करशील. आपण एकमेकांना अनुरूप आहों. तेवढी कबुली दे. मी तुला मुक्त करीन. सध्याचं सारं पारडं उलटं फिरवीन. फार मोठ्या फायद्यासाठीं ही अतिशय थोडी किंमत आहे."

"राणी! मी व्यवहारात पहिल्यापासूनच कच्चा आहे. नफा-तोटा मला कधींच कळला नाहीं—पण चांगलं नि वाईट कळतं. तुझ्या-जवळच्या पैशानं नव्हे, तारुण्यानं नव्हे, बुद्धीनं नव्हे, कशानंहि तुला हिंमत विकत मिळणार नाहीं."

"हिंमत! नको असा अट्टाहास करूस. मला तू फार आवडतोस." असं म्हणत राणीनं हिंमतच्या ओठाजवळ आपलं तोंड आणलं. हिंमतचे हात नि पाय सर्वच खांबाला जखडले होते. त्याला हालचाल सुद्धा करता येत नव्हती. पण त्यानं एकच गोष्ट केली. तो राणीच्या तोंडावर तिरस्कारानं थुंकला!

आता पुन्हा राणी खवळली. तिनं जाड दोराच्या हातभर लांब तुकड्यानं हिंमतला बेदम मारलं. पण त्यानं हूं की चूं केलं नाहीं. दोराचे वळ त्याच्या अंगावर उठले, कातडी फाटून रक्त वाहूं लागलं, नि त्वेषानं मारलेला दोराचा तुकडा शेवटीं मासांत रुतून, मासुंडें फोडूं लागला. तरी हिंमतच्या तोंडून सुस्कारा निघाला नाहीं—फक्त शेवटीं

साधलं. खलाशी परत आपआपल्या कामावर रुजू झाले. कान्होजी आणि हिमत या दोघानाहि गिरफदार करून वेगळ्या वेगळ्या ठिकाणीं जहाजातील माल ठेवण्याच्या गोदामातील खालच्या मोकळ्या जागी अडकवून टाकल होत. दौलत निकामी झाल्यासारखा असल्यान तात्पुरता त्याच्याच खोलींत पडून होता. मुकुल आपल्या दुर्धर प्रारब्धाच्या ओझ्याखाली वाकली होती, तर राणीचा खरा स्वभाव इतक्या उशिरा कळल्यान जिजी मनात राणीविषयीं जळत, मुकुलची जिवाभावान काळजी घेत होती.

लखीरामान कप्तानाच काम बिनबोभाट हुशारीन अगावर घेऊन चालविल होत, आणि त्याच्या दुय्यम अधिकाऱ्याच काम मिळाल्यान बनबोरला कृतकृत्य वाटत होत.

राणी तर स्वतःच्या बुद्धिमत्तेच्या अभिमानांत आणि इच्छापूर्तीच्या समाधानात गुग होती. केवळ कुलाची शपथ म्हणून कुणाला मारण्या-साठीं काही राणी जिवाचा आटापिटा न करती, पण तिचा अव्हेर करणाऱ्या हिंमतला हालहाल करून मारण्यात जर तिची कुलशपथ आपोआप पाळली जात असती, तर एका दगडात दोन पक्षी मारल्याचं श्रेय ती घेण्यात कसूर करणार नव्हती. विशेषतः आता इतक्या कौशल्यानं हिमतला कात्रीत धरण्यात—त्या सर्वांचा पाठपुरावा करण्यात राणीला शिकारीत लाडगेतोड करतात त्या ईर्ष्येचा आनद प्राप्त झाला होता. आता तर केवळ मौजेखातर हिमतला छळून मारण्यास ती उद्युक्त झाली होती. आणि नतर दौलतचाहि निकाल लावू अशी तिची मनीषा. लखीरामान सागितलेल्या त्या खलाशाच्या राणीबद्दलच्या धमकीवजा आठवणीच शल्य, नाही म्हटल तरी, राणीच्या मनात खुपत होतच.

एका अगदीं अधाऱ्या, कुबट घाण येणाऱ्या अरुद कोपऱ्यात हिमत जहाजाच्या एका लाकडी खाबाला जखडून बांधलेला होता. राणी तिथं आली नि म्हणाली, “ हिंमत, तुझ्या आडमुठेपणान तूं हें सार दुःख

तुझ्यावर ओढवून घेतल आहेस. मी तुला सामोपचाराच्या नि तुझ्या हिताच्या दोन गोष्टी सागायला आलें आहे."

"माझ तूं आत्तापर्यंत केलस तेवढ 'हित' पुरे नाहीं का झाल ?"

"हिंमत ! तू माझ्याशीं तुच्छतेन, उपहासान वागू लागलास म्हणून तुला या गोत्यात आणल; पण मला हव तर तुला फिरून अधिकाराच्या शिखरावर चढविणाहि तितकच शक्य आहे. मी फक्त तुझ्याशी म्हणून खर बोलतें. त्या मुकुलवर तू फार निरपेक्ष प्रेम करतोस तसच माझ्यावर प्रेम कर. तुझ्यात नेकी आहे, नौकानयनाच कौशल्य आहे, तारुण्य आहे. मी श्रीमत आहे, तरुण आहे आणि बुद्धीनहि काहीं टाकाऊ नाही, हें तूसुद्धा कबूल करशील. आपण एकमेकाना अनुरूप आहो. तेवढी कबुली दे. मी तुला मुक्त करीन. सध्याच सार पारडं उलट फिरवीन. फार मोठ्या फायद्यासाठी ही अतिशय थोडी किंमत आहे."

"राणी ! मी व्यवहारात पहिल्यापासूनच कच्चा आहे. नफा-तोटा मला कधींच कळला नाहीं—पण चागल नि वाईट कळत. तुझ्या-जवळच्या पैशान नव्हे, तारुण्यान नव्हे, बुद्धीन नव्हे, कशानहि तुला हिंमत विकत मिळणार नाहीं."

"हिमत ! नको असा अट्टाहास करूंस. मला तू फार आवडतोस." अस म्हणत राणीन हिंमतच्या ओठाजवळ आपल तोंड आणल. हिमतचे हात नि पाय सर्वच खाबाला जखडले होते. त्याला हालचाल मुद्धा करता येत नव्हती. पण त्यानं एकच गोष्ट केली. तो राणीच्या तोंडावर तिरस्कारान थुकला !

आता पुन्हा राणी खवळली. तिन जाड दोराच्या हातभर लाब तुकड्यान हिमतला बेदम मारल. पण त्यान हू की चू केल नाही. दोराचे वळ त्याच्या अगावर उठले, कातडी फाटून रक्त वाहूं लागलं, नि त्वेषान मारलेला दोराचा तुकडा शेवटीं मासात रुतून, मासुर्डे फोडू लागला. तरी हिंमतच्या तोंडून सुस्कारा निघाला नाहीं—फक्त शेवटीं

यातना असह्य झाल्यावर त्याची मान लुली होऊन खांद्यावर एकीकडे कलली नि तो बेशुद्ध झाला. त्या बेशुद्ध स्थितींत हिमतला सोडून जाताना राणी म्हणते, "मूर्खा! हें सार तुला व्याजमुद्दलासकट परत देईन! तू झिजून झिजून, पळ पळ मोजीत मरशील!"

राणी गेली न गेली तो कुणी तरी व्यक्ति त्या अंधारातून पुढे आली. तिन हिमतच्या जखमावर नि उठलेल्या वळावर काही स्निग्ध औषध लावल. हिमतच्या ओठाजवळ पाणी धरून त्याला तें पाजल. आणि ती व्यक्ति हिमतची शुश्रूषा करीत बराच वेळ बसली, हिमतला बांधलेली दोरी सोडून त्याला त्या अडचणींत शक्य तितक्या सुखान तिनं निजाविल.

हिमत शुद्धीवर आला तेव्हा ती व्यक्ति म्हणाली, "भिऊ नकोस. माझ्यापासून काहीं भय नाहीं तुला. माझ्या हातून तुला मदतच होईल. जहाजावर चाललेला सारा प्रकार मी पाहिला आहे."

हिंमतचा विश्वास तरी एकदम कसा बसावा? पण त्या व्यक्तीन ते ओळखून कान्होजीरावाच्या हस्ताक्षराची एक चिठी हिमतला दिली. त्यान हिंमतच बरचस समाधान झाल.

"तुला लागलं असल तरी या औषधान बर वाटेल, हे घे. आणि हें अन्न खा. तुमच्या भडाऱ्याच्या अन्नांतलच चोरलेल आहे. आता भरपूर खा नि खूप खूप झोप घेऊन ठेव. तुला पुढ काहीं दिवस फारच काम पडणार आहे, असा रग दिसतो." पुन्हा त्याला भेटण्याचं आश्वासन देऊन ती व्यक्ति तिथून गेली. आणि हिमतनहि थोड खाऊन झोंप घेण्यास सुरुवात केली.

राणीन बड उभारल्यावर बनचीराला प्रथमच जहाज कलकत्त्याकडे नेण्यास सांगितल होत. आणि बाकीच्या गोष्टींत जरी तिला पुष्कळ ज्ञान असल तरी नौकानयनाचा मुळींच गध नव्हता. त्यामुळ कलकत्त्याला जाण्याऐवजीं, जहाजाची दिशा बरोबर विरुद्ध आहे हे

तिच्या चहूंदिशी ध्यानात येणं शक्य नव्हतं. शिवाय वाऱ्याच्या अनुकूल-प्रतिकूलतेचा सावळा गोंधळ तिला अगम्य होता.

कान्होजीरावाना मात्र ही गोष्ट ताबडतोब कळली. ज्या अज्ञात व्यक्तीनं हिंमतचा समाचार घेतला होता, त्याच व्यक्तीनं कान्होजी-रावाचीहि विचारपूस केली होती. कान्होजीरावानीं बोटीच्या कोणत्या अंगावर सूर्य उगवला, शिडं कोणत्या बाजूला भरलीं आहेत, किती व कोणतीं उभारलीं आहेत, पाण्याचा रंग कसा आहे अशा थोड्याशा वेचक पण साध्या प्रश्नांनी त्या व्यक्तीकडून सायतारेची सारी माहिती काढली.

उभा जन्म दर्यावर्दीपणात काढला कान्होजीरावानीं तो कांहीं फुकट नव्हता. त्याना या बंगालच्या उपसागराचीच नव्हे, तर बहुतेक साऱ्या समुद्रमार्गांची माहिती अतिसूक्ष्म नि सविस्तर होती. कैदेंत पडल्यावर त्यानीं पहिली गोष्ट केली, ती म्हणजे बाजूला उभ्या असलेल्या सामानातलि एका लाकडी खोक्याच्या, त्यातल्या त्यात स्वच्छ, फळीवर त्या पेटीचाच एक खिळा उपसून त्यानं चरा पाडीत बंगालच्या उपसागराचा ठोकळ नकाशा काढून त्यावर जरूर त्या किनाऱ्याच्या रेषा, अक्षांश-रेखांशाची मुख्य वृत्तं इत्यादि काढलीं होतीं. कलकत्त्याहून जहाज कुठवर आलं, किती अंतर उरलं आहे इत्यादि गोष्टी त्याना खडान्‌खडा ठाऊक होत्या.

या नकाशावर त्या अज्ञात उपकारी व्यक्तीकडून उपलब्ध झालेली सर्व नवी माहिती विचारात घेऊन सायतारेची अद्यावत् परिस्थिति कान्होजीराव नकाशावर मांडीत. कुणाची चाहूलच लागली, तर ती पेटी नकाशा काढलेल्या बाजूवर उभी करून ठेवीत, कीं झालं.

ती अज्ञात व्यक्ति पुन्हा हिंमतला भेटली. त्या वेळी तिनं हिंमतशीं पुष्कळच विचारविनिमय केला. कांही तरी फारच महत्त्वाची गोष्ट असली पाहिजे, कारण हिंमत त्यांत अगदी गुंगून गेला होता. त्याखेरीज त्या व्यक्तीच्या सद्धेतूबद्दल त्याला आतां

तिळमात्रहि शका उरली नव्हती, आणि पूर्ण विश्वासान व कृतज्ञतेन हिमत तिच्याशीं बोलत होता.

त्या दिवशी तिसरे प्रहरी खलाशानी राणीच्या हुकुमाप्रमाण एक तराफा बाधून ठेविला होता. चार पाच बद पिपावर रश्शीनें फळकुटें करकचून हा उघडा तराफा बनविला होता. त्याखेरीज त्यावर काहीं सुद्धा जास्त सोय नव्हती. सध्याकाळीं अधार पडून बराच वेळ झाल्यावर राणीन मुकुलला डेकवर आणाविल. ती बिचारी किती खराब झाली होती! तिच्यावर ओढवलेले एक एक प्रसग जास्त जास्तच कठीण होते. आणखी तिच्यापुढ काय वाढून ठेवल होत बर!

डेकवर खलाशानीं बदिस्त हिंमतला आणून उभा केला. राणी मोठ्या ऐटीत होती. ती म्हणाली, "हिंमत! तू माझ्या केलेल्या अपमानाची सव्याज परतफेड करण्याच मीं तुला वचन दिल होत ना? आत्ता तुला त्याच कामासाठीं मीं इथ बोलावल आहे. हा तराफा पाहिलास? त्याच्या पाच फूट चौरस जागेंत किती सुखसोयी आहेत पाहिल्यास ना? खालीं तुझा आवडता समुद्र, वर सुदरस आकाश, आजूबाजूला मोकळी हवा. बगालच्या उपसागरांत किनाऱ्यापासून शेंकडों मैल दूर समुद्रात मी तुला सोडणार आहे या तराफ्यावर. आता तुझ नौकानयन नि वेदान्तावर प्रवचन निर्वेधपणें चालू देत. आणि मीं मुकुललाहि तुझ हें प्रयाण पाहण्यासाठीं मुद्दाम डेकवर आणाविल आहे. म्हणजे तुला नि तिला एकमेकाना शेवटच भेटून घेता येईल. नाहीं तरी तीन जेवणाना पुरेल इतक अन्न आणि पाणीच जेमतेम आहे त्या तराफ्यावर दिलेल. तेव्हा ते सपल्यावर तुला तुझ्या प्रेमाच्या गोड आठवणींवरच तहानभूक भागवीत तुझे शेवटचे क्षण काढावे लागतील."

इतक्यात मुकुल धावत जाऊन हिंमतला बिलगली. तिच्या हिंमतला ही राक्षसीण मोकळया अफाट समुद्रावर एकटं टाकून देणार होती. तें सुद्धा अपुऱ्या अन्नपाण्यामुळ शेवटी तहानभुकेन नि एकटेपणान

तडफडत तडफडत हळूहळू मरण्यासाठीं. शिवाय त्याचा तराफा समुद्रात सोडायला वेळहि शोधून काढली ती रात्रीची, म्हणजे रात्रीचे दहा तास अंधारात काढावे लागून, दुसऱ्या दिवसापर्यंत सायतारा पार दिसेनाशी होऊन, हिमतला इतरानीं कुणी उचलून घेण्याचा चुकूनहि संभव उरू नये!

हिंमतला बिलगलेल्या मुकुलला पाहून राणी म्हणते, "छे, मला आणखी एक कल्पना सुचली आहे. या दोन प्रेमळ जीवाची ताटातूट करण्याऐवजी एकाच तराफ्यावर याना समुद्रावर सोडल, तर त्याना किती तरी एकान्त मिळेल. चोरून प्रेम करण्याच कारणच नाही. मोकळ्याढाकळ्या प्रेमाला पूर्ण वाव आणि एकमेकाच्या दृढ प्रेमालिंगनात मृत्यूचीं जोड. अशा दोघाच्या अथाग प्रेमसागरात दोघहि चिरकाल पोहत राहा. वा! फारच रम्य आहे हे दृश्य! ठीक आहे रे, या मुकुललाहि हिंमतबरोबर तराफ्यावर सोडा!"

इतक्यात अनपेक्षितपणे लखीराम मधें येऊन म्हणाला, "चल हडळी! हो बाजूला. मी चाचा म्हणून मला वाटल, माझच हृदय तेवढ उफराट असेल, पण, तुझ्यापुढे खुद्द सैतानहि लाजेन तोंड खाली घालील."

राणी क्षणभर कानावर विश्वास नसल्याप्रमाणं बघत उद्गारली, "काय रे लखीराम! तुला मद चढला होय अधिकाराचा? जा, तुला परत खलाशात नेमला आहे मीं या घटकेपासून!"

"अग, जा राडे! तुला दोन दिवस चेष्टेन मालकीण मालकीण म्हटल ते काय खरच वाटलं तुला? हें जहाज काबीज केल तें का तुझ्यासाठीं? तू मोठ्या ऐटीन परवा हुकूम दिलास मला जहाज कलकत्त्याला नेण्याबद्दल, म्हणून कलकत्त्याला थोडच जहाज जात आहे!—परवापासूनच दक्षिण अंदमानकडे जाण्यासाठीं जहाजाच नौकानयन चालू आहे; तुझ्या हातून शिकार केली खरी पण ती तुझ्यासाठीं नाहीं, मूर्खे! तर या लखीराम चाच्यासाठीं. या हिंमतला समुद्रात सोडायचा

तर जरूर सोडू, त्याची अडगळ नकोच आहे इथ! पण मुकुल-सारखी गुलबकावली काय समुद्रावर वाया घालवायची? तिला तर माझी राणी करणार आहे मी—आणि तू मात्र नांवाची राणी. तुला बटीक करणार आहे."

क्षणार्धात राणीचा कडेलोट झाला! अधिकाराच्या उच्चासना-वरून दास्याच्या गर्तेत! तिन रागान बोलण्यास तोंड उघडलं मात्र, तों लखीरामान तिच्या कडाड्दिशी श्रीमुखात भडकावली ती अशा जोरात कीं राणी डेकवरच विवळत पडली!

"रांड! बटीक! याद राख. मीच तुला वठणीवर आणतों. तो कान्होजी, नि त्याची पोर तुझ्यापेक्षा हजार पटीन बरी. त्याना डाव-पेच नसले तरी निदान त्याच्यात आपल्या धद्यातली वाकबगारी तरी आहे. मला त्याच जहाज हव होत, त्यामुळ त्याना गोत्यात आणाव लागल, नाहीं तर ती लाख माणस आहेत. पण तू, सटवे! जाशील तिथ वाटोळ करशील—जर कुणाला उठता लाथ न् बसता बुक्की हवी असेल तर ती तुला. आणि तसंच मी तुला वागवणार आहे."

सरतेशेवटीं हिंमत मात्र तराफ्यावर समुद्रात एकटा टाकला गेला पूर्वीच्या बेताप्रमाणं, मुकुलला पूर्वीपेक्षा जास्त मोकळीक मिळाली, आणि हिंमतच्याच जागीं राणीला बंदिवान् केल गेल. सायतारा मात्र आता लखीराम यांच्याची धन झाली होती.

# १८

समुद्र अगदी शान्त असल्यानं हिंमतचा तराफा सथपणें तरंगत होता. हिंमत तराफ्यावर स्वस्थ बसून राहिला होता. चितगावला जहाज गेल्यापासून तों आतापर्यंत घडलेल्या या सर्व गोष्टी त्याच्या मनांत घोळत होत्या.

त्याला समुद्रात सोडल्यानंतर सायतारा पुन्हा मार्गस्थ झाली होती. हिंमतच्या मनात दुःखानं ठाण दिलं होतं. सायतारा त्याला प्रिय होतीच, आणि मुकुलहि प्रिय होती. त्याच्यापासून तो एकदमच दुरावत होता. रात्रीच्या अंधारात किती लांबवर दिसणार? प्रथम सायतारेची आकृति अंधुक होत होत दिसेनाशी झाली. दिवे बराच वेळ दिसत होते, तेहि दिसेनासे झाले. आणि आपल्या एकटेपणाची पुरी जाणीव हिंमतला आली.

त्याच्या दुःखामध्ये वैयक्तिक हालअपेष्टांबद्दलच्या किंवा मृत्यूच्या भीतीचा भाग मुळींच नव्हता. फक्त प्रिय गोष्टींचा कायमचा वियोग, इतकंच नाहीं तर तोहि अशा विपरीत स्थितीत, कीं आपल्या डोळ्याआड त्यांची काय दुर्धर गति होईल ही शंका मनात सारखी सलत असताना. पण या गोष्टीबद्दल कितीहि विचार केला तरी

आपल्याकडून त्याना मदत करण अशक्य आहे हें पाहून प्राप्त परिस्थितीशीं झगडण्यासाठीं धीरान कंबर कसण येवढच त्याच्या हातीं होत.

तो जरी इतक्या अफाट समुद्रावर येवढयाशा तराफ्यावर त्या वेळीं तरंगत होता तरी त्याला निराशा वाटत नव्हती. दर्यावर्दाच्या पेशातल्या माणसाला—दुसऱ्या कुणी अस खुनशीपणान समुद्रावर मरण्यासाठी सोडण जरी नाहीं तरी—वादळानं किंवा अनेक इतर कारणानीं जहाज बुडाल्यान लहानशा होडग्यातून दूरवर अतर उल्लघून जमिनीला लागण ही काहीं कल्पनातीत किंवा अशक्य कोटीतली गोष्ट नव्हती. अशा परिस्थितीत काय काय करावं लागेल याची रूपरेखा दर्यावर्दाला त्याच्या धद्याच्या अभ्यासात तरी येतेच. आता अशा प्रसगाचा अनुभव काहीं प्रत्यक्ष तो प्रसग घेतल्याशिवाय कुणाला येत नाहीं. पण माणसाजवळ आत्मविश्वास ही एक मोठी चीज असतेच कीं, त्यामुळं कोणकोणती सकट कशा कशा बनावान आपल्यावर कोसळतील हें जरी ठाऊक नसलं तरी सुद्धा शेवटीं कशी तरी आपण त्याच्यावर कुरघोडी करूच करू, त्याना पुरून उरू, अशी पक्की उमेद, जवळ जवळ खात्रीच, मनाला वाटते. आणि ज्याला हा आत्मविश्वास आहे त्यान आयुष्याची लढाई निम्मी जिंकली म्हणून आरभींच सागायला हरकत नाहीं.

हिमतला आपल्या नाविकपणाची इतकी खात्री होतीच, पण त्या-खेरीज त्याला आशादायक अशी आणखी एक गोष्ट ठाऊक होती. सायतारेवरच्या त्या उपकारी अज्ञात व्यक्तीन हिंमतला अगदी पूर्ण जीवदान जरी नाहीं म्हटल तरी, स्वतःचा जीव बचावण्याची जास्तींत जास्त सोय नि शक्यता उपलब्ध करून दिली होती.

राणीला किंवा लखीरामालाहि पत्ता नव्हता, पण हिंमतला दर्यावर सोडायच हा त्याचा बेत हिंमतला त्या व्यक्तीन अगोदरच सुचवून ठेवला होता. येवढच नव्हे तर तस झाल तर काय करावं लागेल

यावर कान्होजीरावाकडूनहि विचारपूर्वक सूचना मिळवल्या होत्या. या कामीं तर कान्होजीरावाच्या अद्यावत् ठेवलेल्या नकाशाचा आणि सायतारेच्या हालचालीच्या नोंदणीचा फारच अप्रतिम उपयोग झाला. सोडताना राणीच्या दृष्टीला जरी अमर्याद पाणीच हिमतपुढे दिसल तरी प्रत्यक्ष नकाशावर पाहणाऱ्या नाविकाला हिमतची स्थिति इतकी निराशाजनक वाटली नसती.

सायतारा लखीरामान आपल्या चाचेगिरीच्या मुलखात नेण्यासाठीं दक्षिण अदमानाकडे हाकारली होती. त्यामुळ सायतारेचा मार्ग प्रथम ब्रह्मदेशच्या नैर्ऋत्य टोकाच्या केप नेग्रेस व अल्ग्वाडा दीपगृह, आणि प्रेपारिस बेट याच्या मधल्या प्रेपारिस उत्तर चॅनेलमधून जात होता. तिथून दक्षिणेकडं अदमानकड जायच होत. त्यामुळ हिंमतच्या तराफ्याच्या आसमतात् दोन-अडीचशें मैलात जमीन होती.

साधा तराफा काहीं एखाद्या होडीसारखा वल्हवण्याला अथवा शीड उभारून हाकारावयाला सोईचा नसतो. होडीचा चिंचोळा लाबट आकार, सर्व बाजूनीं जलपृष्ठापासून वर उंच असल्यानं पाणी चहूंदिशीं आत न येऊ देणाऱ्या उभ्या कडा इत्यादि गोष्टी तराफ्यात नसतातच. एखाद्या सपाट फळकुटासारखा तो अवजड नि वल्हविण्यास अवघड असतो.

ब्रह्मदेशाचा किनारा जास्त जवळ असूनहि तिकड जाण सोयीच नव्हत, कारण वारा त्याच दिशेन येत होता. तेव्हा वाऱ्याच्या विरुद्ध जाण्यापेक्षा त्याच्या अनुरोधान अदमानकड तराफा हाकारण जास्त सोईच पडत. त्याशिवाय त्या मोसमातील समुद्रप्रवाहाची दिशासुद्धा अदमानकड झुकलेली होती. ताशीं मैल दीड मैल वाहणाऱ्या समुद्रप्रवाहात तराफा सापडला तर अनायासें मार्ग आक्रमायला तितकी मदत.

हिंमतन प्रथम तराफ्यावर आडव पडून खालची पांच पिप चाचपून पाहिलीं. त्यातील एकावर हवी असलेली ती खूण लागतांच तें पीप

त्यान तराफ्याच्या खालून दोरी सोडून मोकळ केल आणि तराफ्यावर उचलून घेतल. त्या अज्ञात व्यक्तीनं तराफा तयार होत असताना तो करणाऱ्यापैकीं एका खलाशाला मसलतींत घेऊन त्यावर हे पीप बांधवल होत. ते उघडल्यावर त्यातून बरचस अन्न आणि पाण्याच्या बुधल्या निघाल्या. येवढ्या अन्नावर व पाण्यावर हिमतला पुष्कळच वेळ गुजराण करता आली असती.

त्याशिवाय तराफ्याच्या खालीं आणखी काहीं सुटे लाकडी फळ-कुटाचे तुकडे नि वल्ह्याची दांडकीं होतीं; आणि त्या खालीं गोण-पाटाचे काहीं तुकडेहि बाधलेले होते. हिंमतनं दाडकीं तराफ्यावर उभी करवून व घट्ट बाधून त्याच्यावर गोणपाट पसरून शिडासारखं बाधल. तराफ्याच्या एका बाजूस एक फळकुट पाण्यात अर्धवट बुडत बाधून त्याची सुकाणासारखी योजना केली.

ईशान्येचा वारा जोरान वाहत होता. त्याच्या जोरान तराफ्याच जुजबी शीड भरून चागल ताशी चार मैल अंतर तोडण्यास प्रत्यवाय नव्हता. त्याशिवाय वर उल्लेखिलेल्या समुद्रप्रवाहाचा ताशीं मैलभर असा सर्व मिळून पाच मैल वेग धरला तर अदमानक एका दिवसात पुऱ्या शभर मैलाच अतर तोडून जाता येईल ह उघड होत.

हिंमतन त्याप्रमाण व्यवस्था करून धीमेपणान वाट पाहत बसायचं ठरवल. भूक अगदीं आवरेनाशी झाली म्हणजे, अगदीं थोड मोजक अन्न खायच आणि तहान फारच लागली म्हणजे मोजक्या घोटानी पाणी प्यायच. तृषा फार लागली तरी समुद्राच पाणी पिण्यांत धोका होता. समुद्राच्या खाऱ्या पाण्यान तृषा जास्त जास्तच लागते—त्या-खेरीज शरीरांत क्षाराच प्रमाण जास्त वाढल्यान तृषा तर लागतेच पण माणूसहि जास्त वेडावून जातो, हे पूर्ण ठाऊक असल्यान फारच इच्छा झाली तर तराफ्यावर बसल्या बसल्या हिंमत आपले कोपरा-

इतके हात किंवा ढोपरापर्यंत पाय पाण्यांत लोंबते धरी. हेतु हा कीं, हातापायाची त्वचा पाण्यातून ओलावा ग्रहण करी, आणि क्षार मात्र बाहेरच राही. शरीराला लागणाऱ्या पाण्याचा काहीं अंश असा मिळूं शके, आणि त्याशिवाय अधून मधून बरोबरचं गोडं पाणी होतच थोडस. फक्त समुद्राच खार पाणी कितीहि तृषा लागली तरी प्यायचं नाहीं हें त्याला पुर ठाऊक होत.

अशा तऱ्हेनं दोन दिवस गेले, तरी जमीन कुठहि दिसत नव्हती. पाण्याच्या निळ्याभोर रगावरन अजूनहि खोल समुद्रावर असल्याच त्याला दिसत होत. अशा वेळीं माणसाच्या अंगच्या धीराची कसोटी लागते. इतक्या अफाट समुद्रावर तुमच्या हातीं काहीं नसताना स्वस्थ बसून राह्यच वाट पाहत—कशाची वाट?—अति मद पावलानीं पण निश्चयान जवळ जवळ येणाऱ्या मृत्यूची!

हिंमतच तत्त्वज्ञान फार साध पण प्रभावी होत. त्याच्या हाती होतं तेवढ सार त्यान केल होत. आता दुःख करून किंवा निराशेन आक्रोश करण्यान का स्थिति सुधारली असती? समजा, तराफा जमीन चुकून जास्तच भर समुद्राकड जात असला, नि मरण अटळ असल, तर मग उरलेला हा थोडा काल कोणत्या स्थितींत घालवावा? व्यक्तीच्या स्वतःच्या जगाला तीन बाजू असतात. भूत, भविष्य नि वर्तमान. त्या तिहींपैकीं एकावर तरी निरभ्र ऊन विलसत असेल तीच बाजू आपल्यापुढ फिरवून ठेवण चागल नाहीं का? वर्तमान नि भविष्य-काल निराशामय दिसला, तर देवान स्मृति दिली आहे! तिनं भूत-कालातील गोड स्थळं शोधता येतात. भूतकाल नि वर्तमान मनपसत नसेल तर देवान कल्पनाशक्ति दिली आहे! तिनं भविष्यांत आपल्याला हवी तीं सुखस्वप्न उभारता येतात, आणि भूत नि भविष्यात कडवट-पणा असला, तर देवान माणसातला पाशवीपणा अगदीं पूर्ण काढून न घेतल्यान, दृष्टीसमोरच्या सुखांत निश्चिंतपणें गुंगून जाण्याची 'निर्बुद्धपणाची कला'हि साध्य असते—

“ भरि चषक, कशाला व्यर्थ आवृत्ति याची,
निसरुनि कशि जाई काळवाळू पदींची;
मृत, अजनित ऐशा कालचा वा उद्यांचा,
छळ उगिच कशाला, आज जो हा मजेचा ! ”

सूर्यफुलापासून माणसानं धडा घ्यावा. तें नेहमीं सूर्याभिमुख असत ना ? तसच मनानं आपण आनंदाभिमुख असलों तर किती नाहक क्लेश वाचतात !

कांहीं माणसं सूर्याभिमुख असतात; आनंदस्थळच त्यांच्या दृष्टीला दिसतात. कांहींचा स्वभाव कृष्णकमळासारखा असतो, दुःखाच्या अधः-कारातच तीं उमलतात !

असे चार-पाच दिवस गेले. जवळचं अन्न संपल नि पाणीहि संपल. श्रमानीं, तहानभुकेनं ग्लानि आलेला हिंमत तराफ्यावर तरंगत पडला होता. वारा, ऊन्ह, पाणी आणि क्षार यांच्यामुळ त्याच तोंड मलिन झाल होत—पण त्या गुंगींतसुद्धा त्याच्या तोंडावरच स्मित पुसून गेल नव्हत—तें हास्य दर्यावर्दीच होत—खऱ्या तत्त्वज्ञान्याच होत—संकटानींच काय पण प्रत्यक्ष मृत्यूनहि तें स्मित नष्ट होणार नव्हत !

* * *

धोपट मार्गावरचा पांथिक चांगला असतो, पण आडवाटेला जाऊन, गोता खाऊन शहाणा झालेला पांथिक जास्तच चांगला ठरतो. हलवून बळकट केलेल्या खुंट्यासारख त्याचं मन सत्प्रवृत्तीवर खिळलेल असत. म्हणूनच उपरति होऊन सन्मार्गावर आलेला माणूस, उपरति होण्यासारख कांहींच कधीं न केलेल्या माणसापेक्षांहि जास्त कट्टा सज्जन होतो.

दौलतची सायतारेवर हीच स्थिति झाली होती. ज्या दौलतला विचाराच पूर्वी वावड असे, तो आता सदान् कदा विचारात गुंगलेला असे. त्याच्या हातीं आता काडीचीहि सत्ता नव्हती. आपल्याच

हातांनीं त्यान लखीराम चाच्याला सायतारेवर आणल. आपल्याच करणीनं त्यान कान्होजी आणि हिंमत याच्या हातून सायतारा जाऊ दिली, आणि स्वतःहि तो तिला मुकला. दारूच्या नशेत असला म्हणून काय झाल? त्या निष्पाप मुकुलचा घात केला! अप्रत्यक्षपणान त्या राणीच्या हातीं सत्ता जाऊ देऊन, कान्होजीला गिरफदार करण्यात आणि जुळया भावाला समुद्रावर अन्नान्न करीत मरण्यासाठीं सोडण्यास आपणच कारणीभूत झालों. आणि या साऱ्यान आपण मिळवल तरी काय? काहीं नाहीं!

संकटाची कदर न करता मनाला पटलेल्या चागल्या गोष्टींना अविरत चिकटून राहण्यास मनाची केवढी तयारी लागते. त्या झगड्यातून पार पडण्यासाठीं माणसाच्या खऱ्या गुणाची तेजस्वी तलवार कशी चालवावी लागते हें त्यान पाहिल होतं.

खऱ्या प्रेमासाठीं स्वार्थत्याग केवढा करावा लागतो, मनोनिग्रह केवढा आचरावा लागतो याचहि प्रात्यक्षिक त्यान पाहिल होत. त्यान भ्रष्ट केलेल्या मुकुलची हिमतला हाक, हिंमतन क्षणाचाहि विलब न लावता तिच्यासाठीं आपल्यावर नाहक ओढवून घेतलेली तोहमत, आणि देहदडाची शिक्षा—या गोष्टी दौलतच्या मनात अग्नीप्रमाण धडाक्यान जळत होत्या. त्यांच्यातील हिणकस जळून जात होत तर शुद्ध सद्विचार तावून-सुलाखून निघत होते.

त्यानच या दुर्धर प्रसगात साऱ्यांना पाडल होत, आणि त्यातून सोडविण हेंहि त्याचच काम होत. केलेल्या अन्यायाची भरपाई या नाहीं त्या रूपान करायला हवी होती. झाल्या गोष्टी परत येत नाहींत, तरी पण त्याचं परिमार्जन करण आपल्या हातीं असत.

सध्यां दौलत मोकळा होता तरी उघडपणें बडाळी करण त्याला शक्य नव्हत. त्याच्या मूर्खपणामुळच सायतारा लखीरामाला मिळू शकल्यानं लखीरामचं दौलतबद्दल महामूर्ख येवढच एक मत होत,

आणि तें तसच राहू देण सध्या सोईच होत. त्यामुळें सर्वजण दौलतबद्दल निर्धास्ततेन व गाफीलपणान वागत. गुपचूपपणान योग्य सधीची वाट पाहत, तयारीन राहायच येवढच दौलतच्या सध्या हाती होत. आणि ती सधि आल्यावर प्राणाचीहि पर्वा न करता घाव घालायचा त्याचा निश्चय झाला होता. दौलतच्या अगात कर्तबगारी कमी नव्हती. होती ती वाईट दिशेला आजवर लागली होती, पण आता मात्र त्याला सन्मार्ग सापडला होता.

## १९

या ईशान्येच्या मन्सूनला एकदा सुरुवात होऊन गेल्यावर बगालच्या उपसागरात हवा नेहमीं फार चागली राहते. सर्वसाधारणपणे हिंवाळ्यातला हा मोसम सुदर हवेचा असतो, पण त्यातहि वादळ होऊ शकत नाहीत अस नाहीं. आणि जर झालीं तर तीं लेचीपेची नसतात. चागलीं आदळआपट करून, ताडवनृत्य करून जातात.

असच एक वादळ आता बगालच्या उपसागरात उठल होतं. इतके दिवस समुद्र शात होता, तर सायतारेवरच्या व्यक्तीच्या भिन्न भिन्न वासनामुळ त्याच्यात वादळ झाल होत. आता त्या मनुष्य-निर्मित वादळाचा उपशम होतो न होतो तो, हे सृष्टिनिर्मित वादळ उपस्थित झाल.

प्रथम आकाशांत अभ्रं आलीं. हिम-कणिकानीं बनलेल्या, या जवळ जवळ तीस हजार फूट उचीवरच्या ढगाच्या सावल्या पडत नाहींत. फक्त त्याच्यामुळ हवा बिघडल्याची पहिली सूचना मिळते.

सूर्यास्ताच्या वेळीं पश्चिमेचं तोंड इतक रक्तानं माखल होत, की प्राचीचं तान्ह मूल मारून खाणाऱ्या एकाद्या लावेसारखी ती भयानक दिसत होती.

अशा लालभडक सूर्यास्तानं अपरिचित माणूस बेहद्द खूष होतो तर अनुभविक दर्यावर्दी धोक्याची सूचना या दृष्टीनं त्याकडं पाहतो.

प्रथम जलपृष्ठावर तेलकट, ओंगळ आरशासारखी चकाकी आली. हसऱ्या लाटांचा कुठें मागमूसहि उरला नाही. अधूनमधून एकादा उडता मासा ते नितळ जलपृष्ठ फोडून उसळी घेऊन बाहेर पडे आणि आपले पंख पसरून धरीत तीरासारख्या वेगानं पाण्यासरपट उडत जाई. त्यामुळं उठणारे तरंगहि अपवादाप्रमाणं जास्त उठून दिसत.

वाऱ्यानं तर एखाद्यावर झडप घालण्यासाठीं दबा धरून बसावं तद्वत् श्वास कोंडून धरला होता. सारं वातावरण कोंदल्यासारखं झालं होतं. वादळापूर्वीची शांतता म्हणतात ती हीच. आगामी वादळाच्या अपेक्षेनं ती जास्तच भयसूचक वाटत होती. सायतारेचीं सारीं शिडं रिकामीं होऊन डोलकाठ्या आणि दोरांचे ताण यांच्यावर लोंबत होतीं. वारा पडल्यानं आणि लाटांच्या अजीबात अभावामुळं सायतारेची अगदीं यत्किंचितहि हालचाल होत नव्हती. उलट तिचं प्रतिबिंब खालच्या पाण्यांत स्पष्ट दिसत होतं.

खलाशी लोकांनीं जास्तच हाय खाल्ली. चांगल्या हवेच्या दिवसांत जरी कप्तानाची जोखड त्रासदायक वाटते तरी वादळाच्या वेळीं संकटाला तोंड देणारा कोणी तरी खंबीर, करारी आणि कर्ता माणूस बोटीचा कर्णधार आहे या विचारांत एक प्रकारचं समाधान असतं. यापूर्वीं घडलेल्या अनेक प्रसंगांनीं जहाजावरची शिस्त पारच नष्ट झाली होती. कुणाचा विश्वास कुणावर नव्हता. ज्याचं त्याचं बोलणं आणि वागणं तोंडदेखलं. सायतारेच्या लोकांवर ओढवलेलीं संकटं अजूनहि संपलीं नाहींत असं त्यांना वाटत होतं.

जी पिशाच्चाकृति दिसली ती हिंमतच्या वेळीं समुद्रावर बाळतपणीं मेलेल्या आणि समुद्रावरच दफन केलेल्या हिंमत-दौलतच्या आईची असावी, असा कुणी तर्क काढला आणि म्हणूनच हिंमतला सायतारे-वरून समुद्रांत टाकल्यानं ती या जहाजावर सूडाच्या भावनेनं घुटमळत

आहे, अशी कल्पना सुरू झाली. या कल्पनेनं तर सायतारेच नक्कीच बरवाईट होणार, आता तिची धडगत लागणार नाहीं असं त्याच्या मनानं पक्कं घेतलं. निराशेनं गोंधळून गेल्यानं कसोशीनं कुणी काम करीना; आणि प्रत्येक लहानसहान गोष्टीचा अर्थ ते आगामी दुर्दैवाची एकेक खूण एवढाच करू लागले !

शेवटी जेव्हा प्रत्यक्ष वादळ सुरू झालं तेव्हा सायतारेवरच्या शिस्तीची आणि संघटनेची स्थिति जशी असावयास नको तशीच अगदीं होती. लखीरामाने आता बनबीराबरोबर दौलतलाहि दुय्यम अधिकारी म्हणून नेमलं होतं.

कान्होजीला, त्याच्या बंदिवासात वर चाललेल्या सर्व घडामोडींची इत्थंभूत बातमी कळत होती. त्याला तर ही सुसंधीच आल्यासारखी वाटू लागली. कारण आपलं जहाज आपल्या हातीं जरी राहिलं नाहीं तरी तें माकडाच्या हातीं कोलीत दिल्याप्रमाणं या लखीराम चाच्याच्या हातीं इतर जहाजांना उपद्रव देण्यासाठीं साधन म्हणून न राहता, जर या वादळात समुद्रतळीं गेलं तरी जास्त बरं, असं त्याला वाटत होतं.

वारा वाहू लागून लवकरच त्याचा वेगहि वाढू लागला. त्याखेरीज त्याची दिशा डाव्या अंगावर बदलू लागली. शिवाय बॅरॉमीटर-मधल्या पाऱ्याच्या स्तंभाची उंची हलके हलके कमी होऊ लागली. या तीनहि गोष्टींच्या अनुषंगानं वादळाचा मध्यबिंदु कोणत्या जागीं आहे, आणि ते कोणत्या दिशेनं जात आहे याचा सुगावा लागतो. या वादळाच्या मार्गाच्या कोणत्या बाजूस जहाज आहे, यावर जहाजाला होणारा धोका बराचसा अवलंबून असतो. आणि कुशल दर्यावर्दीचं काम, ही धोक्याची जागा टाळून सुरक्षित भागात गलबत नेणं, हें असतं.

लखीराम हा कांहीं नवखा दर्यावर्दी नव्हता. चाचा असल्यामुळं त्याला इतर कोणाहि कप्तानाइतकं, किंबहुना जास्तच नाविक ज्ञान

होत. त्यान या वादळाच्या हालचालीचा विचार करून सायतारेला वादळांतून बाहेर काढण्यासाठीं एक दिशा ठरवली होती. इतक्या सलाशें उचापती करून आणि धोरण सभाळून मिळविलेली सायतारा एखाद्या वादळात हातची घालवण्याइतका लखीराम मूर्ख नव्हता.

आता वारा खूप वाढला होता. लाटा, पाणी घुसळल गेल्या-प्रमाण, एकाच दिशेनं न येतां गोंधळल्यासारख्या झाल्या होत्या. त्या फक्त एकाच दिशेन येत्या तर जहाज त्याच दिशेकडे तोंड करून उभ ठेवणं जास्त सुरक्षित झाल असत. पण लाटाच्या विस्कळीतपणामुळ तें शक्य नव्हत.

काळयाकुट्ट ढगानीं आकाश व्याप्त झाल होत. त्यातून पर्जन्याच्या मोठमोठाल्या सरींवर सरी पडत होत्या. त्यामुळ शभर हातांपलीकडे सुद्धा दिसत नव्हत. त्यांतच भर म्हणून रात्रीचा अंधार पडला म्हणजे डोळयावर घोंगडी बाधून चालाव तद्वत् दर्यावर्दीला वाटे.

आजूबाजूला अदमानच सान्निध्य आहे हे लक्षांत ठेवून लखीरामान किंचितहि धोका उरूं नये, आणि त्याच वेळीं जहाज वादळातून शक्य तितक्या दूर जाव यासाठी जवळ जवळ आग्नेय दिशेकडे जहाज चालविल होत. जवळजवळ दीड दिवस लखीराम क्वार्टर डेकवर आलोचन जाग्रण करीत उभा होता. बनबीर त्याच्या विश्वासातला असला तरी त्याला वादळाच्या वेळीं जहाज एकट हाकारू देण त्याला प्रशस्त वाटत नव्हतं. आणि दौलतच्या कर्तबगारीवर विश्वास असला तरी, त्याच्या दारूबाजपणाची एकदा माहिती झाल्यावर विषाची परिक्षा घेण त्याला रुचत नव्हत. सरतेशेवटीं आता काहीं तात्कालिक धोका म्हणण्यासारखा उरला नाहीं अस पाहून थोडी विश्राति घेण्यासाठीं लखीराम खालीं गेला.

रात्र पडली तरी वादळ कमी नव्हत. पाऊस असा मुसळधार पडत होता कीं, पवनरूपी भिस्त्यान मेघाच्या अजस्र काळया पखाली भरभरून आणून ओतण्याचा जणू सपाटा लावला होता. वाऱ्याच्या

जोरान पावसाचे टपोरे थेंब अशा वेगान चेहऱ्यावर आदळत, कीं डोळे उघडे ठेवून पुढें पाहण शक्यच नव्हत. पापण्याची सारखी उघडझाप करीत अर्धवट किलकिल्या डोळ्यानीं दिसेल तितक खर. मधूनच वीज लवलवे. तिच्या क्षणकाल चक्क उजेडान डोळ्यावर घाव घातल्यासारखा वाटे, तरी त्या उजेडात काय आजूबाजूला दिसेल तितक पाहून घ्यायचा प्रयत्न करायचा. लाटा एकामागून एक लोळण घेत येत. त्याच्यावर सायतारा असहायपणे तरगत होती. अधून मधून एखादी भरगच्च लाट, पाहिल्या लाटेच्या खळग्यातून सायतारा वर येण्यापूर्वीच तिच्यावर आपटून फुटे. मग शेंकडों टन वजनाचं खार पाणी सायतारेच्या डेकवर सर्वत्र पसरून सार दिसेनासं होई. अशी लाट आली की, जो तो कशा तरी भक्कम आधाराला बिलगून राही, नाही तर लाट डेकवरून त्याला लीलेन आपल्यापुढ वाहवून नेई, किंवा कुठल्या तरी जहाजाच्या भागावर जोरान फेकून व आदळून शरीरातील हाडामासाचा तिंबल्या कणकेसारखा एकच गोळा करी. पाणी खळखळत ओसरे, आणि त्यातून आणखी एक जीवदान मिळाल्याप्रमाण सायतारा कष्टान हळूहळू वर येई. तिच्या लाकडी तुळया नि फळ्या त्या सतत चाललेल्या माऱ्यापुढ कशा अभग नि एकत्र राहत कोण जाणे, पण त्या करकरत, वाकत आणि आता मोडतात, का मग फुटतात अशी स्थिति दिसे.

वादळ वाढतच चालल होत. बनबीर डेकवर कामावर होता. खलाशाना डेकवर बोलावून घ्याव म्हणून बनबीरान हाकाट्या मारल्या. खालच्या गोदामात पाणी साचत होत, म्हणून सुतारान पाणी मापून सागितलं होत. ते पाणी उपसून टाकण्यासाठीं हाताचा पप चालवायास पाहिजे होता. पण कुणीहि खलाशीं डेकवर येण्यासाठीं धजावेना —त्या वादळातल्या आवाजांतहि अगदीं हृदयभेदक आर्तस्वरात किंकाळ्या ऐकू येत होत्या. खलाशी कुजबुजत, " हेच तें मेघनेच भूत. डेकवर जाऊ नका. सापडेल त्याला ती वाहवून समुद्रात नेईल—तिच्या

बाळंतपणीं असच वादळ झाल होत—त्या वेळेपासून वादळात या जहाजावर नेहमींच तिच्या अशा किंकाळ्या ऐकू येतात!"

त्या किंकाळ्या इतक्या स्पष्ट ऐकू येत होत्या, कीं शेवटीं दौलत बाहेर येऊन त्या अनुरोधान रोखून पाहत होता. अधून मधून त्याला एक आकृति दिसे. तिच्या मागोमाग तो जाऊ लागला. शेवटीं ती आकृति लखीरामाच्या खोलीकडे गेली. दौलत आडून पाहत होता. त्या आकृतीन खोलींत डोकावून पाहिल. आत लखीराम दमून निजला असावा. ती आकृति आत पाऊल टाकून खात्री करण्यासाठीं थोडी पुढ वाकली, इतक्यात कुणी तिला आत लोटून बाहेरन दार बद केल. लखीरामच होता तो. हसून तो म्हणतो, "पिशाच्च का! आता बस म्हणाव किंकाळ्या फोडीत माझ्या खोलींत. मला कोंडून टाकायला आलीस आणि अडकून पडलीस स्वतःच. हा लखीराम तुम्हा सर्वांचं बारस जेवला आहे. वादळ झाल्यावर घेईन तुझा समाचार!"

लखीराम तेथून निघून गेला. खलाशाना वेठीला धरून त्याना पपावर पाणी उपसायला त्यान उभ केल, आणि तो स्वतः त्याच्याकडून काम करून घेऊ लागला.

दौलतनं पुढ येऊन कडी काढली. लखीरामचे उद्गार त्यान ऐकले होते. त्याला मोठ कुतूहल उत्पन्न झाल होत. ही कोण?—राणी—मुकुल—जिजी?—त्यान दार उघडून पाहिल. त्याच्यापुढ उभ्या असलेल्या व्यक्तीला त्यान कधींच पाहिल नव्हत पूर्वीं.

"कोण तू?"

"तुमच्या गाढवाच्या गोंधळात सायतारा वाचवणारी एक व्यक्ति!"

"तुझ्यावर हा भार कसा पडला?"

"त्याची कशाला तुला चौकशी? तुझ्यासारख्या नादान मुलान बापाचा, भावाचा द्रोह करून जहाज गमावल, तेव्हां माझ्यासारख्या तिऱ्हाइताला मधें पडण भाग पडल!"

"माझी मनःस्थिति पूर्वींचीच असती तर तुझ्या बोलण्यान मला

राग आला असता. पण तू बोलून दाखवलस तें खरच आहे. मीं चूक केलीच तशी, तर तिच्या उच्चाराचा राग कसला? पण मी पूर्वीचा उरलों नाहीं. जहाज परत मिळवण हे जर तुझं साध्य असल – तर माझ्या आणि तुझ्या हेतूमधें काहींच फरक नाही."

"हें खर कशावरून?"

"तस नसत तर लखीरामन तुला कोंडलं असता आत्ता तुझी मुक्तता करायच माझं काय नडल होत? लखीरामच्या मी बाजूचा असतों तर उत्साहानं त्याच्याबरोबर कामात गुंतलों नसतों का?"

"ठीक आहे. तुझ्यावर विश्वास टाकून पाहूं. कान्होजीरावाची खालीं जाऊन गाठ घेऊ आत्ताच्या आत्ता."

कान्होजीरावाना खालीं कोठडींतच पायात बेडी घालून खांबाला जखडल होत. दौलतन जाऊन त्याचे पाय धरले.

"मी चुकलों! केल्या चुकाच परिमार्जन प्राण गहाण टाकून करायला माझी तयारी आहे. मी क्षमेची याचना करीत नाहीं; तर चूक सुधारण्याची मला संधि देण्याबद्दल तुम्हाला विनवीत आहे."

कान्होजीराव म्हणाले, "गतगोष्टींबद्दल बोलण्याला आता वेळ नाहीं! येवढच कर, की लखीरामला तुझ्यातल परिवर्तन कळू देऊं नको. आणि कामावर जाशील तेव्हा जहाजाचा मार्ग गुपचूप बदलून आग्नेयीऐवजीं दक्षिण कर."

"ती गोष्ट तर मीं अगोदरच केली आहे." दौलत उद्गारला.

कान्होजीराव अति आश्चर्यानं म्हणाले—"कोणत्या हेतून?"

"आग्नेय दिशेन जाण्यात जमीन अजीबात टाळून वादळाबाहेर आणि खोल समुद्रात जहाज नेण्याचा लखीरामचा इरादा आहे. वादळांतून जहाज सुरक्षित निघाल तर तो तें चाचेगिरीवर नेणार. माझ्या हिशोबान सायंतारा नरकुडम् बेटाच्या उत्तरेस असावी. म्हणून कालचा सबंध दिवस सायतारा दक्षिण दिशेनंच चालूं आहे. होका-

यंत्राच कार्ड मीं कुणास न कळत हालवून एका जागीं ठोकून ठेवल होत, त्यामुळ जहाजाची दिशा होकायत्रानं आग्नेय दिसत असली तरी प्रत्यक्ष लखीरामला न कळत जहाज दक्षिण दिशेन चालत राहिल आहे. माझा हेतु सायतारा लखीरामच्या हातीं सुरक्षित राहूं देण्यापेक्षा नरकुडम् बेटावर आपटावी, असा आहे. कदाचित् नरकुडम् बेट थोड चुकून बाजूला राह्यल तर दुर्दैव म्हणायच. गेल्या दोन दिवसात वादळ सारखं चालूं राहिल्यान सूर्यदर्शन तर राहोच, पण शभर हात आजूबाजूला सुद्धा काहीं दिसणं अशक्य होत. माझ्याकडून मी प्रयत्न केला आहे. असेल दैवाच्या मनात तर सायतारा नरकुडम् बेटावर आपटेल आणि माझा हेतु साधेल."

—आणि दैवान 'तथास्तु' म्हटल! सबध सायतारा एक मोठा धक्का बसून हादरली! धक्का येवढा होता कीं, जहाजावरची फळी न् फळी सांध्यातून आणि खिळयातून विलग होऊन फुटते कीं काय अस वाटल. कर् कर् कर् कर् असा आवाज झाला, आणि नरकुडम् बेटाच्या खडकाळ उंच किनाऱ्यावर सायतारा आपटली.

अतिशय खोल समुद्रांत नरकुडम् बेटाचा सुळका एकदम तेवॉसशें फूट उंच उभा आहे. या बेटाच्या आसपास ऱ्याहत्तर मैलांच्या टापूत काहीं एक नाहीं, नुसतं चोहोंबाजूला खोलच खोल पाणी आहे. अदमान या नरकुंडम् बेटाच्या पश्चिमेस पसरलेल आहे. आजूबाजूच्या खोल पाण्यामुळ आपण जमिनीसन्निध आलों आहों हें कळण्यास मार्ग नाहीं. त्यात हें वादळ चालू असताना, आणि पावसान व अंधारान काहींच दिसत नसतांना जहाज नरकुंडम् बेटावर जाऊन आदळेपर्यंत कुणालाच कळलं नाहीं. शिवाय लखीराम आपण आग्नेयीकडे जात आहों अशा समजुतीखालीं असल्यान हें सकट त्याच्या स्वप्नींहि नव्हतं. दौलतलाहि अदमासानंच दक्षिणेचा मार्ग ठरवावा लागला होता. आणि कदाचित् तरीहि नरकुंडम् बेट हुकून बाजूस राहण्याचाच जास्त सभव होता. पण सुदैवानं दौलतचा नि कान्होजी-

रावाचा अदमास खरा ठरून सायतारा बरोबर नरकुडम् बेटावर आपटली !

कान्होजीरावांना आपल्या मुलाच्या स्वभावांत झालेलं हें चांगलं परिवर्तन पाहून सतोष तर झालाच– हातच्या काकणाला आता आरसा नको होता—पण आणखी एका गोष्टीचं त्याना सकौतुक समाधान वाटल. ती गोष्ट म्हणजे सायतारा लखीरामच्या हातून सोडविण्या-साठीं आपण ठरावलेला बेत दौलतच्याहि मनात एकदमच आला; इतकच नव्हे तर धडाडीन त्यान तो परस्पर ठरवून अमलातहि आणला. आपण सुचविण्याच्या अगोदरच त्यानं आपल्या मनान तीच नेमकी गोष्ट पार पाडली; नि आपण योजलेला बेत त्याला सागत असता नेमकी त्याच क्षणी सायतारा नरकुडम्‌वर आपटली ! आपण मुलाना दर्यावरचं काम शिकविण्याचे कष्ट घेतले ते सफळ झाले याचं हे प्रात्यक्षिक होत. कान्होजीन दौलतला पोटाशीं धरल नि तो म्हणाला, “ शाबास ! बापसे बेटा सवाई ! दौलत, आता अगोदर जा नि सर्वांना किनाऱ्यावर सुरक्षित पोंचवण्याची व्यवस्था कर. हें वादळ कमी झाल नाही तर सायतारा खडकाळ किनाऱ्यावर लाटानीं सारखी चेचत राहिल्यान मोडूनतोडून तिचा निकाल लागेल. जा, दिरगाई करूं नको क्षणाचीहि. शाबास रे माझा दर्यादौलत नि दर्याहिमत ! हिंमत-सुद्धा आपल्यावरच्या सकटातून सुखरूप मार्ग काढील ! ”

दौलत घोटाळत होता. त्याला कान्होजीरावाच्या हातापायातील बेडया तोडून त्याना मोकळ करायच होत. पण तें ओळखून अगदीं खानदानी दर्यावर्दी कप्तानाला साजेशा तऱ्हेन कान्होजीराव म्हणाले, “ मुला, घोटाळू नको. जहाजावरच्या बायाबापडयाना अगोदर वाचीव. मग तुम्ही सारे खलाशी नि अधिकारी सुरक्षित जमिनीवर उतरा. मग वेळ उरला तर मला नि माझ्या सायतारेला एकदमच वाचवायला या. पण ती जर या नरकुडम् बेटावरच फुटून इथं हाड ठेवणार असली आपलीं, तर मीहि माझ्या जहाजाबरोबरच नष्ट झालेला बरा. माझी

काळजी करू नको. माझी जागा या जहाजावरच, सायतारा नि मी रसातळाला जायचंच तर एकदम जाऊ! जा, क्षणाचाहि विलंब करू नको."

झुजूमुजू झाल तोंवर नरकुडम् बेटावर एक माणसाची टोळी किनाऱ्यावर उभी दिसली. आपटून फुटणाऱ्या या जहाजाला मदत करण्याचा, शक्य तर ते सुरक्षित आणि शक्य तितकी कमी मोडतोड झालेल्या स्थितीत वाचविण्याचा त्याचा उद्देश होता.

लखीराम कुठ दिसेनासा झाला होता. बाकीचे सारे खलाशी डेक-वर जमले होते. जहाजाची इतिश्री ओढवली होती. आता जीव वांच-वावयाचे होते त्यामुळ जो कुणी पुढाकार घेऊन तें काम करील त्याला सर्व मदत करायला तयार होते. पूर्वीप्रमाण एकमेकाचे हेवेदावे आणि पूर्वदूषित ग्रह या मृत्यूच्या दारात उभें असताना फारसे कुणाच्या मनात येत नव्हते.

दौलतनं पुढाकार घेतला. किनाऱ्यावर जमलेली टोळी पाहून त्याला आश्चर्य वाटल. नरकुडम् बेटावर मनुष्यवस्ती मुळींच नाहीं; इतकच काय, पण दक्षिण अदमान व निकोबार बेटांवरच्याप्रमाण नरमासभक्षक रानटी लोकसुद्धा या बेटावर नाहींत. मग हे कोण? अशा विचारांत असतांना किनाऱ्यावरच्या टोळक्यापैकी एकान एका बाजूस निराळ उभ राहून शरीराभोंवती चक्राकार हस्तक्षेप करीत 'सेमॅफोर' पद्धतीनं सदेश पाठाविण्यास सुरुवात केली.

दौलतचा हात टोपीसह उंच वर तिरका गेला. आपण सदेश वाचीत असल्याची ती खूण होती. ती मिळताच किनाऱ्यावरच्या माणसान अतिशय जलदपणें व फारच सफाईन सदेश पाठविला; आणि दौलतन तितक्याच सफाईन तो वाचला व प्रत्युत्तरें पाठविलीं.

वादळ कमी होत होत बरंच उतरल होत. साऱ्या खलाशानीं मोठ्या उत्साहान दौलतशीं सहकार्य केल. दौलतनं प्रथम एका बंदुकीच्या साह्यानं एक बाण किनाऱ्यावर उडविला. बाणाच्या

काठीला एक मजबूत, चिवट नि बारीक दोरी बांधली होती. तिचं एक टोक बाणासहित किनाऱ्यावर जाऊन पडलं, तें किनाऱ्यावरच्या लोकांनी पकडलं. बोटीवरच्यांनीं दुसरी मोठी दोरी छोट्या दोरीच्या टोकाला घट्ट बांधली. तीहि किनारेवाल्यांनीं ओढून घेतली. मग या मोठ्या दोरीच्या टोकाला एक भक्कम, जाडजूड, काथ्याचा दहा इंची दोर बांधला. त्याचं टोक किनारेवाल्यांनी ओढून घेतल्यावर त्यांनीं त्याच्याकडचं टोक व बोटीवरच्यांनीं आपल्याकडचं टोक उंच जागीं ताणून अशीं बांधलीं, कीं त्या दोराचा सारा भाग पाण्याच्या व लाटांच्या वरून उंच हवेंतून बोटीपासून किनाऱ्यापर्यंत अधांतरी तरंगत होता. मग त्या दुसऱ्या मोठ्या दोरीचा एक लोंबता फासा करून त्या दोरावर लटकावला, त्याच्या खालीं एक बुचाचं तरंगणारं गोल मोठं कडं अडकलं होतं. या बुचाच्या दोन कडांना मोठ्या दोरीच्या भागाचे ताणे बांधले होते. त्यापैकीं एक ताणा किनारेवाल्याच्या हातीं तर दुसरा बोटवाल्याच्या हातीं होता.

हे झाल्यावर रचना नीट झाली कीं नाहीं हे पाहण्यासाठीं दौलतनं स्वेच्छेनं कोणी पुढं येतं का तें विचारलं. दोघाचौघांनीं पुढं पाऊल टाकलं. त्यांतील एकाला दौलतनं त्या बुचाच्या कड्यांत बसवला आणि तारेवर लटकत चालणाऱ्या खाणींमधल्या पाळण्याप्रमाणं, त्याला दोरीनं ओढीत मोठ्या दोरावर लटकत लटकत सुरक्षित किनाऱ्यावर ओढून घेतला. युक्ति साधली असं पाहिल्यावर एका मागून एक जिजी, मुकुल, व एक एक खलाशी अशीं सर्वच माणसं सुरक्षितपणें फुटलेल्या जहाजावरून जमिनीवर उतरविलीं गेलीं.

अज्ञात व्यक्ति आतांपर्यंत कुणालाच दिवसाढवळ्या नीट दिसली नव्हती. तिनं अगोदर खालीं जाऊन राणीच्या हातापायांतील बंध मोकळे केले; आणि तिला डेकवर जाण्यास सुचवलं व स्वतः ती वर गेली. पण राणीला आपल्या पलीकडचं चाललेलं रागाचं संभाषण ऐकू आलं; तिकडंच ती कांही वाक्यं ऐकल्यावर, वर जाण्याऐवजीं वळली.

“ कान्होजी ! तूं नि तुझ्या मुलांनीं डाव उलटविला आणि माझ्या हातीं सायतारा लागू दिली नाही. पण चाचा म्हणून मी आता तुमच्या हातीं लागेन, आणि मला तुम्ही दर्यावरच्या रीतीन फाशी देऊ शकाल अस समजू नको. मी लढत मरेन, उदरासारखा कुचकुच करीत चिरडला जाणार नाहीं. पण मरताना जबर किंमत घेईन तुमच्याकडून! मी मरेनच पण तुलाहि माझ्याचबरोबर मरायच आहे!”

लखीरामन आपल्या कबरेचा मोठा तीक्ष्ण जबिया काढला. उलट्या बाजून त्याच्या पात्याच टोक बोटात धरून त्यान नेम धरला आणि तो गिरकावीत आता कान्होजीरावावर फेकणार इतक्यात, राणीन मागून येऊन वाघिणीसारखी लखीरामवर झडप घातली. पण लखीरामन पडता पडता राणीलाच त्या जबियाचा वार केला आणि मोकळा झाला. राणी कितीहि धाडसी आणि काटक असली तरी लखीराम-सारख्या हुशार चाच्याची तिच्यान कितीशी बरोबरी होणार!

कान्होजीराव अजून खाबाना जखडलेलेच होते. त्याना काहीच प्रतिकार करिता येत नव्हता. “ राणी ! तू कशाला मधें पडलीस ? ” त्यानीं विचारल.

“ कशाला ? तुम्हाला वांचवायला! या लखीरामान माझा दुष्ट स्वभाव ओळखून, परस्पर माझ्या हातून तुम्हा सर्वांचा घात साधून घेण्याचा बेत पार पाडला, आता त्याला विरोध नको करायला ? ”

लखीराम हसत उभा होता. कान्होजीराव बाधलेले होते, नि राणी जंबियाचा वार लागून पडली होती म्हणून त्याला भय नव्हतं.

“ वाः राणी ! तुझ्या कुळाच्या शपथा विसरलीस का ? ” राणीच्या कुळातील जुन्या विसरलेल्या गोष्टी, आपण त्यांत आपला तिळमात्र सबध नसताना उकरून काढून, तिच्या हातून हिंमत-दौलतचा काटा दूर करण्याचा व्यूह कशा शिताफीनं रचला हे त्याला राणीला सागून हिणवायच होतं.

"माझ्या आईनं मला अगोदरच त्याबद्दल उपदेश केला होता. तेव्हाच मीं तो ऐकिला असता, नि माणुसकीन वागतें तर इथवर गोष्टी येत्याच ना. पण उशिरा का होईना मी शहाणी झालें लखीराम! कुलशपथा गेल्या चुलींत! माझ्या हातून यापुढ कुणाच सुद्धा काडी-मात्र वाईट होणार नाही—झाल तर चागलच मात्र करीन. पण त्या संकल्पाची सुरुवात करण्यापूर्वी मला तुझ्या रक्ताच उदक सोडायच आहे—"

"नको राणी! ते गोड काम माझ आहे!" कुणी तरी मागून उद्-गार काढले. ते ऐकून राणीन नि कान्होजीरावानी माग वळून पाहिल. दौलत उभा होता. पण लखीरामान तिकडे चुकून सुद्धां पाहिलं नाहीं; उलट त्यान अकर्दी अचानकपणे कान्होजीरावावर पलीकडे झडप घातली, आणि त्या म्हाताऱ्याच्या उरात जबिया खुपसला.

"मला मारणं इतक गोड नाहीं, दौलत! त्या आनंदापूर्वी तुम्हांला दुःखान आवढे गिळावे लागतील. कदाचित् तुझ्याकडे लक्ष देताना तो म्हातारा चुकून विसरायचा म्हणून त्याची विल्हेवाट अगोदर लावली. आता चल, तुलाहि त्याच्या मागोमाग धाडतों."

दौलत त्वेषान, चिडूनचिडून लखीरामला भिडला. या चाऱ्यानं साऱ्याच वाटोळ केल, आणि आता तर प्रत्यक्ष डोळ्यादेखत बापाचा खून केला! जिवावर उदार होऊन अगदीं मारीन किंवा मरेन अशा इरेला पडून दौलत लढत होता. उलट लखीराम अगदी मुर्दाडपणानं आणि विनाप्रयास लढत होता. रक्तपात करणं आणि शिर तळहाता-वर घेऊन लढण ही त्याच्या सरावातली गोष्ट होती. तो निर्ढावला होता.

"दौलत! त्या माझ्या दारूच्या गुत्त्यात तुला फसवून आणवला; तुझी आणि त्या धटिंगणाची लढत लावली आणि मग तुझ्यावर वजन मारून तुला माझा मिंधा करण्यासाठी मी मधें पडलों, तो प्रसग आठवतो का? त्या वेळी त्या धटिंगण बैलाची कशी वाट लावली

मीं तें विसरलास का ? मग तुझ्यासारख व्यसन नि दुराचार यानी पोखरलेलं अशक्त धुंधुरड का मला जिंकील!"

आणि लखीरामन म्हटल्याप्रमाणच दौलतला तें शक्य झाल नसत, पण इच्छाशक्ति शरीरापेक्षाहि अनेकदा प्रभावी ठरते. दौलत नुसताच लढता तर त्याचा केव्हाच निःपात झाला असता, पण दौलतची सारी सदसद्विवेकबुद्धि आता जागृत झाली होती. आपल्या लढण्याच्या मागे पाठीराखी शक्ति न्यायाची आहे ही खात्री असली तर माणसाला चार अश्वाच बळ येत.

त्याच्या अंगातल्या कपड्याचीं लक्तर होऊन लोंबत होतीं. अगा-वर जखमा होऊन त्यांतून रक्त वाहत होतं. लखीरामच्या हातातला जाबिया दौलत एका हातान पकडून हिसकवण्याचा प्रयत्न करीत होता. बैलाच्या झुजीप्रमाण ते एकमेकाच्या मगरमिठींन एकमेकावर कुरघोडी करण्याच्या उद्देशानं मागपुढ हेलकावत लढत होते.

शेवटी लखीरामनं दौलतला डेकवर खालीं पाडून खिळवून धरला, त्याच्या हातावर पायावर जाबियाचे वार चालविले होते. पण राणी पडल्या पडल्या फरपटत सरकत सरकत जवळ आली. तिन सगळी शक्ति एकवटून उसळी घेतली आणि लखीरामची नरडी दोन्ही पंजानीं घट्ट धरली. राणीच्या फासान लखीरामचा हात जरा लटका पडला तोच दौलतनं लखीरामचा जाबिया हिसकावून घेतला.

लखीराम चाचा मेला, पण त्या पुण्यकर्मात दौलत व राणी एक-मेकांचीं भागीदार होतीं. लखीराम मरून पडला होता. आणि त्याच्याच जवळ रक्तस्रावान ग्लानि येऊन दौलत नि राणी पडली होती.

# २०

वादळ सपून गेल्यावर आता सारं कसं स्वच्छ झालं होतं. लख्ख उन्हान वातावरणात नवचैतन्य भरल्यासारखं दिसत होतं, दिशा उजळल्या होत्या, आकाशात अजूनपर्यंत माग रेंगाळलेले ढगाचे काही थोडे पुंजके सुद्धां हळूहळू पुढं सरकत होते.

नरकुडम् बेटावरची दाट झाडी अजून ओलीचिंब असून तींतून पाणी ठिबकत होतं. पाण्याचे ओहोळ वाहत जात जात एकत्र होऊन ठिकठिकाणी समुद्रात मिसळत होते. नरकुडम् बेटाच्या उंच खडकाळ किनाऱ्याला लाटा आता हलकेच स्पर्श करून परतत होत्या. साऱ्याच देखाव्याला एक ताजेपणाचं सौंदर्य आता प्राप्त झालं होतं. क्रांतीनंतर येणाऱ्या शांततेप्रमाणं वादळानंतरच्या या सृष्टीच्या शांत स्वरूपांत अतीव माधुरी प्रकट होत होती.

त्याचंच प्रतिबिंब साऱ्या माणसांतहि उमटलं होतं. सायतारेवर घडलेल्या अनेक भीषण घटनांची स्मृति, आदल्या रात्री पडलेल्या वाईट स्वप्नाप्रमाणंच कांहींशी मायावी नि दूर दूर अशी भासत होती. पण ती प्रेक्षकांना! हिंमत, मुकुल, दौलत, राणी अशा त्या भोंवऱ्यामध्यें सापडून प्रत्यक्ष भरडून निघालेल्या व्यक्तींच्या मनावर मात्र त्या अनुभवाचा खोल परिणाम झाला होता.

वादळ सुरू झाल्यान सायतारा नरकुडम् बेटावर आपटून चाच्यांच्या हातून वाचली, पण हे वादळ सुरू होण्यापूर्वी हिंमतचा तराफा वाहत येऊन सुखरूपपणे नरकुडम् बेटाला लागला होता. नरकुडम् बेटावर काहीं वर्षांमागं दुसरं एक जहाज फुटल होत, त्यातून वाचलेलीं आठ-दहा माणस या बेटावरच सध्या राहत होतीं. नरकुडम् बेट जहाजाच्या नेहमींच्या मार्गाबाहेर असल्यान त्याना परत स्वदेशात जाण्याची संधीच अजूनपर्यंत मिळाली नव्हती. त्याशिवाय त्या लोकात नाविक असा कोणीच नसल्यान केवळ स्वतःच्या तुटपुज्या ज्ञानावर नरकुडम् बेटावरून निघून समुद्र उल्लघून परत स्वदेशी पोंचण्याचा प्रयत्न करण्याच धाडस त्याना स्वतःच्या वकुबाबाहेरच वाटत होत. तेव्हा तशी संधि येईपर्यंत नरकुंडम् बेटावर हीं माणस राहत होतीं— आणि तिथल्या अनेकविध निसर्गदत्त गोष्टींतून युक्तीनं आपल्याला हव्या त्या अन्नवस्त्राच्या गरजा आणि इतर सुखसोयी भागवून आपला हा वनवास शक्य तितका कमी दुःसह करण्यात त्यानीं बरंच यश मिळवल होत. तराफ्यावर वाहत आलेल्या हिंमतला त्यानीं उचलून घेतल आणि त्याची चागली शुश्रूषा केली. दोन-चार दिवसातच हिंमत अगदीं पूर्ववत् झाला. या बेटावर अडकून पडलेल्या लोकाना हिंमतची हकीकत ऐकल्यावर तो देवदूताप्रमाण वाटला, कारण त्या सर्वांची इथून सुटका करून परत स्वदेशीं न्यायच अवघड काम करायला हिंमतसारखा अनुभविक दर्यावर्दी योगायोगान त्याच्यात येऊन पडला होता. एकमतान त्यानीं हिंमतची आपला सर्वाधिकारी पुढारी म्हणून नेमणूक केली, आणि क्षणाक्षणान आपल्या निवडीबद्दल जास्त जास्त संतोष वाटण्यासारखेच हिमतच्या चागुलपणाचे आणि हुशारीचे प्रत्यय त्याना येत होते.

सायंतारा नरकुडम्वर आपटली तेव्हापासूनच या सर्वांच्या मनात एका मोठ्या आशेची सुफलता होण्याची खात्री होऊ लागली. जर हें गलबत फारशी नासधूस न होता वादळातून त्याना टिकविता आल

तर याच जहाजान त्यांना स्वदेशीं परत जातां येईल. आणि म्हणून हिंमतच्या हाताखालीं त्यानीं सायंतारा सुरक्षित टिकवण्यासाठीं भगीरथ प्रयत्न सुरू ठेविले. हिंमतच्या मनातली आपुलकीची भावना, आणि त्या लोकाच्या मनातली आपल्याला स्वदेशीं परत जाण्याच एकट एक साधन अशी सायतारेबद्दलची भावना, या दोहोच्या समीलनान त्याच्या प्रयत्नात एक प्रकारचो उत्कटता आली होती. त्यामुळ वादळ सपल तेव्हा सायतारा फुटून तिचे तुकडे तुकडे न होता ती पुष्कळशा धड स्थितींत राहिली होती. जो भाग दगडावर प्रत्यक्ष आटूपन फुटला होता त्या भागाची जरूर तेवढी दुरुस्ती हिंमतच्या मार्गदर्शकत्वाखालीं धीमेपणान त्यानीं सुरू केली. सर्वजण अतिशय एकजुटीन जिवापाड श्रम घेत, त्या श्रमांतून आणि ऐक्यातून एक अतिशय सात्त्विक आनदाची गोडी त्याना चाखण्यास मिळत होती. आणि परस्परबधुभावात आणि प्रेमात भरच पडत होती.

पण सायतारेवरच्या सर्व खलाशी मडळींत माल झालेल्या सर्व घटनेबद्दल निरनिराळे उलटसुलट तर्कवितर्क चालत. त्याच्या पूर्वदूषित ग्रहानीं पुनरपि या सर्व मडळीत गैरसमजाचा फैलाव होणार आणि नसतीं काही त्रागडीं उपस्थित होणार हे हिंमतला स्पष्ट दिसूं लागल. त्याबरोबर त्यान एक फार नामी युक्ति आणि तींतच एक करमणुकीच साधन निर्माण केल. तें अस की सायरेतारेवर झालेल्या सर्व बडाळीची आणि गैरव्यवस्थेची त्यानं एक उघड चौकशी सुरू केली. नरकुडम् बेटावर पूर्वी आलेली आठ-दहा मंडळी सायतारेच्या पूर्व हकीगतीमध्यें त्रयस्थ आणि निरपेक्ष असल्यानं त्याच्यातील पाचजणाच एक लवाद-मडळ हिंमतन नेमलं. पण तेंहि चिठ्या टाकून. त्या पांचानीं आपला एक सरपच नेमला. रोज सायकाळी सायतारेच्या दुरुस्तीच्या कामाची तहकुबी झाल्यावर आणि सर्वांचीं जेवणं-खाणं झाल्यावर तीं सर्व माणस एका मोठ्या लाकडाच्या पेटविलेल्या शेकोटीभोंवतीं जमून बसत. कांहीं तरी भरमसाट विधानं करण्याऐवजीं,

पचाच्यापुढ ज्याला त्याला पाळीपाळीन साक्ष द्यावी लागे आणि आपल्याला माहिती असलेल्या सर्व गोष्टी शपथपूर्वक कथन कराव्या लागत. या चौकशीन सर्वांच्या रिकाम्या सध्याकाळी करमणुकीत जाऊ लागल्या. सर्वांनाच त्या चौकशीत मोठ कुतूहल निर्माण झाल होत. आज सध्याकाळीं चौकशीत पुढ काय निष्पन्न होणार याकडे सर्वांचे डोळे लागून राहत.

राणी आणि दौलत या दोघानाहि आसन्नमरण स्थितीत जमिनीवर आणल होत. रक्तस्राव बराच झाल्यान त्याची स्थिति काळजी करण्यासारखी होती. पण दर्यावर्दी अधिकारीपदाच्या सर्वांगीण शिक्षणात हिंमतला काहीं जरूरीपुरत वैद्यकीय ज्ञान शिकाव लागल होत. त्याखेरीज नरकुडम् बेटावरच्यात एक वैद्यकाचा अभ्यासु माणूसहि सुदैवान होता. त्या दोघानी मिळून राणी आणि दौलत याना औषधपाणी केल. सायतारेवर नेहमीप्रमाण औषधाची आणि वैद्यकीय उपकरणाची पेटी भरलेली होती, त्याचा फार उपयोग झाला, पण शुश्रूषा करायला परिचारिका म्हणून कोण उभ होत ?—मुकुल !

काहीं दिवसानीं राणी आणि दौलत याची प्रकृति पुष्कळच सुधारली. बिछान्यावर पडल्यापडल्या तीं दोघ मुकुलकड पाहत. आपल्याला जणू काहीं या दोघाकडून किंचितसुद्धा अन्याय झाला नाहीं, जणू काही पूर्वी याची आपली ओळखहि नव्हती, तर केवळ अपघातात इजा झालेल्या दोन व्यक्ति आपल्या शुश्रुषेखाली सुधारत आहेत अशा वृत्तीनं मुकुल वागत होती. त्याना ती औषधपाणी देई, अन्नपाणी आणून हातान भरवी, त्यांच्या जखमा धुई आणि बाधी आणि त्याच्या सुखसोईकड पाहत राही. आलेल्या दुःखद अनुभवाची अस्पष्ट छाया तिच्या चर्येवर असली तरी त्याहिवर सात्त्विक गुणाची आणि पावित्र्याची एक उज्ज्वल प्रभा असे.

एक दिवस राणीला जेवूं घालीत असतांना, पहिला घास

राणीच्या तोंडात अजून तसाच घुटमळत असतांना पाहून, मुकुल म्हणते, " अजून नाहीं का तो घास खाल्लास, राणी ! "

राणीच्या मनात दुःखाच भरत आल होत. तिला घास गिळतच नव्हता. तिच्या डोळ्यातून खळखळा पाणी वाहत होत.

" कुठ दुखत खुपत का ? " मुकुल वाकून म्हणते.

शेवटीं कसाबसा घास गिळून राणी रडत म्हणाली, " मुकुल ! का माझी येवढी शुश्रूषा करतेस ? अगदीं अकारण मीं तुझ वैर केल--"

" झाल गेल कशाला बोलतेस ? "

" बोलू दे मला मुकुल--त्यान मला जरा बर वाटेल. तुझी नि हिंमतची प्रीत मला पाहवली नाहीं. हिमतला तुझ्या हातून हिसकावून स्वतःकड वश करावा म्हणून माझी इच्छा. पण ती सफल होईना म्हणून तुझा नायनाट मी करायचा ठरवला. दौलतला दारू पाजून मी तुझ कौमार्य भ्रष्ट करविल, हिमतला हालअपेष्टानीं हळूहळू मारण्यासाठीं समुद्रावर एकटा सोडला, आणि आता आसन्नमरण स्थितींत मी असताना दैवयोगान तुमच्याच हातीं लागल्यावर, मला तुम्ही जगवण्यासाठीं इतकी झीज सोसता ! मुकुल ! तू मला विष प्यायला देतीस तर मला आनद झाला असता, कारण कृतकर्माच प्रायश्चित्त म्हणून एकाच घोटात ते पिऊन मी मोकळी होतें. पण त्याउलट माझ्या जीवनासाठीं तू इतकी जपणूक करीत आहेस, कीं क्षणोक्षणीं मला मेल्याहून मेल होत आहे. माझ्या कृतकर्मावर शिक्षेच औषध तूं देतीस तर परस्पर फिटफाट होऊन माझ्या मनाला क्लेश झाले नसते-पण कृतकर्माबद्दल तू माझ्यावर उपकाराचं आणि प्रेमाच ओझ लादीत आहेस त्यामुळ, माझीं पाप जालीम विषासारखीं माझ्या मनाचा अविरत दाह करीत आहेत."-- काही वेळ राणी गप्प बसून रडत होती. तिला मुकुलन आपल्या पोटाशीं धरल होत. इतक्यात पलीकडे काही अतरावर दौलतच अंथरूण होत तिथूनहि अस्पष्ट हुदके ऐकूं आले. सर्व जखमावर बांधलेल्या अनेक पट्टयामुळं आणि अशक्तपणामुळं

दौलतला उठूनहि बसवत नव्हत— पण तोच दौलत अथरुणातून उठून कसाबसा फरफटत, राणीच्या बिछान्यावर राणीला पोटाशीं धरून मुकुल बसली होती, तिच्याजवळ आला. त्यान मुकुलच्या पावलावर डोक टेकल, आणि हातानीं तिच्या पायाना विळखा घालीत तोहि अश्रु ढाळू लागला.

" हें काय दौलत! अशा तुझ्या हलण्यान जखमांतून पुन्हा रक्त-स्राव सुरू होईल कीं!" मुकुल अजीजीन म्हणाली.

" होऊ दे!— माझ्या रक्तापेक्षाहि माझे हे पश्चात्तापाचे अश्रु जास्त मोलाचे आहेत. माझ्या मनात हे विचार बोलून दाखवायच किती तरी दिवस आहे! पण तुझ्याशीं बोलायला माझ्या पापी मनाला धीर होईना. पण आत्ता राणीन जवळ जवळ माझेच विचार तुला बोलून दाखविले, आणि मग मलाहि राहवेना. मुकूल!—मुकूल—मला क्षमा कर—आई! आईऽऽग! तुझ्या या चुकल्या लेकराला क्षमा कर ग——मीं तुझा अपराध केला, पण तो—" इतक बोलून दौलत स्फुदून मोठ्यान रडू लागला. त्या आवेगान त्याच्या कांही जखमाचे टाके तुटून फिरून त्यातून रक्त वाहू लागलं.

दौलतच्या 'आई' या सबोधनान मुकुलच्या मनाची गाठ उचकटली. दौलतबद्दल अनुकपा आणि क्षमा तिच्या मनात उत्पन्न झाली. एका हातान ती राणीला सावरून धरीत होती, तर दुसऱ्या हातान वात्सल्यानं दौलतच्या पश्चात्तापदग्ध आणि विनम्र डोक्याला कुरवाळीत होती. त्या तिघाच्या अश्रूंचा त्रिवेणीसगम झाला होता!

मानव स्खलनशील आहे. तो आडमार्गाला जाणारच—पण त्यातच त्याच्या उन्नतीच बीज नाहीं का? आडमार्गाला जाताना प्रथम सुख वाटल, तरी त्याची सव्याज भरपाई दुःखातिशयान होते. सुखाशा त्याला खोल पाण्यात ओढून नेते, आणि मग दुःखाची प्रचीति त्याला गटगळ्या देत हालचाल करून सागते, " गड्या! चुकलास रे चुकलास!" मग पश्चात्ताप त्याला वांचवायला येतो. "झाल, होऊन

गेल, त्याबद्दल परतफेडहि केलीस. आता लक्षांत ठेवायच काय?-- सुखहि नाहीं आणि दुःखहि नाहीं— तर त्या दोन टरफलाच्या मधल खर बीज-आणि ते म्हणजे सत्प्रवृत्ति! अशाच योग्य वेळीं! परमेश्वरा! तू सज्जनाची मगत आम्हाला देतोस. त्याना आमचीं दग्ध पाप दृष्टीआड करता येतात, आणि आमच्या उज्ज्वल भविष्याबद्दल विश्वास दाखविता येतो. आमच्या पश्चात्तापदग्ध मनाला दयासिंचनान नव-जीवन मिळत, आणि पावित्र्याचा तेजोरवि आम्हाला नवचैतन्य देतो. परमेश्वरा! मी आत्ता लहान असेन, पण तुझाच बीजांकुर! वाढता वाढता इतका मोठा होईन, की तुझ्याहून मला निराळ अस्तित्वच उरणार नाही!—कोण म्हणत जग मिथ्या आहे? त्यामधला गूढ अर्थ समजण्याइतकी, देवा, मला दिव्यदृष्टि दे म्हणजे झाल!"

* * *

राणी आणि दौलत दोघहि पूर्णपणे बरीं झाली. त्याच्या जुन्या स्वभावातले काहींहि दुर्गुण आता उरलेले नव्हते. इतराच्या बरोबर तींहि आता सायतारेच्या दुरुस्तींत भाग घेत. सायतारा आता भराभर तयार होत होती.

इकड लवाद-मंडळान आपल्या साक्षी संपवल्या. त्यात एकच साक्ष अतिशय महत्त्वाची आणि सर्वांना अपरिचित अशा एका व्यक्तीची झाली. ती म्हणजे जमनीची! ती अशी—

"बनबीरन वल्ह्यानं प्रहार केल्यावर मी बेशुद्ध झालें, आणि नदी-प्रवाहाबरोबर वाहत गेलें. मी शुद्धीवर केव्हा आलें कोण जाणे— पण एका तेजःपुंज साधून मला पाण्यातून बाहेर काढल होत. त्यान मला सायतारा परत हुगळीबाहेर जाताना बोटान दाखवली आणि सांगितल, "त्याच जहाजावर तू जा."

"कशाला?"

"तुझा बनबीर तिथ आहे!"

"पण त्यानच मला टाकल ना?"

“टाकल तरी, माणूस आपलं म्हटल्यावर सोडू नये--कारण माणूस आडमार्गाला गेल असलं तरी त्याला परत सन्मार्गावर आणायची शक्ति प्रीतींतच आहे--दुसऱ्या कशात नाहीं.”

“मी तिथं कशी राहू शकेन ?”

“दैवाची तशी योजना आहे. तिथवर जा म्हणजे आपोआप मार्ग सापडेल.”

“आणि गेल्यावर काय करू ?”

“योग्य दिसेल तेवढ निर्भयपणान कर.”

“योग्य काय तें कस कळेल ?”

“प्रश्न विचारू नकोस. जा म्हणजे झाल. भवितव्यतेची काळजी घ्यायला ती समर्थ आहे. चल, जा !”--

“मी सायतारेवर आले ती मच्छीमाराच्या होडींतून. सायतारा जेव्हा पायलटला परत धाडण्याकरता सायकाळीं उभी होती, तेव्हा गुपचुप चढलें. लपूनछपून, माल ठेवण्याच्या गोदामात किंवा डेक्-वर उपड्या ठेवलेल्या होडग्यात मी दिवसा राहून रात्री सगळीकडे हिंडत असे. खलाशाच्यासाठी इतक अन्न शिजे त्यातल चोरून काढून नेई; साधि नाहींच मिळाली तर उपासहि काढी. पुढ जहाजावरच्या सगळया वस्तुस्थितीची मला उत्तम कल्पना आली. विशेषतः मेघनेच्या भुताबद्दलची खलाशामधें रुजलेली भीति माझ्या फार पथ्यावर पडली. पिशाचाकृति म्हणून रात्रीं मला कित्येकजण भ्याले. माझ्या ते वाऱ्या-लाहि उभे राहत नसत. त्यामुळ माझा सचार जास्त मोकळेपणान होऊ लागला.

“राणीची कारस्थानं, लखीरामची कारस्थान मला कळत, पण त्यांचा जोंपर्यंत प्रतिकार करण शक्य नव्हत तोंवर मी प्रेक्षकाचंच काम करीत होतें. फक्त बनबीरकडून आणखी कांहीं गुन्हा होऊं नये येवढी मी दक्षता घेत होतें.

“पुढ कान्होजीरावाना व हिंमतना गिरफदार केल्यावर त्यांच्याशीं

मीं ओळख करून घेतली. त्यांना सर्व जरूर ती मदत केली. कान्होजीरावाना माझ्यामुळ खालीं कोठडींत वरच्या घडामोडींची इत्थंभूत बातमी कळे. हिंमतना त्याच्यावरच्या सकटाची मींच आगाऊ सूचना दिली; आणि तराफा तयार करणाऱ्या झिलमिटला मसलतींत घेऊन तराफ्याखालीं पुरेस अन्न-पाणी वगैरे चोरून लपवून ठेवलं. सायतारा नरकुडमूवर आपटून लखीरामच्या हातून सोडविण्यासाठीं मी कान्होजीरावाच्या मदतीन प्रयत्न करणार होतें. किंचाळया फोडून वादळात खलाशांना मुद्दाम मींच घाबरवलं. लखीरामला कोंडण्याचा माझा यत्न फसला, आणि दौलत मदतीला आल्यामुळच ही पुढची मुक्तता सायतारेला शक्य झाली.

"मीं शपथपूर्वक खर बोलणार म्हटल. तेव्हा मला हीहि गोष्ट सागितली पाहिजे, कीं चद्रदत्ताचा खून बनबीरनं केला. राणीच्या हातून हिंमत-दौलतचा काटा काढण्यात कदाचित् दिरगाई होईल, म्हणून लखीरामनं बनबीराला हिंमतचा खून करण्यास सागितलं होत. भुताटकीचा भ्रम आणि दहशत जास्त बसवण्यासाठीं कलकत्त्याहून निघाल्याबरोबर लागलीच हिंमतला मारण्याचा लखीरामचा उद्देश.

"हिंमतना मारण्यासाठीं बनबीर गेला, पण अगदीं खऱ्याच दैव-योगानं ते त्याच वेळीं चद्रदत्तानीं सागितल्यानं खालीं गेले आणि त्याच्या जागीं चद्रदत्त अधारात उभे राहिले. त्यामुळ हिंमतच्या ऐवजीं चंद्रदत्त मारले गेले. हा खून झाला तेव्हा मी अगदीं नवखी आल्यानं मला त्याचा सुगावा प्रथम लागला नाहीं. नाहीं तर तोहि मीं होऊ दिला नसता.

"बनबीर खुनी आहे—चांचाच्या बडाळींत लखीरामचा तो साथी-दारहि होता—त्याला फाशीची शिक्षाच योग्य; पण तो माझा वाग्दत्त पति आहे—हिंमतना प्राण वाचवण्यात मीं मदत केली; कान्होजी-रावाना सायंतारा आणि तिच्यावरील सर्वांचे प्राण वाचविण्यात मदत केली—माझ्या कृत्याची मी प्रौढी मारीत नाही, तर माझी जर खरी

मदत झाली असं तुम्हाला वाटत असल, तर त्या मोबदल्यात माझ्या सौभाग्याची भीक तुमच्याजवळ पदर पसरून मी मागत आहे !

“ सायंतारा आपटल्यावर मी राणीला मोकळ केल, आणि कान्होजी-रावानाहि करणार होतें, पण कान्होजीरावाना लोखंडी हातकडया नि बेडया घातलेल्या ! राणीप्रमाण दोऱ्या नव्हत्या, म्हणून हातकडयाच्या किल्ल्या लखीरामच्या खोलींत शोधायला गेलें. त्या सापडेनात म्हणून कानस मिळवायला सुताराच्या कोठींत गेले. परत येईपर्यंत कान्होजी-रावांचा लखीरामन खून केलेला दिसला, आणि दौलत नि राणी यांनी लखीरामला प्रायश्चित्त देऊन स्वतःहि मृत्यूच्या दारात पाऊल ठेवल होत.

“ बनबीरना घेऊन परत मीं कोळीवाडीला जाईन. त्याच्या हातून पुन्हा असल्या गोष्टी घडणार नाहीत याची हमी मी देतें ! ”

साक्षी ऐकून घेतल्यावर पचानी न्याय दिला. पण तो न्याय जगातल्या रूढ न्यायाप्रमाणं अधदृष्टि नव्हता, तर केवळ झालेल्या गोष्टी जास्तींत जास्त कशा सुधारता येतील, आणि आरोपीच्या पुढच्या जीवनात खुनशीपणापेक्षा माणसकीची जोपासना कशी होईल एवढी एकच दूरदृष्टि ठेवून दिला होता.

चद्रदत्त मेल्यान मुकुलची हानि झाली. तेव्हा तिन क्षमा केल्यामुळ बनबीरला मोकळा सोडून जमनीच्या हातीं दिला. जमनीसारख्या कर्तबगार मुलीपुढ या अवखळ बनबीरच काहीं चालणार नाहीं, ती त्याला संभाळून घेईल याची सर्वांना खात्री पटली होती. कोळी-वाडीच्या चौधरीला आपली सुनेची निवड इतकी योग्य ठरली म्हणून हें सर्व कळत तर फारच समाधान झालं असत.

मुकुलला होणारं बाळ– तिला बाळ व्हायच होतं–दौलतन आपल म्हणून स्वतः वाढवण्याची इच्छा प्रदर्शित केली होती, आणि मुकुलला त्या बाळाच्या जन्मानंतर हिंमतशी विवाहबद्ध होण्याची त्यानं फार गळ घातली होती. पचांनीं हेंहि मान्य केल.

आपली वाटणी सोडून दौलतन सायंतारा सर्वस्वी हिमतच्या मालकीची करून दिली होती, आणि आपण–दर्यावर्दी जीवनाची खरी आवड अतिशय असूनहि–प्रायश्चित्त म्हणूनच केवळ पुनः त्या धद्यात कधींहि न पडण्याची शपथ घेतली होती. इतर कांही करून तो चरितार्थ चालवणार होता.

—पण राणीच आता दौलतशीं लग्न ठरल होत. तोहि कांहीं कमी कर्तबगार नव्हता, आणि आता तर त्याच्यात आणि हिमतमधें फारच थोडा फरक उरला होता. मुकुलच बाळ दौलतबरोबर आपलं म्हणून वाढविण्याचा तिचाहि सकल्प होता. आपल्या सांपत्तिक सुस्थितीचा फायदा मुकुलच्या बाळाला, दौलतला, हिमत व मुकुल या सर्वांनाच मिळावा अशी तिची उत्कट इच्छा होती.

*　　*　　*

सायतारा दुरुस्त झाली आणि नरकुडम् बेटाला सर्वांनी रामराम ठोकला. न्यायनिवाडा झाल्यान साऱ्याची दिलसफाई नि दिलजमाई झाली होती. सायतारेवर आता सर्वत्र इतका आनंद होता, कीं याच जहाजावर इतक्या चमत्कारिक घटना झाल्या असतील अस पाहणाराला वाटलहि नसत !

सायतारेवर हिंमतन कप्तान म्हणून बनबीर व जमनी, आणि दौलत आणि राणी याचीं लग्न लावून दिलीं.

जिजी म्हणाली,–" आणि हिंमत, तुझ लग्न रे ? "—

" मीच कप्तान ! माझ लग्न लावायचा अधिकार असलेल सायतारेवर कुणी नाहीं— तेव्हा पुढ पाहू —"

शेवटी हिंमतन काय केल ?—

# २१

सायतारा चितगांवला 'कर्णफुला' जवळ येऊन पोंचल्यावर, मग कित्येक दिवस खुद्द चितगाव बंदरात जाऊन उभी होती. तिथं जहाजाच्या सामानाची मोठी बाजारपेठ होती, आणि उत्तम सुतार, शिड शिवणारे असे अनेक कसबी लोक धंदा करीत. शिडाच्या गलबताची चितगावला मोठी ये-जा चाले. नरकुंडम् बेटावर जरी तात्पुरती दुरुस्ती करवून घेतली होती तरी पुन्हा चितगावला उत्तम कसबी लोकाच्या हातून अनेक गोष्टी पुन्हा बसवून घ्याव्या लागल्या. त्या कामाला आणखी चांगले दीड दोन महिने लागले.

'कर्णफूल' आता माणसानी गजबजलं होत. जिजी, दौलत, राणी हिंमत नि मुकुल अशी सारीजण तिथं होतीं. त्या सर्वांच आतां जणू एकच समाईक कुटुंब झाल होत.

जिजी आता म्हणे, "बस झाल्या समुद्रावरच्या सफरी आतां! सात जन्म पुरेल इतका समुद्रावरच्या गोंधळाचा अनुभव या जन्मांत मला दोनदा आला. मी समुद्रावर गेलें कीं कुणा ना कुणाच्या बाळंतपणाची तयारी मला करावी लागते. एकदा त्या मेघनेच केल–

आणि आता कर्णफुलातच का होईना—पण या मुकुलचं बाळंतपण मला करण आलं आहे!"

हिंमत आणि मुकुल याचं संभाषण फारस होत नव्हत. इतरानीं त्याना अगदीं एकट सोडलं तरी, ती दोघ गुपचूप बसून राहत. काय बोलायचं हेंच त्याना सुचत नसे. कारण जें बोलावंसं वाटे तें तोंडांतून उमटत नसे; आणि जें अवातर बोलायच ते केवळ वरपागी, निर्जीव म्हणून बोलण्यात गोडी वाटत नसे. म्हणून ती दोघं स्वस्थच बसत.

* * *

दिवसामागून दिवस गेले. एक दिवस मुकुल प्रसूत झाली आणि तिला मुलगी झाली. जिजींनि तें गोजिरवाण लहान बाळ आणून सर्वांना दाखवल. आणि गमतीनं हिंमतच्या हातीं दिल. मूल गाजरासारख लाल, नि उमलत्या गुलाबाच्या पाकळीसारखं नाजुक होत. त्याचे इवलाले डोळे उजेडान दिपत होते. हाताच्या मुठी त्यानं मिटल्या होत्या. जणू काही त्याच्या नशिबाची तळहातावरची रेखाचित्र मूठ मिटल्यान सवालाखाची मानावीं असच त्या छोट्या बालकाच म्हणण.

हिंमतच्या, दोर ओढून घट्टे पडलेल्या, राठ पसरट पजाना त्या तान्ह्या जिवाच्या नाजुक स्पर्शान कस चमत्कारिक वाटल. तो छोटा जीव निष्पाप होता. त्याला जगाच्या लगडया चालीरितींची काय जाणीव! त्याची असहायता मोहक होती. त्या बाळाबद्दल हिमतला काडीचीहि तक्रार मनात वाटत नव्हती—पण त्याच्या मनात एकच गोष्ट डाचत होती—हे बाळ माझ स्वतःच असतं तर किती बर झाल असत!

आपल्या प्रियतमेला बाळ व्हायच पण ते दुसऱ्यापासून! आपल्या प्रेमात विरस केल्यासारख—दुधात मिठाचा खडा टाकल्यासारखं—त्याला वाटत होत.

युक्तिवादानं या भावनेकडे पाहिल, तर त्यांत फारस तथ्य नव्हतं हें खरं...पण माणसाचं मन हें एखाद मुर्दाड यंत्र का आहे, कीं

युक्तिवादाचे, नाहीं तर तर्कशक्तीचे लहानमोठे पान्हे हातात घेऊन मनोभावनाचे नट आणि बोल्ट घट्ट नाहीं तर ढिले करायचे !

मन हें मनच! त्याच्या भावना अशा का नि तशा का याला काय कारण द्यायचीं ? आहेत म्हणूनच त्या तशा आहेत !

त्या लहानग्या बाळाचा दोष नव्हता खरा, पण त्याच्यामुळ आपल्या-मधें नि मुकुलमधें अंतर पडत आहे अस हिमतला वाटू लागल. दातात काहीं अडकल तर ते दुखतच अस काहीं नाहीं—पण जिभेला ते निघाल्याशिवाय चैन पडत का? नाहीं, ती सारखी त्या दाताशी घोटाळते. तिला तो एक चाळाच लागतो.

हिंमत काहीच बोलला नाहीं. त्यान ते बाळ परत जिजीजवळ दिल. त्याच्या मनात विकल्प आला होता, आणि त्यान कसाहि विचार केला तरी तो जाईना.

आता मुकुलला जास्त मोकळा वेळ मिळेल अस त्याला वाटे. पण तीं दोघ बोलत असताना मधेंच ती कानोसा घेतल्यासारख करी, आणि कितीहि महत्त्वाच वाक्य असल तरी अर्धवट सोडून जात म्हणे, “ बाळ उठल वाटत ! ”

तो “ जरा फिरून येऊ समुद्रतीरीं ” म्हणाला, तर मुकुल म्हणे, “ नको बाळाची दूध प्यायची वेळ होईल आता. त्याला पाजायच आहे.”

आणि तो काहीच म्हणाला नाहीं, तर मुकुल बाळाच कौतुक वर्णून सागू लागे. तो नुसता हुकारच देई. मनात त्याला वाटे, “ तिला बाळाच कौतुक वाटणारच, तिच्याच हाडामासाचा तो छोटा जीव आहे—पण माझ्या रक्ताचा कुठ आहे तो जीव, मला काहींच विशेष वाटत नाहीं.”

* * *

तीन महिन्यांनीं सायतारा घेऊन हिंमत निघाला. कलकत्त्याला तो प्रथम जाणार होता. मुकुलचा निरोप घ्यायला तो आला.

“ मी जातों आतां मुकुल ! ”

" इतक्या लवकर ?"

" हं."

" इतक्यात नका जाऊ; निदान लवकर लवकर परत या. याल ना ? केव्हा याल ?"

" दोन-चार महिन्यानी, कदाचित् वर्षान, कदाचित् चार-पांच वर्षांनीं !"

" मग मी जाऊ देतच नाही तुम्हाला !"

" अस कस चालेल ?"

" मग कबूल करा माझ्याजवळ, की कलकत्त्याहून परत निघतांना इथ पुन्हा येईन अस. किती दिवस लागतील कलकत्त्याला ?"

" चार महिने."

" मग चार महिन्यानी मी तुमची वाट पाहीन अ ?" अस म्हणून तिन ओठ वर केले. मुकुलच त्यान चुबन घेतल.

" आता माझ्या बाळाचा पापा घ्यायचा ना ?" तिन बाळ पुढ धरल. हिमतन टाळाटाळ केली.

" मुकुल ! तें बाळ लोकाच असत तर मीं कौतुकान पापा घेतला असता, तुझ-माझ असत तर प्रेमान, ओथबल्या हृदयान, उत्सुकतेन त्याचा मुका घेतला असता— पण हे बाळ तुझ आहे नि माझ मात्र नाहीं म्हणून घ्यावासा वाटत नाही !"

" माझ बाळ म्हणून घ्या. मी सागतें म्हणून !"

" केवळ तू सागतेस म्हणूनच !" अस बोलून हिमतन त्याच चुबन घेतल.

* * *

चार महिने झाले. मुकुल दिवस मोजीत होती. कबूल केल्याप्रमाणे सायतारा परत आली. मोजके दोन दिवस हिंमत राहिला. तिसरे दिवशीं सकाळीं सायंतारा पुढ जायची होती.

रात्रीं हिमत उठला— खरं म्हणजे त्याला झोपच लागली नव्हती. तो सारखा विचार करीत होता.

मुकुलला दोन विरोधी पाश आहेत. एक माझा नि एक त्या बाळाचा. माझ्यावांचून मुकुलच अडेल का बाळावाचून अडेल जास्त? त्या प्रश्नाच उत्तर मुकुललाच द्यावं लागेल! मला नाहीं तें ओळखता यायच. बर, त्याउलट मुकुलवाचून कुणाच जास्त अडेल? माझ का त्या बाळाच? मी तर अजून सडाफटिंग आहे, मला काय कमी पडणार? उलट तें बाळ लहान आहे, असहाय आहे. त्याच मुकुल-वांचून खर नडेल. मग आम्हा दोघाचाहि मुकुलवर हक्क असला, तर कुणी तरी माघार नको घ्यायला? मग मी मोठा, मला तें दुःख सहन करण्याची शक्ति आहे, तेव्हा मी माझा हक्क सोडून, मला पत्नी नाहीं मिळाली तरी त्या बाळाला आईवेगळ होऊ देता उपयोगी नाहीं!

हिंमतचा विचार ठरला. तो तसाच उठला, त्यान मुकुलच्या खोलींत जाऊन पाहिल. मुकुल निजली होती, तिच्या कुशींत बिल-गून बाळ निजल होत. तें दृश्य पाहून आपले विचार बरोबर आहेत अशी त्याची जास्तच खात्री झाली. आता मुकुलच शेवटचच चुंबन घ्याव म्हणून तो वाकला—तोंच मुकुल हालली. ती जागी होईल, म्हणून तो मागं सरला. मग फिरून त्याला वाटल, मीं चुबन घेतल तर माझे विचार फिरून बदलायचे—नकोच! जर माझा तिचा वियोगच व्हायचा तर तो असाच बरा! त्यानं तिला डोळे भरून एकदा पाहिल, आणि तो अपरात्रींच धक्क्याकडे परतला.

* * *

मुकुलला स्वप्न पडत होत. तिला तो गगासागराजवळ भेटलेला साधु दिसत होता. तो विचारीत होता तिला:

'हें बाळ कुणाचं?'

"माझ!"

'छे! हें तर दौलतचं नि राणीच!' तो म्हणाला.

“मग माझ कोणतं ?”

‘तुझ अगोदर लग्न व्हायच आहे !’

“कुणाशीं ?”

‘हिंमतशीं.’

“मला वाटल, तुम्ही म्हणाला होतात, तें शक्य नाहीं होणार कधींच.”

‘अस का ? बर. पोरी, मी आता सागतों, ते अगदीं शक्य आहे.’

“म्हणजे– !”

‘म्हणजे हिंमत नि तू एकमेकाचे आहात !’

“आणि बाळ ?”

‘त्या बाळाच जीवन तुमच्यात गुतलेल नाहीं. त्याचे लागेबाधे पुढ येतील. प्रेमाची ओढ पुढ असते. ती पोर पुढ तुला अतरणारच, दुसऱ्याचीच ती. मग आता तिच्यासाठीं तुझ्या हिंमतला का मुकणार तूं ? जा, बाळ !– तुझ्या प्रियकरामाग जा !’—

मुकुल खडबडून जागी झाली दचकून. त्या स्वप्नान तिच्या मनावर केवढा परिणाम झाला, इतक तें खऱ्यासारख वाटत होत. ती धावतच जाऊन हिंमतच्या अथरुणाकड पाहू लागली. तें रिकामं होत !—

मुकुलनं बाळाला दुपट्यात गुरफटून उचलल. राणी निजली होती तिच्याजवळ ती आली, आणि राणीच्या कुशींत तिनं बाळ सरकवून ठेवल. बाळ न रडता राणीला बिलगल, आणि राणीन आपला पदर त्यावर घालीत त्याला हातांनीं पोटाशीं ओढल ! समाधानान मुकुल परतली. तिच्या पाठमोऱ्या आकृतीकड आनंदान नि प्रेमान राणी पाहत होती. तीहि जागी झालीच होती पण तिन तें दाखवल नाहीं.

धक्क्यापाशीं हिमत येऊन होडग्यात बसला. त्यान अतिशय जड अंतःकरणान पागार सोडलं. वल्हीं हातांत घेतलीं आणि तो होडगं

धक्क्यापासून दूर ढकलून वऱ्हवू लागणार— इतक्यात कुणी तरी धप्-दिशीं पाण्यात उडी मारली. त्या बाजूला उडी मारून हिंमतन त्या व्यक्तीला ओढून होडीकड आणल नि होडीत उचलून बसविल. त्या स्पर्शान ओळख पटली. हिमतच्या मनांतून नि शरीरांतून आनंदातिशयानं रोमाचाची विजेसारखी चमक उठली.

त्यान जरा भीतभीतच पण मोठ्या आशेन, अपेक्षेन विचारल,

"मुकुल! मुकुल!!"

"होय हिंमत! मीच ती तुमची मुकुल! इथच या पायऱ्यापाशीं आपला प्रेमोद्भव झाला, नि इथच त्या प्रेमाची सफलता होत आहे आज!"

"का आलीस तू? कशी आलीस मुकुल माझ्याकडे?"

"प्रश्न कशाला विचारायचे?" मुकुल म्हणाली, "मी तुम्हाला सोडून दूर आता कधीं जायची नाही येवढ मात्र खर. जिथ तुम्ही तिथच मी!"

हिमतन तिला घट्ट जवळ ओढून धरल. ते होडग येवढ लहान होत ना, पण त्याना तेंहि मोठ वाटलं!—

धक्क्याच्या जवळपास होडग रातभर तरगत होत. वर तारे लुक-लुकत होते. होडग्याजवळ पाणी आपटून अगदी मदमधुर कुजबुज करीत होत.

* * *

भल्या पहाटे पहिल्या हुकुमाप्रमाण सारगान नागर उचलायला सुरुवात केली होती. 'चलो खलाशी हबेस लगर'च्या ठेक्यांत खलाशी नागर उचलीत होते.

हिंमतचं नि मुकुलच होडग सायतारेजवळ आल तेव्हां झिलमिट मोठमोठ्यानं म्हणत होता—

"—गळ्यांत त्याच्या लोंबे दावें!"

“ लागलास पोरींच्या नादी !
कालच केलिस ना तू शादी ?
“ होय दारुच्या नशेंत होतो ।
सुदर म्हणुनी भुललों होतों ! ॥
करीन म्हटलें तिजला दारा ।
पण तिज पाहिलीं पोरें बारा ! ”

“ झिलमिट ! ” हिंमतन डेकवर पाऊल टाकल्याबरोबर जगी आरोळी दिली, “ हे पाहिलस का कोण आहे माझ्याबरोबर ? दुसरी काहीं गाणीं येत नाहींत का तुला ? ”

झिलमिटन लागलीच दुसर गाण सुरू केल. हिंमतवर त्याचा जीव होता, नि मुकुताईवरहि होता ! त्या दोघाच्या आगमनान तो आनदून गेला. सारेचजण आनदान खड्या सुरांत गाण म्हणूं लागले. त्यांना आता कप्तानहि हवा तोच होता, नि कप्तानीणहि हवी तशीच होती ! नागर वर उचलीत ते मुक्तकठान गात होते--

खाऱ्या रुपेरी पाण्यांत । वल्हीं ताणा एकसाथ !
हंसासम शुभ्र होडी । लोटतां गाण्या ये गोडी.
चंदीर चकाके वरी । रंगवीली विभावरी
कैसी वर्णू जादूगिरी । शोभा अनुपम खरी.
मंदमंदशा वाऱ्यास । जमिनीचा गोड वास.
त्याच तीरीं आसपास । गृहीं माझी कोणी खास,
वाट पाहे मनीं आस । भेटी व्हावी हाच ध्यास !
कप्तानाला मिळे दारा । ‘सायंतारा’ धरी वारा
दर्याला नदी मिळाली । प्रीतीला भरती आली.
नको जीवा ताटातुटी । नको प्रेमाला ओहोटी.
नावनाके कापे पाणी । दुभंगे दो बाजूं क्षणीं.
अनुसरे मागें लाट । सांधी तोडलेली वाट

ताणतां वल्हीं अमाप। तळम धवळ काप
जळाचे निघोनि येत। जळबिंदू अगणित.
रत्नमालिका गुंफिल्या। नाचऱ्या या लाटा ल्याल्या
जळीं वल्ह्यांचे आघात। पुष्ट कर हे करीत
दर्यागान त्या ताळांत। गाउनी घुमवूं रात
निसर्गाच्या दरबारी। खलाशी हे मानकरी
सार्वभौम राज्य खोटें। येथें आम्हां तुच्छ वाटे!
होडी एक द्या लहान। शीड धराया पवन
दिशा देखण्या द्या तारा। आम्ही हिंडूं दर्या सारा!

उगवत्या सूर्यान पाहिल तेव्हां पश्चिम क्षितिजावर 'सायतारा' एका पांढऱ्या शुभ्र ठिपक्यासारखी दिसत होती!

